'टिळक महाराष्ट्र विद्यापीठा'ने पुरस्कारिलेला ग्रंथ

# जीवन-शिक्षण

अर्थात

## (वर्धा-शिक्षण-योजना)

यदा वै करोति, अथ निस्तिष्ठति

1945

संपादक

आचार्य स. ज. भागवत

प्रकाशक व व्यवस्थापक
रा. ज. देशमुख,
१९१ शनवार, पुणें २

संचालक
भ. व्यं. देशमुख,
बी. ए., एल्‌एल्. बी.


( २ ) मुखपृष्ठावरील चित्र दीनानाथ दलाल यांचें आहे.

किंमत ४। रुपये

मार्च
१९४९

मुद्रक :—
म. शं. कुलकर्णी,
एम्. ए. बी., टी. डी.
टीचर्स प्रिंटिंग प्रेस,
७७ शनवार, पुणें २.

# प्रास्ताविक

टिळक-महाराष्ट्र-विद्यापीठानें १९३९ सालीं सासवड विभागांत वर्धा-शिक्षणाचा प्रयोग सुरू केला, त्याच वेळीं ' वर्धा-शिक्षण ' मासिक पत्रिकाहि चालू केली होती. सप्टेंबर १९३९ पासून ऑगष्ट १९४० पर्यंत त्या पत्रिकेचे जे बारा अंक प्रकाशित झाले त्यांतील महत्त्वाच्या लेखांचा संग्रह आज प्रकाशित होत आहे. ' वस्त्रपूर्णा ' आणि ' जिवंत व्रतोत्सव ' हे ग्रंथ स्वतंत्रपणें प्रसिद्ध झाले असल्यामुळें त्यांतील लेखांचा समावेश येथें केलेला नाहीं. पत्रिकेंत पूर्वी प्रसिद्ध न झालेला एकच लेख या संग्रहांत घेतला आहे. तो म्हणजे ' मूलोद्योगी राष्ट्रीय शिक्षण.' हा लेख पुण्याच्या ' न्यू इंग्लिश स्कूल ' च्या हीरकमहोत्सवासाठीं लिहिण्यांत आला होता. ' वर्धा-शिक्षण योजने ' चा विचार दर्शविणारा हा लेख या संग्रहांतहि असणें उचित होईल, या दृष्टीनें तो येथें स्वीकारण्यांत आला आहे. सर्व लेखांचे स्थूल मानानें दोन विभाग करून तात्त्विक विवेचनविषयक लेखांचा ' सिद्धांत खंड ' आणि अभ्यासक्रमासंबंधींच्या लेखांचा ' साहित्य खंड ' असे दोन खंड केले आहेत. अर्थातच हे खंड अगदीं सर्वांगपूर्ण झाले आहेत असें नाहीं. पहिल्या वर्षी जेवढें साहित्य निर्माण झालें तेवढ्याचाच समावेश होऊं शकला. पत्रिकेचें प्रकाशन अपरिहार्य आपत्तिमुळें बंद पडलें आणि राजकीय वातावरणांत निर्माण झालेल्या क्षोभामुळें विद्यापीठाच्या सर्वच प्रयोगांवर अडचणी कोसळल्या. आतां पुन्हां विधायक कार्याला चालना मिळाली असून वर्धा-शिक्षणाचा विचारहि कार्यकर्त्यांच्यापुढें अधिक उमेदीनें उभा राहिला आहे. या प्रसंगीं विद्यापीठाला अशी आशा वाटते कीं, पत्रिकेंतील लेखांचा हा संग्रह महाराष्ट्रांतील जनतेला आदरणीय वाटेल आणि वर्धा-शिक्षणाच्या प्रचाराचे दृष्टीनें त्याचा चांगला उपयोग होईल. कागदाच्या नियंत्रणामुळें विद्यापीठाला हा संग्रह स्वतः प्रकाशित करणें कठीणच होतें; पण देशमुख आणि मंडळीच्या साह्यानें विद्यापीठाला याचें प्रकाशन करितां आलें आहे. यासाठीं देशमुख आणि मंडळीचे विद्यापीठाच्या वतीनें मी आभार मानतों.

वर्धा शिक्षण--विषयक साहित्य अद्यापि विशेष निर्माण झालेलें नाहीं. हिंदुस्थानी तालिमी संघानें मराठी, इंग्रेजी, हिंदी आणि उर्दू इतक्या भाषांत

कांहीं ग्रंथ तयार करविले आहेत. संघाच्या वतीनें ' नई तालीम ' मासिक पत्रिका निघत असे, त्यामधून पुष्कळ चांगले लेख प्रकाशित झाले आहेत. पण ती पत्रिका देखील गेलीं २-२॥ वर्षें बंद पडली आहे. महात्मा गांधींच्या प्रेरणेनें गेल्या महिन्यांत सेवाग्राम येथें संघाच्या वतीनें एक अखिल भारतीय शिक्षण परिषद भरली होती. तींत वर्धा-योजनेचें क्षेत्र जीवनव्यापी करण्याचें ठरविण्यांत आलें आहे. यामुळें आतां पुनः साहित्य निर्माण करण्याकडे लक्ष दिलें जाईल अशी आशा वाटते. या संग्रहाचे शेवटीं ' साहित्य दर्शिका ' दिली आहे. गेल्या चार वर्षांत आणखी कांहीं महत्त्वाचे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. १९४१ च्या एप्रिल-मध्यें ' वर्धा-शिक्षणा 'ची दुसरी परिषद ' जामिया मिल्लिया 'चे वतीनें जामियानगर, दिल्ली, येथें भरली होती. तिचा संपूर्ण अहवाल तालिमी संघानें इंग्रेजी व हिंदी या दोनहि भाषांत प्रसिद्ध केला आहे. ' Two Years of work, ' आणि ' दो साल का काम ' अशीं त्या पुस्तकांचीं नांवें आहेत. कताई-गणित भाग १, २, नई तुनाई ( दास्ताने ), धनुष तकवा ( देवधर ) हीं हिंदी पुस्तकेंहि विशेष उपयुक्त आहेत. हिंदुस्थानी तालिमी संघानें गेल्या सहा वर्षांच्या भारतीय कामगिरीचा अहवाल प्रकाशित केला आहे. त्यावरून या प्रयोगाविषयीं व्यवस्थित कल्पना येण्यासारखी आहे.

' वर्धा-शिक्षण ' मासिक पत्रिका बरीच लोकप्रिय झाली होती. त्या पत्रिकेंत जसे बाहेरचे लेख घेतले जात असत, त्याचप्रमाणें त्या पत्रिकेंतील संपादकीय लेखांचे ' सर्वोदय ' ' शिक्षण अने साहित्य ' इत्यादि मासिकांत कांहीं अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. यामुळें ग्रंथरूपानें आज प्रकाशित होत असलेल्या या लेखांचें पुनः महाराष्ट्रांतील शिक्षणप्रेमी जनता स्वागत करील असा मला दृढ भरंवसा आहे.

' जामिया मिल्लिया इस्लामिया '
जामियानगर, दिल्ली
२४ फेब्रुआरी १९४५

—स. ज. भागवत

# अनुक्रमणिका

## साहित्य-खंड

[१]

# बुद्धिविकास विरुद्ध बुद्धिविलास

**महात्मा गांधी**

बुद्धीचा खरा विकास हात, पाय, कान, इत्यादि अवयवांच्या सदुपयोगानेंच होऊं शकतो. अर्थात् शरीराचा ज्ञानपूर्वक उपयोग केल्यानें बुद्धीचा विकास अधिकांत अधिक चांगल्या रीतीनें आणि अधिकांत अधिक लवकर होतो. यांत जर पारमार्थिक वृत्ति मिसळणार नाहीं तर शरीर आणि बुद्धि यांचा विकास एकांगी होतो. पारमार्थिक वृत्ति हें हृदयाचें म्हणजे आत्म्याचें क्षेत्र आहे. त्यामुळें असें म्हणतां येईल कीं, बुद्धीच्या शुद्ध विकासासाठीं आत्मा आणि शरीर यांचा विकास एकाच वेळीं आणि एकसारख्या गतीनें चालला पाहिजे. म्हणून हे विकास एकामागून एक होऊं शकतात असें कोणी म्हणेल तर तें वरील विचारश्रेणीप्रमाणें बरोबर होणार नाहीं.

हृदय, बुद्धि आणि शरीर यांमध्यें मेळ न राहिल्यानें जो दुःसह परिणाम घडून आला आहे तो प्रसिद्ध आहे. असें असतांहि विपरीत संवयीमुळें आपणांस तो दिसत नाहीं. खेड्यांतील लोक पशूंमध्यें वाढल्यानें केवळ शरीराचा उपयोग यंत्राप्रमाणें करतात. बुद्धीचा उपयोग करीतच नाहींत; करावा लागत नाहीं. हृदयाचें शिक्षण नसल्यासारखेंच असतें. यामुळें कशास कांहीं मेळ नाहीं, असलें त्यांचें जीवन चाललें आहे. दुसऱ्या बाजूला आधुनिक कॉलेजांतील शिक्षण पाहिलें तर तेथें बुद्धीच्या विलासाला विकासाच्या नांवानें ओळखण्यांत

येतें. बुद्धीच्या विकासाशीं शरीराचा कांहीं संबंध नाहीं असें समजलें जातें. पण शरीराला व्यायाम तर पाहिजेच. त्यामुळें उपयोगशून्य व्यायामांनीं तें निभावून नेण्याचा मिथ्या प्रयोग चालतो. पण चोहों बाजूंनीं मला एकसारखा पुरावा मिळत आहे कीं, शाळांमधून पसार झालेले विद्यार्थी मजुरांची बरोबरी करूं शकत नाहींत. जरा मेहनत केली कीं, डोकें दुखूं लागतें; आणि उन्हांत फिरावें लागलें कीं, चक्कर येते. ही स्थिति स्वाभाविक मानण्यांत येते. हृदयाच्या वृत्ति पडीत शेतांत गवत उगवतें त्याप्रमाणें आपोआप उदय पावतात व कोमेजून जातात आणि ही स्थिति दयाजनक समजण्याऐवजीं स्तुतिपात्र समजली जाते.

याच्या उलट जर बाळपणापासून मुलांच्या हृदयवृत्तींना योग्य तें वळण मिळेल, त्यांना शेती, चरखा इत्यादि उपयोगी कामांत गुंतविलें जाईल आणि ज्या उद्योगाच्या द्वारें त्यांचें शरीर कसेल त्या उद्योगाची उपयोगिता आणि त्याच्यासाठीं वापरल्या जाणाऱ्या साधनादींची बनावट इत्यादींचें ज्ञान देण्यांत येईल तर बुद्धीचा विकास सहज सिद्ध होईल; आणि त्याची नित्य कसोटी लागेल. असें करीत असतां ज्या गणितशास्त्रादिकांच्या ज्ञानाची आवश्यकता असेल तें देत गेलें आणि चित्तरंजनासाठीं साहित्यादींचें ज्ञान देत गेलें तर तीनहि गोष्टींची समतोलता साधेल आणि कोणतेंहि अंग विकासरहित राहणार नाहीं. मनुष्य म्हणजे केवल बुद्धि नव्हे, केवळ शरीर नव्हे, केवळ हृदय किंवा आत्मा नव्हे. तिघांच्याहि एकसारख्या विकासांत मनुष्याचें मनुष्यत्व सिद्ध होतें. यांत खरें अर्थशास्त्र आहे. याप्रमाणें जर तीनहि विकास एकदम होतील तर आपणांला पडलेलीं कोडीं सहज उकलतील. हा विचार किंवा याची अंमलबजावणी स्वातंत्र्य मिळाल्यानंतर होणार आहे असें मानणें भ्रमात्मक असण्याचा संभव आहे.

कोट्यवधि माणसांना तर असल्या कामांत गुंतविल्यानेंच स्वातंत्र्याचा दिवस आपणांला जवळ आणितां येईल.

—‘ हरिजनबंधु ’ वरून

[ २ ]

## शिक्षणाचा आदर्श

श्री· रवीन्द्रनाथ ठाकुर

मनुष्याच्या शारीरिक आणि मानसिक सर्व प्रकारच्या शक्तींमध्यें परस्पर एक अखंड संबंध आहे. त्या परस्परांच्या सहकार्यानें सबल होतात.

दुर्दैवानें प्रचलित शिक्षणपद्धतींत आपण सामान्य पुस्तकांत लिहिलेल्या कांहीं विषयांची निवड करतों आणि जीवनांतील बाकीच्या साऱ्या ज्ञानाचा त्याग करतों. पाश्चात्य देशांतील विद्यालयांत ज्या उणीवा राहतात त्या बाहेरच्या जीवनाचे द्वारा पूर्ण होतात. परंतु आपल्या देशांत शाळा—कॉलेजांच्या बाहेर शिक्षणाची जागा अथवा शिक्षणाचें साधन मुळीं नाहींच असें म्हटलें पाहिजे. यास्तव विद्यार्थी जी विद्या केवळ टिप्पणी घेऊन अथवा घोकंपट्टी करून संपादन करितात ती त्यांच्या बुद्धीवर जितका भार लादते तितका तिचा विकास करीत नाहीं.

शारीरिक शिक्षण जर साथ करणार नाहीं तर बौद्धिक शिक्षणाच्या प्रगतींतहि तीक्ष्णता येत नाहीं. आपणांला नेहमीं विद्यालयांतून पुष्कळसे विद्यार्थी जडबुद्धीचे आणि उदासीन दिसून येतात. याचें एकमेव कारण हेंच आहे कीं, शिक्षणक्रमांत त्यांच्या शरीराच्या

गरजांना कांहीं स्थानच नसतें. या अनादरामुळें त्यांच्या बुद्धींत हें दैन्य निर्माण होतें.

शारीरिक शिक्षण म्हणजे खेळ, कवाईत असा माझा आशय नाहीं. शरीराशीं ज्यांचा संबंध आहे अशा सर्व कामांचें शिक्षण मला उद्दिष्ट आहे. या शिक्षणानें शरीर सुशिक्षित होतें आणि त्याची जडता नाहींशी होते. असलीं कामें व्यवस्थितपणें केल्यानें देहाशीं मनाचा संयोग प्रस्थापित होतो, आणि या संयोगामुळेंच दोघांच्याहि विकासाला मदत होते.

मला असें वाटतें कीं, आपल्या शिक्षणपद्धतींत प्रत्येक विद्यार्थ्याला कोणत्या ना कोणत्या तरी हस्तव्यवसायांत शक्य तोंवर चांगलें कुशल बनविलें पाहिजे. याचा मुख्य उद्देश केवळ औद्योगिक शिक्षण नव्हे. खरी गोष्ट अशी आहे कीं, असल्या एकाद्या शारीरिक कलेच्या शिक्षणानें मनुष्याचें शरीर सजीव आणि सतेज बनतें. ज्या विद्यार्थ्यांना आपण बुद्धिहीन अथवा जड बुद्धीचे समजतों त्यांची सुप्त असलेली बुद्धिशक्ति बहुधा या शरीराच्या अथवा हस्तव्यवसायाच्या शिक्षणानें जागृत होते. शरीराचें अशिक्षण मनाच्या शिक्षणाचें सामर्थ्य हिरावून घेतें. याशिवाय ज्याला शरीराचें शिक्षण मिळालेलें नाहीं तो केवढाहि पंडित झाला तरी त्याला जगांतील पुष्कळशा बाबतींत दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागतें. तो अपूर्ण मनुष्य होय. आपण आपल्या बालकांना या अपूर्णतेपासून वांचविलें पाहिजे. यांत आपणांला कित्येक संशयात्म्यांकडून विरोध अवश्य होईल. पण या विरोधाकडे लक्ष देणें योग्य नाहीं.

माझा असा दृढ विश्वास आहे कीं, शरीराच्या शिक्षणाशीं मनाच्या शिक्षणाचा आणि शरीराच्या कार्यप्रवणतेशीं मनाच्या कार्यप्रवणतेचा

गाढ संबंध आहे. या दोहोंमध्यें चांगला मेळ राहिला नाहीं तर आपल्या जीवनाचा छंद देखील तुटून जातो.

—' नई तालीम ' वरून.

[ ३ ]

## समान संस्कृतीची साधना

**श्री. शं. द. देव**

वर्धा–शिक्षणाचा जो मीं थोडा विचार केला व जें थोडें त्याचें प्रात्यक्षिक पाहिलें त्यावरून मला असें वाटूं लागलें आहे कीं, ही इतकी सहज व सुंदर शिक्षणपद्धति यापूर्वी कशी कोणाच्या लक्षांत आली नाहीं ? वर्धा–शिक्षण म्हणजे जीवनद्वारा शिक्षण. जीवनाचा परिपोष करून त्याला सहजसुंदर व सुखी करावयाचें हा शिक्षणाचा मुख्य हेतु असला पाहिजे. म्हणून हा हेतु जीवनद्वाराच शिक्षण देण्यानें जितका सफल होईल तितका अन्य कोणत्याही साधनद्वारा होणें शक्य नाहीं.

समाजांत समानता उत्पन्न करावयाची असेल तर त्याच्या निर-निराळ्या अंगांत समान संस्कृति पाहिजे. वर्धा-शिक्षणामध्यें समाजांत ही समान संस्कृति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे असें मला वाटतें. वर्धा-शिक्षण आमच्या समाजांतील ऐक्याचा प्रश्न सोडवूं शकेल. ज्या जीवाला जीवनांतील जें अंग आकर्षक वाटेल त्या अंगाच्या द्वारा त्या जीवाचा विकास होण्याची व्यवस्था झाली तर मानवी जीवनशक्तीचा अपव्यय थांबून ती शक्ति समाजाच्या सर्व अंगांत सारखी खेळेल.

[ ४ ]

## वर्धा–योजनेचें वैशिष्ट्य

**श्री. विनोबाजी**

माती आणि मडकें एक कीं दोन ? दोन म्हणाल तर आमची माती आम्हांला परत द्या, आपलें मडकें परत घेऊन जा. एक म्हणाल तर पलीकडे मातीचा ढीग पडला आहे, भरा पाणी. मातीच्या आणि मडक्याच्या ह्या संबंधाला ‘ समवाय ’ म्हणतात. वर्धा-शिक्षणपद्धतीला मीं ‘ समवाय-पद्धति ’ हें नांव दिलें आहे. कारण ह्या पद्धतींत उद्योग आणि शिक्षण ह्या दोहोंचा असा ‘ समवाय ’ गृहीत आहे.

मुलांचें सर्व शिक्षण एखाद्या मूळ उद्योगावर उभारायचें. उद्योगानें शिक्षणाला ऊब द्यायची, शिक्षणानें उद्योगावर प्रकाश पाडायचा. ह्याचें नांव ‘ समवाय–पद्धति.’

औद्योगिक शिक्षण वेगळें. त्यांत केवळ उद्योग शिकवला जायचा. तो मातीचा ढीग. पुस्तकी शिक्षण वेगळें. त्यांत केवळ ‘ ज्ञान ’ दिलें जायचें. तें मडक्याचें चित्र. पाहून घ्यावें. पाणी भरायचें कामच नाहीं. केवळ उद्योग किंवा केवळ ज्ञान देणाऱ्या पद्धतीला आपण ‘ केवळ–पद्धति ’ म्हणूं.

कांहीं वेळ उद्योग आणि कांहीं वेळ शिक्षण, हेंहि वेगळें. ह्याला आपण ‘ समुच्चय–पद्धति ’ म्हणूं. हींत उद्योग आणि शिक्षण ह्यांची नुसती बेरीज आहे. माती + पाणी म्हणजे मडकें नव्हे. दोन्हीं एकत्र मिसळून त्यांत कुंभाराची कला ओतून मडकें तयार होत असतें.

‘ केवळ ’ आणि ‘ समुच्चय ’ ह्या दोहोंहून वेगळी एक ‘ संयोजन ’

नांवाची पद्धतीहि शिक्षणशास्त्रज्ञांनीं काढलेली आहे. या पद्धतींत ‘ कर्मद्वारा ज्ञान ’ हें समवाय-पद्धतीचें सूत्र घेतलेलें असतें; पण त्यांत कर्मोला गौणत्व असतें. कांहीं तरी प्रत्यक्ष कृति करवून घेतल्यावांचून मुलें केवळ ज्ञानाचें ओझें उचलूं शकत नाहींत. म्हणून निरनिराळ्या विषयांसाठीं निरनिराळीं लहानमोठीं संयोजनें योजायचीं आणि तद्‌द्वारा ज्ञान द्यायचें अशी या संयोजन-पद्धतींत दृष्टि असते. पण तिच्यांत आणि समवाय-पद्धतींत पुष्कळच अंतर आहे. समवाय पद्धतींत कोणता तरी एक जीवनव्यापी आणि विविध अंगें असलेला मूळ उद्योग शिक्षणाचें द्वार म्हणून स्वीकारलेला असतो. सदर उद्योगाच्या द्वारें ( १ ) मुलाच्या सर्व शक्ति विकसित करणें, ( २ ) मुलाला जीवनोपयोगी विविध ज्ञान देणें आणि ( ३ ) मुलाला एक आजीविकेचें समर्थ साधन पुरवणें, असा तिहेरी उद्देश असतो. सदर उद्देशाच्या सिद्धीचा एक लहानसा पण महत्त्वाचा पुरावा म्हणून मुलांच्या उद्योगांतून शाळेच्या खर्चाचा अमुक एक हिस्सा मिळावा अशी अपेक्षा केली जाते.

सारांश, समवाय–पद्धति ही प्रचलित सर्व शिक्षणपद्धतींहून वेगळी आणि आतांपर्यंतच्या अनुभवांची निष्कर्षरूप अंतिम परिणति आहे.

ह्या पद्धतींत मूलाधार म्हणून जो उद्योग निवडायचा तो व्यापक आणि विविधांग असला पाहिजे हें वर सांगितलेंच आहे. अशा मूळ उद्योगांपैकीं हिंदुस्थानच्या सांप्रतच्या स्थितींत शेंकडा ८० शाळांतून सुरू होऊं शकणारा उद्योग, माझ्या दृष्टीनें, कांतण्याचा आहे. अर्थात् ७ वर्षांपासूनचीं लहान मुलें लक्षांत घेऊन हें म्हणायचें.

–‘ मूळ उद्योग–कांतणें ’ यांतून.

[५]

## वर्धा-योजनेची जीवनदृष्टि

**आचार्य कृपालानी**

एकाद्या शिक्षणपद्धतीनें व्यक्तीमध्यें अथवा समाजामध्यें आमूलाग्र बदल होऊन त्याची सुधारणा होते कीं काय? अथवा जगांतील कोणत्याहि शिक्षणपद्धतीनें संपूर्णतया न बदलणाऱ्या अथवा नाहींशा न होणाऱ्या स्वाभाविक प्रवृत्ति व्यक्तीच्या ठिकाणीं असतात कीं काय? या प्रश्नांच्या चर्चेत न शिरतां व्यक्तीची सुधारणा करणारा आणि समाजाला दिशा दाखविणारा एक महत्त्वाचा विषय म्हणजे शिक्षण, असा सामान्य माणसालाहि पटणारा मधला मार्ग आपणांला स्वीकारितां येईल. प्रत्येक सामाजिक घटकाचें स्वतःचें असें एकादें ध्येय असतें—मग त्याची त्याला जाणीव असो अथवा नसो. या ध्येयानुसार त्याच्या शिक्षणालाहि वळण लागत जातें. विद्यार्थ्यांचें चारित्र्य घडवितांना शिक्षकाला या ध्येयाची प्रगति व परिपूर्ति कशी होईल याची अखंड जाणीव असली पाहिजे. ध्येय आणि पद्धति यांमध्यें कांहीं एक आवश्यक संबंध असतो हें खरें असलें तरी भिन्न भिन्न शिक्षणपद्धतींच्या साह्यानें हें ध्येय प्राप्त होण्यासारखें असतें. ध्येय कोणतेंहि असलें तरी पद्धति मात्र तत्त्वशुद्ध, मानसशास्त्राला धरून व कार्यक्षम असली पाहिजे. त्याचबरोबर ती सुलभ व स्वाभाविक असणेंहि आवश्यक आहे. तथापि कांहीं शिक्षणपद्धति विशिष्ट सामाजिक ध्येयांच्या दृष्टीनें इतर पद्धतींपेक्षां अधिक उपयुक्त असतात. याकरितां आपल्या राष्ट्रासाठीं जें सामाजिक ध्येय असावें असें गांधीजींना वाटतें, त्या ध्येयाच्या अनुरोधानें गांधीजींनीं शोधून

काढलेल्या अभिनव शिक्षणपद्धतीचा परामर्ष घेणें अप्रस्तुत होणार नाहीं.

× × ×

एकादा समाज स्वतःचें जें उद्दिष्ट ठरवितो तें त्यांतील व्यक्तींच्या ध्येयाशीं पूर्ण जुळणारें असतें. व्यक्तीचें आदिरूप व तिचें भवितव्य यांचा व्यक्तीच्या ध्येयावर महत्त्वाचा परिणाम घडून येतो. व्यक्तीचा जन्म ईश्वरी तत्त्वापासून झाला आहे असें गांधीजींचें स्पष्ट मत आहे. त्याचप्रमाणें ईश्वररूप होणें हेंच तिचें भवितव्य आहे असें ते मानितात. म्हणूनच व्यक्तीचें उद्दिष्ट आध्यात्मिक असावें, भौतिक असूं नये, हें स्पष्ट आहे. हें साध्य करावयाचें असेल तर व्यक्तीला स्वतःच ध्येयरूप किंवा साध्यरूप बनलें पाहिजे; ती 'साधन' म्हणून उपयोगांत आणिली जातां कामा नये. समाजांतील इतर घटकांनीं अथवा स्वतः समाजानेंहि आपला 'साधन' म्हणून उपयोग करूं नये एतदर्थ व्यक्तीनें झटलें पाहिजे. व्यक्तीला आपलें दैवी भवितव्य समाजांतच प्राप्त करून घेणें भाग आहे. पण स्वतःचें सर्वोच्च ध्येय एकाद्या विशिष्ट सामाजिक व्यवस्थेमुळें साध्य करून घेणें अवघड झालें, तर त्या व्यवस्थेचा प्रतिकार करून स्वतःसाठीं अभिनव मार्ग निर्माण करणें हा तिचा केवळ अधिकारच नव्हे तर कर्तव्यहि होय. येवढी दक्षता मात्र घेण्यांत यावी कीं, हा प्रतिकार केवळ व्यक्तीसाठींच नसून सामाजिक प्रगतीसाठींहि असावा.

× × ×

आध्यात्मिक पायावर उभारलेल्या समाजांतच व्यक्तीला पूर्णत्व मिळवितां येणें शक्य आहे असें गांधीजींचें मत आहे. अशा प्रकारचा समाज व्यक्तीला दैवी भवितव्याकडे घेऊन जाणाऱ्या तत्त्वांवर

आधारला गेला पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें तर प्रेम, अहिंसा, सत्य व न्याय हीं तीं तत्त्वें होत. या तत्त्वांवर आधारलेल्या समाजव्यवस्थेंत आर्थिक, सामाजिक, राजकीय, किंबहुना धार्मिक पिळणुकीला मुळींच थारा नाहीं. आर्थिक क्षेत्रांतच तेवढी पिळणूक होते, असें मुळींच नाहीं. निरनिराळ्या क्षेत्रांमधून सत्ताधिकार मिळवितां येणें शक्य असतें; आणि दुर्दैवी व निर्बल लोकांची विविध प्रकारांनीं गांजणूक करण्याकडे तिचा दुरुपयोग करितां येतो.

× × ×

यास्तव गांधीजींना जी समाजव्यवस्था निर्माण करावयाची आहे ती आर्थिक, सत्तामूलक अथवा अन्य कोणत्याहि प्रकारच्या पिळणुकीपासून पूर्ण अलिप्त असणें अवश्य आहे. अर्थात् हें साध्य करून घ्यावयाचें असेल तर समाजाचें राजकारण, त्याचें अर्थकारण आणि सामाजिक जीवन या सर्व गोष्टी अहिंसा, सत्य व न्याय या तत्त्वांवर आधारल्या गेल्या पाहिजेत. यांच्यापैकीं एकादें तत्त्व नसेल तर आणि तें ज्या प्रमाणांत नसेल त्या प्रमाणांत पिळणूक निःसंशय राहणार. ज्या ज्या वेळीं पिळणूक चालू असेल त्या त्या वेळीं मनुष्यांतील दैवी अनुभाव ( dignity ) लयाला जातो, तो केवळ 'साधन' बनतो, आणि त्याचें स्वतः–सिद्धत्व केवळ नष्ट होतें. यासाठीं गांधीजी सत्ता, सामाजिक मानमान्यता व भौतिक संपत्ति या गोष्टी थोड्या लोकांच्या हातीं ठेवण्याच्या पूर्ण विरुद्ध आहेत.

× × × ×

म्हणून भांडवलशाही समाजघटनेंतील अनवस्था उत्पन्न करणारा निरंकुश व्यक्तिवाद आणि कम्युनिस्ट समाजपद्धतींतील सत्तेचें घातुक केंद्रीकरण या दोनहि गोष्टी टाळण्यासाठीं ज्यामुळें केंद्रीकरण

होऊं शकणार नाहीं अशा प्रकारच्या शेतीभातीवर व उद्योगधंद्यांवर आर्थिक व सामाजिक जीवन आधारण्याचा गांधीजींचा संकल्प आहे; आणि हें ध्येय साध्य करून घेण्यासाठीं मर्यादित खाजगी मालमत्तेच्या साह्यानें चालणाऱ्या घरगुती व ग्रामीण उद्योगधंद्यांचा ते स्वतः पुरस्कार करितात. रशियन सुधारकांपेक्षां या बाबतींत गांधीजींचें वर्तन मानवी इतिहास व मनोरचना यांना अधिक अनुसरून आहे हें उघड आहे. परंतु खाजगी मालमत्तेपासून अधिकांत अधिक भौतिक व नैतिक स्वरूपाचे फायदे समाजाला मिळावयाचे असतील तर वारसाहक्काच्या कायद्यानुसार वंशपरंपरा अखंड चालू राहणाऱ्या प्रचंड खाजगी मालमत्तेंत तिचें रूपांतर होऊं देतां कामा नये. ज्यांचें केंद्रीकरण होऊं शकत नाहीं अशा घरगुती व ग्रामीण उद्योगधंद्यांमुळें मोठें भांडवल जमा होण्याला मुळांतच पायबंद बसतो; पण या पायबंदाचा फारसा उपयोग झाला नाहीं तर खाजगी मालमत्तेची अनिवार वाढ होऊं नये म्हणून वारसाहक्कावरील कर व मृत्यूवरील कर यांसारखे कायदेशीर प्रतिबंध निर्माण करण्यास गांधीजी मुळींच कचरणार नाहींत !

परंतु सद्यःकालीन सुधारणेला जे आवश्यक झाले आहेत आणि ज्यांचें केंद्रीकरण अपरिहार्य आहे अशा उद्योगधंद्यांची वाट काय ? असा प्रश्न यावर कोणी विचारतील. यावर गांधीजींचें उत्तर असें आहे कीं, असे उद्योगधंदे सार्वजनिक मालकीचे करावे आणि त्यांच्यावर सार्वजनिक नियंत्रण रहावें. याव्यतिरिक्त शेती व उद्योगधंदे एकमेकांस पूरक व साहाय्यक असे असावे. उद्योगधंद्यांच्या बाबतींत ज्याप्रमाणें गांधीजी फार मोठ्या खाजगी मालमत्तेच्या विरुद्ध आहेत त्याचप्रमाणें ते मोठ्या प्रमाणावरील जमीनदारीच्याहि विरुद्ध आहेत.

× × × ×

कुटुंबसंस्था व कौटुंबिक नीति यांजवरहि गांधीजींचा दृढ विश्वास आहे. कुटुंबसंस्थेंत कोणत्या तरी प्रकारची खाजगी मालमत्ता अभिप्रेत असते. परंतु ही खाजगी मालमत्ता दुसऱ्याला पिळून मात्र मिळविलेली नसली म्हणजे झालें. गांधीजींच्या योजनेनुसार प्रत्येकानें कांहीं ना कांहीं काम अवश्य केलें पाहिजे; बौद्धिक कार्यकर्ता असला तरी त्यानेंहि शारीरिक श्रम—मग ते स्वत:साठीं असोत किंवा समाजासाठीं असोत–केलेच पाहिजेत.

केंद्रीकृत नसलेली शेती व उद्योगधंदे यांविषयींची गांधीजींची विचारप्रणालि उच्च जीवनाला आवश्यक असलेल्या ऐहिक गोष्टी व सुखभोग यांविषयींच्या त्यांच्या कल्पनेवर आधारलेली आहे. सुसंस्कृत, प्रगतिपर व नैतिक अशा जीवनाला भौतिक पदार्थांची कांहीं एका प्रमाणांत आवश्यकता आहे हें गांधीजींना पटतें. भाकरीच्या द्वारांच, शारीरिक गरजा अधिक व्यवस्थित रीतीनें पुरविण्यानें, बहुजनसमाजाला अध्यात्म पोंचवितां येईल असें त्यांनीं कित्येकदां उद्गार काढिले आहेत. अशा प्रकारें शरीर व आत्मा यांचा निकट संबंध आहे यावर त्यांचा विश्वास असला तरी सुखोपभोगाचे पदार्थ केवळ साधनीभूत होत, ते साध्य कधींच होऊं शकणार नाहींत, असें त्यांना वाटतें. विशिष्ट मर्यादेपर्यंत व्यक्तीच्या प्रगतीसाठीं त्यांची आवश्यकता असते; परंतु त्यांचा विलक्षण हव्यास प्रगतीला उपकारक न ठरतां घातक मात्र ठरतो. केवळ इंद्रियांचे चोजले पुरविण्यासाठीं त्यांच्या मागें लागणें हें निःसंशय अपायकारक आहे. कारण, त्यामुळें सदैव वाढत जाणारी आणि कधींहि तृप्त न होणारी अभिलाषा, विषयवासना, सत्तेचा हव्यास व संपत्तीचा डौल दाखविण्याची आवड या गोष्टी उत्पन्न होतात. कामना आणि वासना या कांहीं विशिष्ट मर्यादेनंतर मनुष्याला गुलाम बनवितात. यामुळें त्याच्या स्मृतीचा भ्रंश व बुद्धीचा नाश

होतो. आतां कामना व वासना यांना निरामय भौतिक जीवनाच्या प्रेरणांचें स्वरूप रहात नाहीं. उलट, त्या शरीरावर आपला सर्वतोपरी अंमल चालवूं लागतात. असें झालें म्हणजे मनुष्याची संकल्पशक्ति क्षीण होते व त्याच्या आत्म्याचा नाश होतो. आपल्या आश्रमांतील प्रार्थनेंत प्रतिदिनीं उच्चारल्या जाणाऱ्या गीतेच्या वचनांवर गांधीजींची अमर्याद श्रद्धा आहे.

ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।
सङ्गात्सञ्जायते कामः कामात् क्रोधोऽभिजायते ॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद् बुध्दिनाशो बुध्दिनाशात्प्रणश्यति ॥

म्हणून एकंदर निरामय सामाजिक जीवनासाठीं व योग्य सामाजिक समतोलनासाठीं भौतिक पदार्थांची कामनाच केवळ नव्हे, तर त्यांच्यावरील सत्ताहि पूर्णपणें नियंत्रित केली पाहिजे. बाह्य विषयांच्या बाबतींत ज्यांत केंद्रीकरण होऊं शकणार नाहीं अशा प्रकारचे व्यापार व उद्योगधंदे निर्माण करून आणि आध्यात्मिक गोष्टींच्या बाबतींत भौतिक पदार्थांचा तिरस्कार न करितां उच्च जीवनाच्या अपेक्षेनें त्यांच्या मर्यादा ओळखणारें शिक्षण देऊन ही गोष्ट साध्य करितां येईल. अशा प्रकारचें शिक्षण भौतिक जीवनावर अयोग्य भर देत नाहीं आणि प्रधान वस्तूंनाच प्राधान्य देतें.

आर्थिक संघटनेप्रमाणेंच सामाजिक संघटनाहि अहिंसा, सत्य व न्याय या तत्त्वांवर आधारण्यांत आली पाहिजे. सहकार्याच्या तत्त्वावर आधारलेला आणि जातिरहित व वर्गरहित असा समाज गांधीजींच्या डोळ्यांपुढें आहे. ते शारीरिक श्रमाचा कोणताहि प्रकार हीन अथवा अपमानास्पद मानीत नाहींत. क्षुद्रांतील क्षुद्र कामसुध्दां स्वतःसाठीं

अथवा प्रसंगोपात्त इतरांसाठीं ज्या त्या व्यक्तीनेंच करावयास पाहिजे. त्यांच्या मतें सर्व तऱ्हेचें काम प्रतिष्ठित आहे इतकेंच नव्हे तर, पवित्रहि आहे. प्रत्येक इमानी व भल्या कामकऱ्याला पूर्ण मजुरी मिळावयास पाहिजे हेंच काय, पण त्याला प्रतिष्ठाही मिळावयास पाहिजे. जन्म, संपत्ति अथवा धंदा यांवर आधारलेल्या वर्गांच्या अथवा जातींच्या श्रेणीला यांत जागाच नाहीं. पण असें असलें तरी स्वाभाविक अथवा स्वसंपादित कर्तृत्वानुसार श्रमविभाग व सहकार्य या दोन गोष्टी मात्र अवश्य असल्या पाहिजेत.

राजकारणांतहि हींच तत्त्वें लागू पडतात. राजकीय संबंधांतील नैतिक आदर्श इतर सामाजिक संबंधांतील आदर्शाप्रमाणेंच असले पाहिजेत. सामाजिक क्षेत्रांत एका प्रकारची नीति व राजकीय क्षेत्रांत निराळ्याच प्रकारची नीति अशी स्थिति असतां कामा नये. दोन्ही क्षेत्रांत एकाच प्रकारची शुद्ध व सौजन्य-पूर्ण वागणूक असली पाहिजे. राजकारणांतहि विशिष्ट उद्देश साधण्यासाठीं अवलंबिलेल्या साधनांबद्दल चांगलें जपलें पाहिजे. साध्याच्या भलेपणानें साधनांचा भलेपणा कधींहि सिध्द होऊं शकत नाहीं. साधनें हीं साध्यांइतकींच महत्त्वाचीं आहेत, आणि कांहीं प्रसंगीं तर साधनेंच साध्यांपेक्षां अधिक महत्त्वाचीं ठरतात. राजकीय व्यवहारांत आणि राष्ट्रीय किंवा परराष्ट्रीय संबंधांत मात्स्य-न्याय आचरिला जाऊं नये. लोभ, परस्वापहार व पिळणूक या गोष्टी राजकीय जीवनांतून नष्ट झाल्या तरच हा परिणाम घडवून आणितां येणें शक्य आहे. या ठिकाणींसुद्धां व्यक्तींचा केवळ साधनासारखा उपयोग करण्यांत येऊं नये. ह्या प्रकारच्या समाजविषयक कल्पनेंत राजकीय संबंधांतील द्वेष व हिंसा यांचा उपयोग उत्तरोत्तर निषिद्ध मानिलेला आहे.

गांधीजींचें तत्त्वज्ञान याप्रमाणें कांहीं मूल तत्त्वांवर आधारलेलें आहे हें आपण पाहिलें. या तत्त्वांना अनुसरून त्यांनीं व्यक्ति आणि राष्ट्र यांना मार्गदर्शन करण्यासाठीं व्यापक व सुसंबद्ध असा विधायक आणि लढाऊ कार्यक्रम तयार केला आहे. हीं मूलतत्त्वें आणि हे कार्यक्रम ह्यांच्यामध्यें एकजीवपणाचा संबंध आहे. दोन्ही मिळून एक पूर्ण वस्तु होते. ह्यांना व्यक्ति आणि राष्ट्र यांच्यापासून एका विशिष्ट चारित्र्याची अपेक्षा आहे. या चारित्र्याच्या दृष्टीनें त्यांची शिक्षणाची नवी योजना कल्पिलेली आहे. राजकीय जीवनांत सत्य आणि अहिंसा यांनीं प्रारंभ करून गांधीजींनीं चरखा आणि खादी, अस्पृश्यतानिवारण, हिंदु-मुस्लीम ऐक्य, स्त्रीस्वातंत्र्य ( भौतिक सुखोपभोगांची संधि पुरुषांप्रमाणें स्त्रियांना मिळवून देणारें पाश्चात्य अर्थाचें नव्हे, पण समाजसेवा आणि त्याच्या द्वारां वैयक्तिक विकास यांची समान संधि मिळवून देणारें ), ग्रामोद्योगांचें पुनरुज्जीवन व प्रचार इत्यादींच्या योजना नांवारूपास आणिल्या आहेत. ते आपल्या शिक्षणाच्या नव्या पद्धतीवर येऊन ठेपले आहेत. शेवटीं शिक्षण आलें आहे. स्वाभाविकच आहे, कारण शिक्षण हें क्रियेलाच अनुसरणार. परंतु पूर्वीच्या सर्व कार्यक्रमासाठीं जीवनाच्या संपूर्ण योजनेसाठीं त्याचा उपयोग व्हावयाचा आहे. ह्या न्याय्य, नीतिपूर्ण व सर्व प्रकारच्या पिळणुकीपासून मुक्त अशा समाजांत उद्यांची आपली जागा घेण्याला वाढत्या बालकाला लायक बनविण्याचें काम या शिक्षणाला करावयाचें आहे. अशा समाजाच्या गरजांच्या दृष्टीनें त्याचें चारित्र्य घडविण्यासाठीं हें शिक्षण आहे. गांधीजींच्या समाज-राज्यमंदिराचा हा कळसाचा चिरा आहे.

–' लेटेस्ट फॅड' ' वरून

[ ६ ]

## ग्रामोद्योग आणि समाजजीवन

**रिचर्ड ग्रेग, अमेरिका**

दारिद्र्य व बेकारी यांवर उपाय म्हणून हात-पिंजण, हात-कांतण, हात-विणाई यांचें पुनरुज्जीवन व दुसऱ्या हस्तव्यवसायांचा पुनर्विकास करावा असें गांधीजी सुचवितात. पाश्चात्य देशांत व पाश्चात्य शिक्षण घेतलेल्या व शहरी राहणीचा परिचय झालेल्या हिंदी लोकांकडून हिंदुस्तानांतहि, या सूचनेची इतक्या मोठ्या प्रमाणावर हेटाळणी चालू आहे कीं पाश्चात्य कल्पनांच्या परिभाषेंतच त्या सूचनेंतील तर्कशुद्धतेचें विवेचन करावें असा माझा विचार आहे.

हिंदुस्थानांतल्या ऋतुमानामुळें म्हणजे थोडे महिनेच टिकणारा पण सलग असा पाऊसकाळ व नंतर लांबलचक असा उन्हाळा अशा प्रकारच्या विभागणीमुळें देशभर तीन ते सहा महिने असे असतात कीं, शेतकऱ्यांना अगदीं स्वस्थ बसावें लागतें. ही गोष्ट हिंदुस्थानांत चांगली ज्ञात आहे, पण बाहेर ती क्वचितच कोणाला ठाऊक असेल. उन्हाळ्याच्या कडाक्यांत कठीण झालेली जमीन नांगरतां येत नाहीं. पेरणी अथवा कांपणी तर नसतेच. आणि हिंदुस्थानांतल्या शेतांत व रानांत खपणारे असे सुमारें १२,००,००,००० लोक असल्यामुळें या हंगामी बेकारीचें प्रमाण, मुळांतच व लोकसंख्येच्या मानानेंहि फार प्रचंड असें आहे. त्यायोगानें आर्थिक नुकसानाहि अतोनात होऊन जें मानासिक व नैतिक नैराश्य त्यामुळें येतें तें भयंकर असतें. पाश्चात्य देशांतून गिरणीचें कापड येऊं लागण्यापूर्वी हा फावला वेळ शेतकरी सूत कातण्यांत, स्वतःचे कपडे विणण्यांत व

इतर जोडधंदे करण्यांत घालवीत असत. आजसुद्धां हिंदुस्थानांत वापरण्यांत येणाऱ्या कापडापैकीं सुमारें एक तृतीयांश कापड हातमागावरच विणलें जात आहे. हिंदुस्थानांत बहुतेक प्रत्येक प्रांतांत कापूस पिकतो. या हातमागाची किंमत शेतकऱ्याच्या निकृष्ट मिळकतीला झेपेल अशी असते. हस्तव्यवसायांची परंपरा अद्यापि लुप्त झालेली नाहीं. हातबनाईच्या कापडाची किंमत गिरणीच्या कापडापेक्षां फारशी अधिक नसते, व जे स्वतःचें सूत कांततात त्यांना तर ती कमीच पडते. लोकसंख्येपैकीं बहुतेकांचा वस्त्रप्रावरणावरील खर्च एकंदर राहणीच्या एक पंचमांशापासून एक षष्ठांशापर्यंत भरतो. एकंदर खर्चाच्या एक दशांशाइतकी बचत झाली—व ती या मार्गानें विशेष ताण न पडतां होणें शक्य आहे—तर अगदीं हातावर पोट असणाऱ्या लोकांना ती फार मोठी मदत होईल. असे हस्तव्यवसाय फक्त आर्थिक दृष्टयाच मोलाचे असतात असें नव्हे. आशा, उभारी, स्वाभिमान व स्वावलंबन ह्या सर्वांची, दीर्घकालीन बेकारी व दारिद्र्य यामुळें जी वाताहत उडालेली असते ती पुनरपि प्रस्थापित करण्याचें कार्य नकळत पण फार जोमदार रीतीनें हस्तव्यवसायांच्या साहाय्यानें साध्य होतें. हस्तव्यवसायांच्या अंगीं असलेली ही शोधनाची व रोपणाची शक्ति आधुनिक मानसवेत्त्यांना चांगली पटली असून ‘ व्यावसायिक उपचार–पध्दति ’ या नांवानें मानसिक रोग व विशेषेंकरून मन शिथिल करून टाकणाऱ्या वेडेपणावर उपाय म्हणून या व्यवसायांची योजना सर्वत्र होत आहे. अतएव हिंदुस्थानांतील बेकारी नष्ट करण्याचा उपाय म्हणून हस्तव्यवसाय पुनरुज्जीवित करण्याची ही योजना प्रथमदर्शनीं वाटते तितकी वेडगळपणाची नाहीं.

तरीहि अनेक लोक या कल्पनेची टर उडवितात, आणि ही

परागति आहे, हा कालविपर्यास आहे, घड्याळाचे कांटे उलटे फिरविण्याचा यांत प्रयत्न आहे, श्रमविभागाचें जें अत्यंत फलदायी तत्त्व त्याचा त्याग करण्याप्रमाणें आहे, यंत्रें व विज्ञान यांना भिरकावून देण्यासारखें आहे, असें त्यांचें म्हणणें असतें.

कोणतीहि व्यवसायपध्दति तिचा अवलंब ज्या समाजाकडून करण्यांत येतो, त्या समाजाच्या कल्याणाकरितां असते असें समजण्यास प्रत्यवाय नाहीं. ती जर समाजांतील मोठ्या गटाला हितकर होत नसेल, तर स्वतःची आर्थिक स्थिति खरोखरच सुधारील अशा दुसऱ्या कोणत्या तरी व्यवसायपध्दतीचा अंगीकार करण्यांत कसलाच मूर्खपणा नाहीं. स्वीकृत व्यवसायपध्दति लक्षावधि लोकांना त्यांच्या गरजा पुरविण्यासाठीं समर्थ होईनाशी झाली, म्हणजे त्या लोकांचा मार्ग खुंटल्याप्रमाणें होतो. अशा परिस्थितींत त्यांनीं स्वतःच्या काबूंत ठेवितां येईल असा मार्ग आढळेपर्यंत मागें मागें सरत न जाणें हा मूर्खपणा ठरेल. आर्थिक व्यवस्थेचें घड्याळ त्यांच्यापुरतें तरी बंद पडल्यासारखेंच होतें. मग कोणत्याहि गतीनें का होईना जी व्यवसायपध्दति स्वतःच्या मुख्य गरजा प्रत्यक्षपणें भागवूं शकेल ती स्वीकारणें म्हणजे घडयाळ मागें फिरविणें नव्हे, तर तें पुन्हां सुरू करणें होय. हस्तव्यवसायापेक्षां आधुनिक युध्देंच अधिक परिणामकारक रीतीनें घडयाळाचे कांटे उलटे फिरवितील. तरीहि युध्दासाठीं एकाहून एक प्रचंड अशा रकमा राजकारणी पुरुष खर्च करीतच आहेत. आणि त्या गोष्टीला बहुतेक सगळे यंत्रशास्त्रज्ञ व इतर " सुशिक्षित " लोक मान्यता देत आहेत.

हस्तव्यवसाय सुरू होते त्यावेळीं व्यवसायाचें जें समाजासंबंधींचें कार्य होतें, तें आधुनिक यंत्रपद्धतीनें अधिक खालच्या दर्जावर आणून ठेविलें. हस्तव्यवसायांच्या काळांतल्यापेक्षां हल्लींच्या आमच्या नैतिक

आचरणांतील सुसंबद्धता फारशी पुढें गेलेली नाहीं. मानव-समाज हा एकदेही आहे हें न उमगण्याचा व तदनुरूप आचरण न करण्याचा, आणि तो एकदेहीपणा दैनंदिन व्यवहारांत व व्यवसायांत व्यक्त होईल अशा पध्दती, अवजारें व विनिमयांचीं साधनें पसंत न करण्याचा निर्बुद्धपणा जेव्हां आमच्या बापजाद्यांनीं व आम्हीं केला तेव्हांच आमची खरी " पीछेहाट " झालेली आहे.

हस्तव्यवसायांचा स्वीकार केला म्हणजे श्रमविभागाचें तत्त्व सोडून दिलें आहे असें नव्हे. पूर्णपणें स्वयंचालित आणि अंशतः स्वयंचालित यंत्राच्या योगानें तें तत्त्व थोडेंफार पुराणें झालें आहे. दुसऱ्याहि कांहीं कारणांमुळें तें तत्त्व कांटेकोरपणानें लागू करणें शक्य राहिलेलें नाहीं. कारण, त्याच्यासाठीं आवश्यक अशा दोन बाबतींत बदल झालेला आहे. एक म्हणजे पूर्वीच्या मोठ्या बाजारपेठा संकोच पावल्या आहेत. आणि दुसरें म्हणजे कामगार, व्यवस्थापक व भांडवलदार यांच्यामधील पूरक साहाय्याची वृत्ति, परस्परावलंबित्व व सुसंगति हीं कमी झालीं आहेत. श्रमविभागाच्या तत्त्वाची कल्याणप्रदताहि मर्यादित असून त्या मर्यादासुध्दां अलिकडे आक्रसलेल्या आहेत.

गांधीजींची योजना विज्ञान वा यंत्रसामग्री यांना त्याज्य समजत नाहीं. सध्यां वापरण्यांत न येणाऱ्या मानवी शक्तीच्या संचयाशीं-बेकारांशीं-साध्या यंत्रसामग्रीला निगडित करण्याचें कार्य ती योजना करीत आहे. जनतेच्या आर्थिक व सामाजिक परिस्थितीशीं जुळते म्हणून विशिष्ट प्रकारची यंत्रसामग्री पसंत करण्यांत आली असून, आधींच फार मोठ्या अडचणीच्या कालांत आणखी अवघड अशा सामाजिक व आर्थिक प्रश्नांची भर या विशिष्ट यंत्रसामग्रीमुळें पडणार नाहीं म्हणूनहि ती पसंत करण्यांत आली आहे.

सांप्रतकाळीं सर्व राष्ट्रांतून युध्दसामग्री व लष्करी कामें यांच्या खातीं सरकारी खजिन्यांतून एकसारखी वाढती रक्कम खर्चीं पडत असून त्यामुळें सर्वसामान्य राहाणीचें मान एकसारखें घसरत चाललें आहे व शिक्षण, आरोग्य इत्यादि सार्वजनिक सेवेच्या खात्यांना काट बसत आहे. अर्थव्यवहाराच्या पद्धतीला पडता काळ आला आहे. कारण कांहींहि असो, पाश्चात्य देशांत समाजाची अखंड अशी परागति व विघटना होत चालली असून वेडेपणा, आत्महत्त्या व गुन्हे यांची वाढ झालेली दिसत आहे. आणखी एक जागतिक युद्ध ओढवलें, तर हस्तव्यावसायिक उपचारांची मानवजातीला मोठ्या प्रमाणावर आवश्यकता भासूं लागेल; खादी व अन्य सर्व प्रकारचे हस्तव्यवसाय सगळीकडच्या जनतेच्या दृष्टीनें आर्थिक पद्धति म्हणून व उपचारपद्धति म्हणून अधिकच मोलाचे ठरतील.

तसेंच सर्व यंत्रपूर्ण देशांतील लोकसंख्या झपाट्यानें घटण्याच्या बेतांत आहे, ही गोष्टहि आपण दृष्टीआड करतां कामा नये. या संबंधींचा संगतवार पुरावा कारसॉंडर्स, कुकझिन्स्कि, टी. एच्. मार्शल, एनिड चार्लस, एच्. डी. हेंडरसन, अर्नोल्ड प्लान्ट व हॉगबेन यांच्या-सारख्या अधिकारी व्यक्तींनीं मांडलेला आहे. लोकसंख्या घटल्यामुळें व विशेषेंकरून पाश्चात्य देशांत ती घटल्यामुळें जे प्रचंड आर्थिक व सामाजिक परिणाम होतील ते फार दुर्लंघ्य व जगद्व्यापी असे होतील. याहि कारणास्तव हस्तव्यवसायांचा, विशेषेंकरून खादीचा अतिशय उपयोग होणार आहे.

[ सर सर्वपल्ली राधाकृष्णन् यांनीं महात्मा गांधींच्या ७० व्या वाढदिवसा-निमित्त जगांतील विख्यात पुरुषांच्या लेखांचा एक ग्रंथ प्रकाशित केला होता. पुण्याच्या 'सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाले' नें त्या ग्रंथाचा मराठी अनुवाद " गांधीजींचें विविध दर्शन " या नांवानें प्रसिद्ध केला असून त्यांतील एक लेख येथें दिला आहे. ]

# [७]

# मूलोद्योगी राष्ट्रीय शिक्षण

स. ज. भागवत

" My plan to impart Primary Education through the medium of village-handicrafts like Spinning and Carding etc., is thus conceived as the spear-head of a silent social revolution fraught with the most far-reaching consequences. It will provide a healthy and moral basis of relationship between the city and the village and thus go a long way towards eradicating some of the worst evils of the present social insecurity and poisoned relationship between the classes. It will check the progressive decay of our villages and lay the foundation of a juster social order in which there is no unnatural division between the 'haves' and 'have-nots' and everybody is assured of a living wage and the right to freedom."

—महात्मा गांधी

म. गांधींनीं मूलोद्योगाच्या द्वारा मुलांना शिक्षण देण्याची योजना राष्ट्रापुढें मांडिली या गोष्टीला दोन वर्षें होऊन गेलीं. या काळांत अखिल हिंदुस्थानांत या अभिनव योजनेचा प्रयोग मोठ्या प्रमाणावर चालू झाला आहे. सध्यां या पद्धतीच्या दोन हजारांवर शाळा चालल्या असून एकूण चौदा अध्यापन-केंद्रें काम करीत आहेत. हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ती शिक्षणसमितीनें या योजनेचा स्वीकार केला आहे. नुकतीच पुण्यास 'हिंदुस्तानी तालीमी संघा'तर्फे या योजनेची पहिली अखिल भारतीय परिषद झाली. या परिषदेबरोबरच

या योजनेंतील शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या हस्तव्यवसायांचें आणि शैक्षणिक कार्यांचें एक मोठें प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें. या योजनेसंबंधीं चांगलें साहित्य निर्माण होऊं लागलें असून राष्ट्रांतील अनेक बुद्धिमान् लोक या योजनेचा प्रयोग सहानुभूतीनें अवलोकीत आहेत. हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत अखिल लोकव्यापी आणि संपूर्णतया राष्ट्रीय अशी ही पहिलीच शिक्षणयोजना असल्यामुळें महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाच्या हीरकमहोत्सवप्रसंगीं तिचा थोडा विचार करणें हें विशेष औचित्यपूर्ण होणार आहे.

शिक्षणाचा विचार करावयाचा म्हणजे व्यक्ति आणि समाज यांचे आदर्श आणि त्यांची विद्यमान परिस्थिति यांचा विचार करून विद्यमान परिस्थितींतून इष्ट आदर्श निर्माण होतील अशी पद्धति शोधून काढणें होय. शिक्षण हें व्यक्तिविकासासाठीं असावें कीं समाजसुधारणेसाठीं असावें, असा एक वाद नेहमीं चाललेला दिसतो. वस्तुतः व्यक्ति आणि समाज यांत विरोध असण्याचें कारण नाहीं. निदान या दोघांच्या आदर्शांत तरी अविरोधच असला पाहिजे. व्यक्ति समाजांतच जन्म घेते आणि तिचा विकासहि समाजाच्या सहकार्याशिवाय होऊं शकत नाहीं. समाजसंस्थेचें कार्य व्यक्तींचा संपूर्ण विकास घडवून आणणें हेंच आहे. म्हणून शिक्षणानें व्यक्ति आणि समाज या दोघांचे परस्परसंबंध जाणूनच आपली पध्दति आंखली पाहिजे. व्यक्ति सुखाची, स्वातंत्र्याची आणि ध्येयविषयक प्रगतीची आकांक्षा बाळगते. समाज त्यागाची, शिस्तीची आणि परंपरेची आकांक्षा बाळगतो. या आकांक्षा परस्परविरोधी आहेत अशा समजुतीनें नेहमीं क्रांतिकारक आणि सनातनी यांचे झगडे चालतात. जीवनाच्या आदर्शांत सुख आणि त्याग, स्वतंत्रता आणि नियंत्रितता, प्रगति आणि परंपरा हीं कांहीं विरोधी द्वंद्वें नाहींत. तीं एकमेकांना पोषक आणि आवश्यक आहेत.

शिक्षणानें ह्या आकांक्षांमधील भासमान विरोध नाहींसा करून त्यांची परस्परपूरकता सिध्द करून दिली पाहिजे. जीवनाला आपल्या आदर्शांत अभ्युदय आणि निःश्रेयस या दोघांचीहि सिध्दि करावयाची असते. या दोघांमध्येंहि विरोध नाहीं. अभ्युदयाचें स्वरूप भौतिक असतें आणि निःश्रेयस ही नैतिक वस्तु आहे हें खरें असलें, तरी भौतिक आणि नैतिक या एकाच जीवनाच्या दोन अवस्था आहेत. यामुळें त्यांच्यामध्यें परस्परावलंबित्व आणि परस्परपूरकत्व आहे. विशिष्ट भौतिक अवस्थेंत विशिष्ट नैतिक अवस्था निर्माण करण्याचें सामर्थ्य असतें. त्याचप्रमाणें विशिष्ट नैतिक मूल्यें विशिष्ट भौतिक घटना निर्माण करूं शकतात. शिक्षणानें जीवनाच्या ह्या दोनहि अवस्थांचें सम्यक् आकलन करून आपल्या पध्दतींत त्यांना यथार्थ स्थान मिळवून दिलें पाहिजे. शिक्षणाला जीवनाची घडण करावयाची असल्यामुळें जीवनाच्या साऱ्या क्षेत्रांशीं शिक्षणानें आपला संबंध जाणला आणि जोडला पाहिजे. व्यक्ति आणि समाज यांच्या जीवनांत ज्या ज्या आकांक्षा निर्माण होतात, त्या सर्वांचें प्रतिबिंब शिक्षणांत अवश्य पडलें पाहिजे. यासाठीं शिक्षण हें जीवनाच्या अनेक शास्त्रांतील एक शास्त्र असें समजून चालणार नाहीं. शिक्षण हें जीवनाचें एकमेव शास्त्र आहे. शिक्षणाच्या सार्वभौम छत्राखालीं जीवनाच्या अंगोपांगांच्या सर्व शास्त्रांनीं आपला संसार चालविला पाहिजे. आर्थिक, सामाजिक, राजकीय, नैतिक आणि आध्यात्मिक या सर्व जीवनव्यापारांशीं शिक्षणानें आपला अखंड संबंध राखला पाहिजे. जुन्या काळीं जीवनावर अशी सार्वभौम सत्ता चालविणाऱ्या शास्त्राला धर्मशास्त्र असें म्हणत असत. तें वस्तुतः त्या काळचें शिक्षणशास्त्रच होतें. आधुनिक युगांत धर्मकल्पनेला पुष्कळच विकृत

स्वरूप आलें असल्यामुळें धर्मशास्त्राचा व्यापक अधिकार कित्येक विचारवंतांच्या बुद्धीला पटत नाहीं. तथापि, त्यांना शिक्षणशास्त्राची वरील कल्पना मान्य होत चालली आहे. शिक्षण हा आधुनिक युगाचा धर्म झाला असून शिक्षणशास्त्राला धर्मशास्त्राची थोरवी प्राप्त होत आहे. आणखी एका दृष्टीनें शिक्षणाला विचार करावयाचा असतो. आतांपर्यंत व्यक्तींनीं निरानिराळे संघ बनवून आपल्या विकासाच्या चळवळी चालविल्या. कुल, गोत्र, जाति, वंश, धर्म इत्यादि रूपांनीं हे संघ ओळखले जात होते. आधुनिक कालांत वर्ग आणि राष्ट्र या कल्पना पुढें आल्या असून त्या नांवांनीं संघटना चालू झाल्या आहेत. एकाच राष्ट्रांत वर्गविरोध माजत आहेत आणि राष्ट्रांराष्ट्रांतहि विरोध आणि वैर यांची वाढ होत आहे. हा विरोध आर्थिक आणि सांस्कृतिक आहे. वर्ग आणि राष्ट्र, त्याचप्रमाणें राष्ट्र आणि मानवकुल यांमधील सध्यां अत्यंत तीव्रतेनें भासणारा हा विरोध जीवनाच्या दृष्टीनें असत्य आणि अयथार्थ आहे. राष्ट्रांतील सर्व वर्ग आणि विश्वांतील सर्व राष्ट्रें यांच्यामध्यें जीवनाच्या दृष्टीनें परस्परसहकार आणि सहजीवन नांदलें पाहिजे. जीवनाच्या शिक्षण-शास्त्राला हा वर्गविरोध आणि राष्ट्रविरोध मिटवावयाचा आहे, आणि सर्वोदयाच्या तत्त्वावर मानवी संस्कृति उभारावयाची आहे.

म. गांधींनीं आपल्या राष्ट्रापुढें जी शिक्षणपद्धति मांडली आहे, ती आतांपर्यंत वर्णिलेल्या जीवनाच्या सर्वोदय-दर्शनावर आधारलेली आणि उभारलेली आहे. ती एक फुटकळ कल्पना नाहीं. म. गांधींच्या आतांपर्यंतच्या सर्व चळवळींत आश्चर्यकारक असा एकसूत्रीपणा दिसून येतो. त्यांच्या सर्व विचारांत जीवनाचें एकच दर्शन पहावयास मिळतें. या दर्शनाच्या प्रकाशांतच त्यांची

शिक्षणपद्धति स्पष्ट होऊं शकेल. मानवी जीवनाचें परम प्रयोजन आध्यात्मिक मुक्ति हेंच आहे, असें आजपर्यंतच्या सर्व साधुसंतांप्रमाणें म. गांधींचेंहि मत आहे. जीवनाचा उपयोग भौतिक विलासाकडे करावयाचा नसून नैतिक विकासाकडे केला पाहिजे असा त्यांचा आग्रह असतो. पशु आणि मनुष्य यांमधील फरक केवळ बौद्धिक ज्ञानाचा नसून नैसर्गिक प्रेरणेचा आहे. पशूचें जीवन भौतिक आणि देहापुरतें मर्यादित असतें, म्हणून त्याचा आंधळा 'संसार' चालू राहतो. मनुष्याचा मोठेपणा त्याच्या आत्मशक्तींत आहे, म्हणून त्याला ज्ञानाची 'संस्कृति' निर्माण करतां येते. ही संस्कृति शाश्वत नैतिक मूल्यांवर उभारली जाईल तरच ती चिरंतन होऊं शकेल आणि मनुष्यजीवनाला कृतार्थ करील, असें म. गांधींचें म्हणणें आहे. पण नैतिक ध्येयवादित्व इतकेंच त्यांच्या विचाराचें स्वरूप नाहीं. तसें असतें तर संसाराचा त्याग करून त्यांनीं हिमालयाचा रस्ता सुधारला असता. सामाजिक अनेकविध व्यापसंतापांत त्यांना पडावेंसें वाटलें नसतें. पण म. गांधी हे अध्यात्मवादी असले, तरी ते व्यक्तिवादी नसून समाजवादी आहेत. समाजांतील सर्वसाधारण मनुष्याला अध्यात्मजीवनाचा लाभ घडवून देतां येईल अशी त्यांची आकांक्षा आहे. यासाठीं समाजांतील सर्व प्रकारचे व्यवहार सत्य, न्याय आणि प्रेम यांवर आधारले गेले पाहिजेत, अशी त्यांची शिकवण आहे. सामाजिक जीवनांत आज जी विषमता व हिंसा निर्माण झाली आहे ती सर्वथा नाहींशी करावयाची असल्यास प्रत्येक व्यक्तीचें जीवन शक्य तितकें साधें, स्वावलंबी व संयमी झालें पाहिजे आणि कोठें अन्याय अगर पिळवणूक होऊं लागेल, तर त्या गोष्टीचा निर्भयतेनें परंतु संपूर्ण शांततेच्या मार्गानें प्रतिकार केला पाहिजे, असा त्यांचा आदेश

आहे. नैतिक विकास हें मनुष्यजीवनाचें साध्य धरलें, तरी भौतिक वस्तूंची साधन म्हणून आवश्यकता असतेच. मनुष्याला अन्नवस्त्र, गृह, आरोग्य, शिक्षण, संरक्षण, यांची गरज असल्यामुळें व्यक्तिमात्राला या सर्वांचा योग्य प्रमाणांत लाभ होईल अशी समाजरचना इष्ट आहे. यासाठीं समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत म. गांधींनीं विधायक कार्यक्रम चालविले आहेत. सत्तेचें, संपत्तीचें अथवा शक्तीचें केंद्रीकरण हें नेहमीं समाजांत दास्य आणि विषमता निर्माण करीत असल्यामुळें त्यांचा सर्व तऱ्हेचें केंद्रीकरण नाहींसें करण्यावर कटाक्ष असतो. या दृष्टीनें त्यांनीं चरखा-ग्रामोद्योग यांच्या द्वारा अन्नवस्त्राच्या बाबतींत पूर्ण स्वावलंबी बनलेल्या कुटुंबांच्या ग्रामराज्याची संघटना उपदेशिली आहे. अस्पृश्यतानिवारण, मद्यपानबंदी, सर्वधर्मसमभावाच्या तात्त्विक अधिष्ठानावर आधारलेले हिंदु-मुसलमान इत्यादि विविध धर्मीयांचें ऐक्य, हिंदुस्तानीचा राष्ट्रभाषा म्हणून स्वीकार यांच्या द्वारें समाजमनाची शुद्धि करण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. समाजकार्यांत पुरुषांबरोबर स्त्रियांनाहि त्यांनीं समान स्थान कल्पिलें आहे. नैतिक साध्यांच्या निर्मितीला नैतिक साधनांचाच अवलंब केला पाहिजे, ही त्यांनीं मोठी शिकवण हिंदुस्थानच्या द्वारा अखिल मानवतेला दिली आहे. त्यांनीं आपल्या दीर्घ आयुष्यांत समाजजीवनाच्या महत्त्वाच्या सर्व क्षेत्रांत संशोधनाची आणि सेवेची दीक्षा घेतलेले असंख्य कार्यकर्ते निर्माण केले असून शुद्ध नैतिक मूल्यावर मानवी संस्कृति कशी रचितां येईल, याची कल्पना आणून दिली आहे. आपल्या राष्ट्रांतील अखिल जनतेला या संस्कृतिनिर्मितीच्या कामीं उपयुक्त बनविण्यासाठीं त्यांनीं आतां आपली शिक्षणाची राष्ट्रीय योजना सादर केली आहे; आणि माझी ही राष्ट्राला शेवटची, सर्वश्रेष्ठ देणगी आहे असें त्यांनीं म्हटलें आहे.

ही शिक्षणयोजना सामान्यतः 'वर्धा-योजना' या नांवानें ओळखली जाते. या योजनेच्या पुरस्कर्त्यांनीं हिला 'मूलोद्योगी राष्ट्रीय शिक्षण' ( Basic National Education ) असें नांव दिलें आहे. म. गांधींनीं या योजनेला Rural National Education through Village-handicrafts ( ग्रामोद्योगी राष्ट्रीय ग्रामशिक्षण ) असें नांव दिलें आहे. या नांवाचें स्पष्टीकरण करतांना ते म्हणतात, " Rural excludes the so called higher or English education. 'National' at present connotes Truth and Non-violence. And 'through Village-handicrafts' means that the framers of the scheme expect the teachers to educate village-children in their villages so as to draw out all their faculties through some selected village-handicrafts in an atmosphere free from super-imposed restrictions and interference ."

ही योजना म्हणजे खेड्यांतील मुलांच्या शिक्षणांत एक क्रांतीच आहे. यांत पाश्चात्यांची यत्किंचितहि उसनवारी नाहीं असेंहि त्यांनीं या योजनेविषयीं म्हटलें आहे. इंग्रजी राज्यांत लोकशिक्षणाचा प्रश्न कधींच आस्थेनें हाताळण्यांत आला नाहीं. लोकशिक्षण म्हणजे हिंदुस्थानच्या सात लक्ष खेड्यांत मुख्यतः शेतीवर आणि सर्वतः शरीरश्रमावर संसार चालविणाऱ्या गरीब आणि दुबळ्या लोकांचें शिक्षण. इंग्रजांची कारकीर्द सुरू होण्यापूर्वी हिंदुस्थानचीं सर्व खेडीं संपन्न, सुखी आणि संघटित होतीं. पण इंग्रजी राज्याच्या दीडदोनशें वर्षांच्या काळांत हीं खेडीं सर्वथा उत्सन्न झालीं आहेत. खेड्यांतील बुद्धि आणि कर्तृत्व शहरांत जाऊन बेकार झालें आहे, आणि खेड्यांत केवळ लाचार आणि गुंड यांची वस्ती उरली आहे. खेडीं आणि शहरें यांच्यामध्यें निर्माण झालेला संबंध आर्थिक आणि नैतिक अशा दोन्ही दृष्टींनीं घातक झाला आहे. शहरें हीं खेड्यांतील जनतेचें रक्तशोषण

करीत असून खेड्यांविषयीं अगदीं बेदरकार झालीं आहेत. यांत सर्व राष्ट्राचा नाश ठेवलेला आहे. हिंदुस्थानचें संजीवन करावयाचें असेल, तर हीं लक्षावधि खेडीं पुनः पूर्ववैभवाप्रत नेलीं पाहिजेत. महात्माजींच्या शिक्षणयोजनेंत हेंच उद्दिष्ट राखलें आहे. खेड्यांतील जनतेंत भीषण दारिद्र्य आणि भयानक अज्ञान यांचें साम्राज्य माजलें आहे. खेड्यांतून निसर्गसंपत्ति पडून राहिली आहे. कोट्यवधि लोक पुरेसें काम नाहीं म्हणून सुस्तपणानें काळ वायां घालवीत आहेत. रिकामा काळ, बेकार हात आणि निसर्गाची विपुल संपत्ति या गोष्टींना एकत्र आणून त्यांतून मानवी जीवनाला आवश्यक आणि अलंकारक अशा उभयविध वस्तूंची निर्मिति शिक्षणानें केली पाहिजे. शिक्षण म्हणजे अक्षरज्ञान नव्हे. केवळ लिहिणें-वाचणें शिकल्यानें मनुष्य जीवनकार्याला समर्थ होत नाहीं. तो आपला सर्वांगीण विकासहि साधूं शकत नाहीं. शिक्षणाचा जीवनाच्या प्रत्यक्ष निरीक्षणाशीं आणि प्रयोगाशीं संबंध जोडला पाहिजे. मानवी शरीरघटनेचा विचार केला असतां एक अत्यंत महत्त्वाचा शोध लागतो. मनुष्याला आपल्या चरितार्थासाठीं अनेक प्रकारच्या वस्तू संपादाव्या लागतात. माणसाचा मोठेपणा त्याच्या बौद्धिक ज्ञानावर आणि नैतिक चारित्र्यावर अवलंबून असतो. चरितार्थाचीं साधनें, बौद्धिक ज्ञान आणि नैतिक चारित्र्य या जीवनाच्या तीनहि पुरुषार्थांचें मीलन मनुष्याच्या हाताच्या कृतींत सामावलेलें आहे. पाश्चात्यांमध्यें रूसो, पेस्टालाझी, फ्रोबेल इत्यादि शिक्षणशास्त्रज्ञांनीं हा हस्तमहिमा ओळखला होता. त्यांच्या उपदेशामुळें शारीरशास्त्री आणि मानसशास्त्री यांनीं अनेक प्रकारचे प्रयोग करून शास्त्रीय दृष्ट्या ही गोष्ट आतां निर्विवाद सिद्ध केली

आहे. हात हें ज्ञानाचें-विचाराचें-इंद्रिय आहे (The hand is an organ of thought). तें बुद्धि आणि भावना यांना जागृत करणारें प्रभावी साधन आहे (The hand is a potent instrument in opening the entellect as well as in training sense and will) ही गोष्ट आतां शिक्षणशास्त्रांत सर्वमान्य झाली आहे. हातांनीं जीवनाच्या अन्नवस्त्रादि गरजा भागवितां येतात; ह्यासाठीं पांडित्य करण्याची मुळींच गरज नाहीं, ती अगदीं उघड गोष्ट आहे. म. गांधींच्या शिक्षण-योजनेंत उद्योगावर मुख्य भर दिलेला आहे. तो शास्त्रीय दृष्टीनें संपूर्णतया समर्थनीय आहे हें यावरून सहज दिसून येईल. रूसो, पेस्टालात्झी यांनीं हस्त-महिमा ओळखला खरा; परंतु त्यांच्या विचारांना शिक्षणांत स्थान मिळण्याच्या दृष्टीनें एक मोठी अडचण उत्पन्न झाली. ती म्हणजे यंत्रयुगाचा उदय ही होय. यांत्रिक शोधांनीं पाश्चात्य देशांत औद्योगिक क्रांति झाली आणि इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली व अमेरिका इत्यादि देशांनीं आपलीं ग्रामोद्योगाचीं खेडीं मोडून यंत्रोद्योगांचीं विराट् नगरें वसविलीं. यामुळें हस्तोद्योगाला शिक्षणांत स्थान उरलें नाहीं. तथापि, जनता-शिक्षणाचा कार्यक्रम सुरू झाल्यापासून आणि विशेषतः कामकऱ्यांच्या मुलांना कारागिरीच्या कामाचें शिक्षण देण्याची आवश्यकता भासूं लागल्या-पासून युरोप-अमेरिकेंत अलीकडे उद्योगप्रधान शिक्षणाला पुनः जोराची चालना मिळाली आहे; आणि Activity schools (कृति-शाळा) नांवाची शैक्षणिक चळवळ चालू झाली आहे. युरोप-अमेरिकेचें कांहीं झालें तरी, हिंदुस्थानांत लक्षावधि खेडीं, कोटयवधि माणसांनीं गजबजलेलीं आहेत ही येथील वस्तुस्थिति आपणाला विसरतां येणार नाहीं. कोट्यवधि हातांना आपणाला काम द्यावयाचें आहे आणि तें

तावडतोब द्यावयाचें आहे. त्याच वेळीं त्यांची बुद्धि जागृत करावयाची आहे. त्यांच्यांत शास्त्रीय दृष्टि निर्माण करावयाची आहे. शिस्त आणि उद्योगप्रियता यांचें महत्त्व त्यांना पटवून द्यावयाचें आहे. या दृष्टीनें पाहतां हिंदुस्थानच्या खेड्यांतील शिक्षण ग्रामोद्योगावर रचल्याशिवाय आपणाला गति नाहीं. म्हणजे शिक्षण हें केवळ बौद्धिक अथवा अलंकारात्मक न राहतां तें आर्थिक दृष्ट्या उपयुक्त होईल.

म. गांधींच्या शिक्षणयोजनेंत तीन भाग प्रमुख आहेत. उद्योगाच्या द्वारें शिक्षण द्यावयाचें हा पहिला भाग. यासाठीं एकादा मूलोद्योग शिकवावयाचा. बौद्धिक विषयांचें शिक्षण उद्योगाच्या अनुषंगानें द्यावयाचें हा दुसरा भाग; आणि मूलोद्योगांतून निर्माण झालेल्या वस्तु शाळेला स्वावलंबी बनविण्याच्या दृष्टीनें उपयोगी पडतील असें करावयाचें हा तिसरा भाग. हे तीनहि भाग परस्परावलंबी आहेत. यांचा विच्छेद करून चालणार नाहीं. याचें नांव मूलोद्योगी शिक्षण. हें शिक्षण सर्व राष्ट्राला मोफत आणि सक्तीचें द्यावयाचें आहे. वयाच्या सातव्या वर्षापासून चौदाव्या वर्षापर्यंत या शिक्षणाचा काल ठरविण्यांत आला आहे. या अवधींत सर्व शिक्षण स्वभाषेंतूनच देण्यांत येईल. चौदाव्या वर्षीं विद्यार्थ्याला आजच्या मॅट्रिकइतकें बौद्धिक ज्ञान मिळेल. फक्त इंग्रजी भाषा शिकविली जाणार नाहीं. पण मॅट्रिकपेक्षां त्याची स्थिति अधिक स्पृहणीय होईल. कारण त्याला एक चांगला उद्योग शास्त्रीय रीतीनें शिकविण्यांत आलेला असल्यामुळें त्याचेवर बेकार राहण्याची पाळी येणार नाहीं. त्याचें बौद्धिक ज्ञान कृतीच्या द्वारा लाभलें असल्यामुळें तें त्याला जीवनांत नेहमीं उपयोगी पडेल. राष्ट्रभाषेचें त्याला ज्ञान मिळालेलें असल्यामुळें परप्रांतीय लोकांचे आणि पुढाऱ्यांचे विचार-व्यवहार समजण्यास तो समर्थ

होईल आणि इंग्रजीची उणीव त्याला भासणार नाहीं. त्याला आत्मविश्वास लाभलेला असेल. यामुळें तो आपल्या जीवनांत स्वाभिमान आणि निर्भयता प्रकट करूं शकेल. खेड्यांतील जीवनाशीं त्याचा जिव्हाळ्याचा संबंध शिक्षणानें जोडून दिला असल्यामुळें तो आपल्या खेड्याचा उद्धार करण्याला उत्साहानें झटेल. धर्मभोळेपणा, अस्वच्छता आणि अनारोग्याची राहणी यांतून त्याची सुटका झाल्यामुळें त्याचें जीवन विवेकी, स्वच्छ आणि आरोग्यमय होईल. ग्रामोद्योगाच्या शिक्षणानें खेड्यांत नवीन संपत्ति निर्माण करण्याचा मार्ग मिळाल्यामुळें खेडीं पुनः तार्जीतवानीं होतील. अस्पृश्यता-निवारण, मद्यपानबंदी व जातीय ऐक्य यांच्या द्वारा खेड्यांतील समाज समान संस्कृतीचा आणि संघटित शक्तीचा तयार होईल. आर्थिक दृष्टीनें स्वयंपूर्ण आणि सांस्कृतिक दृष्टीनें संपन्न झालेल्या खेड्यांना शहरें पिळूं शकणार नाहींत. खेड्यांचे आणि शहरांचे संबंध न्याय्य व परस्परोपकार होतील. या शिक्षणानें सिद्ध झालेली जनता शुद्ध लोकशाही निर्माण करूं शकेल. अशा रीतीनें म. गांधी यांनीं म्हटल्याप्रमाणें हें शिक्षण समाजांत शांतपणें सर्वांगीण क्रांति घडवून आणील.

या शिक्षणपद्धतीचा नीट विचार केला असतां असें आढळून येईल कीं, ती शास्त्रतः अत्यंत निर्दोषी आहे; आणि आपल्या देशाच्या सध्यांच्या परिस्थितीला सर्वतोपरी जुळणारी आहे. हिंदुस्थानसारख्या खंडतुल्य राष्ट्रांत आपणाला लोकशाही निर्मावयाची आहे. युरोपची आजची स्थिति नजरेसमोर आणिली, म्हणजे हिंदुस्थाननें कोणत्या सावधगिऱ्या बाळगिल्या पाहिजेत तें स्पष्ट होण्यासारखें आहे. येथें प्रांतिक दुरभिमान बळावूं देतां कामा नये. त्यासाठीं सारे प्रांत आर्थिक दृष्टींनीं स्वयंपूर्ण झाले पाहिजेत आणि

त्यासाठीं प्रत्येक प्रांतानें आपापलीं ग्रामें स्वायत्त बनविलीं पाहिजेत. आपलीं खेडीं आपण स्वायत्त बनविलीं तर वर्गकलहाचा प्रश्न येथें निर्माण होण्याचें कारण राहणार नाहीं. खेड्यांच्या एकीकरणासाठीं थोडीं शहरें लागतील आणि अशा शहरांतून मोठ्या प्रमाणावरील यांत्रिक कारखानेहि निर्मिले जातील. तथापि, स्वायत्त ग्रामराज्यांच्या मध्यभागीं निर्माण झालेलीं शहरें ग्रामीण लोकांच्या आर्थिक जीवनावर आक्रमण करूं शकणार नाहींत. ग्रामोद्योगानें ग्रामसंजीवन घडणार आहे आणि त्याच्या योगेंच स्वतंत्र भारतांत खरीखुरी लोकशाही नांदणार आहे.

उद्योगाच्या द्वारा शिक्षण देण्याच्या पद्धतीला 'समवाय-पद्धति' असें नांव देण्यांत आलेलें आहे. जीवनांतील सर्व विभाग कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें परस्परसंबद्ध असतात. त्यामुळें जीवनाला कोठेंहि स्पर्श केला, तरी जीवनाचें सर्व शास्त्र शोधकाच्या हातीं आल्याखेरीज राहात नाहीं. सामाजिक गरजा आणि नैसर्गिक परिस्थिति यांच्या मीलनांत माणसाची कृति जन्म घेत असते. त्या कृतीच्या आश्रयानें निसर्ग आणि समाज यांच्या विविध अंगांशीं विद्यार्थ्यांचा सहज परिचय करून देतां येईल. 'जाकिर हुसेन कमिटी'नें आपल्या अभ्यासक्रमांत शेती, कांतण-विणकाम आणि कार्डबोर्डकाम व लांकूडकाम यांचे अभ्यासक्रम तपशीलवार दिले आहेत. आणखीहि कित्येक उद्योग त्यांत समाविष्ट करतां येतील. कागद बनविणें, चामड्याचें काम, मातीचीं भांडीं बनविणें, दुग्धव्यवसाय, मधमाशा पाळून मध बनविणें इत्यादि ग्रामोद्योग सर्वत्र चालण्यासारखे आहेत. हे उद्योग केवळ यांत्रिक जड पद्धतीनें शिकवावयाचे नाहींत; तर त्यांचा अभ्यास अत्यंत शास्त्रीय पद्धतीनें करून घ्यावयाचा आहे; आणि शास्त्रीय अभ्यास म्हटला म्हणजे बुद्धीचा विकास हा ठेवलेलाच आहे. भाषा, गणित, समाजपरिचय,

सामान्यविज्ञान, रेखन हे सर्व विषय उद्योगाच्या संगतीनें चांगले शिकवितां येण्यासारखे आहेत. पुस्तकपद्धतीपेक्षां प्रयोगपद्धति ही नेहमींच शिक्षणांत श्रेयस्कर मानली जाते. 'समवाय-पद्धति' म्हणजे प्रयोगपद्धतीच होय. समवाय-पद्धतींत असा सिद्धान्त गृहीत आहे कीं, ज्ञान हें कर्माशीं नित्य संबद्ध आहे. त्यामुळें कर्म करूं लागलें, कीं त्याचा कर्त्याला बोध होऊं लागणारच. त्याची मीमांसा करीत गेलें म्हणजे कर्मांत कुशलता आणि ज्ञानांत शास्त्रीयता निर्माण होते. ज्ञानाचे विविध विषयहि परस्परांशीं अनुबद्ध असतात. यामुळें समवाय-पद्धतीनें त्यांचें शिक्षण देणें हें अधिक स्वाभाविक आणि सोयीचें आहे. ही समवाय-पद्धति शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें आजतागायत आणिं अत्यंत परिणतीला पोंचलेली पद्धति होय.

शिक्षण स्वावलंबी करीत असतांना एक महत्त्वाची गोष्ट करावी लागेल, आणि ती म्हणजे शाळांतून विद्यार्थ्यांनीं निर्माण केलेले पदार्थ बाजारांत विकण्याची व्यवस्था करण्याचें काम शाळांतील शिक्षकांवर टाकावयाचें नाहीं. तें काम सरकारनें केलें पाहिजे असें म. गांधींनीं प्रथमपासून जाहीर केलें आहे; आणि 'वर्धा-योजना' यशस्वी व्हावयाची असेल, तर हें काम सरकारकडून करून घेतलेंच पाहिजे. राष्ट्रनिर्मितीच्या या मोठ्या प्रयोगांत सरकारनें आपला वांटा उचललाच पाहिजे. मग तें सरकार कोणत्याहि स्वरूपाचें असो. हें काम सरकारवर टाकण्यांत असा हेतु आहे कीं, ग्रामोद्योगाची वस्तु बाजारांत टिकावयाची असेल तर तिला देशाच्या हितासाठीं कायद्याचें संरक्षण मिळालें पाहिजे. यंत्रानें तिच्याशीं अन्याय्य स्पर्धा करतां कामा नये. ही एक प्रकारची आर्थिक क्रांति आहे; आणि ती पूर्णांशानें यशस्वी करण्यासाठीं शेवटीं राजकीय क्रांतीची आवश्यकता उत्पन्न होणार आहे. अशा रीतीनें 'वर्धा-योजना' ही राष्ट्रीय स्वातंत्र्याला आवश्यक अशा

राजकीय क्रांतीकडे अचूक नेणारी आहे. याहि दृष्टीनें ही योजना संपूर्ण राष्ट्रीय आहे असें आपणांस दिसून येईल.

इ. स. १९३९

[ ८ ]

## जीवनाची त्रिपदा गायत्री

**स. ज. भागवत**

यदा वै करोति, अथ निस्तिष्ठति ।

शिक्षण हें जीवनाचें साधन आहे. जीवनाचें संशोधन, जीवनाशीं सहकार्य आणि जीवनाची समृद्धि हें शिक्षणाचें प्रयोजन आहे. साध्य आणि साधन यांची तत्त्वतः एकरूपता असते. साधनाची संपूर्ण सिद्धि साध्यांत सामावलेली असते आणि साध्यच स्वतःच्या सिद्धीसाठीं साधनाचें स्वरूप धारण करतें. यामुळें शिक्षण आणि जीवन यांचें एकरूप दर्शन प्रतीत होईपर्यंत शिक्षण यशस्वी आणि जीवन कृतार्थ होणार नाहीं. जीवनाच्या सर्व आकांक्षांचें शिक्षणांत प्रतिबिंब पडलें पाहिजे आणि शिक्षणाच्या सर्व व्यापारांतून जीवनाची मूर्ति निर्माण झाली पाहिजे.

जिज्ञासा, बुभुक्षा आणि मुमुक्षा या जीवनाच्या मुख्य आकांक्षा आहेत. अंतर्बाह्य विश्वाचें ज्ञान मिळवावें, अंतर्बाह्य इंद्रियांनीं त्याचा आस्वाद घ्यावा आणि अंतर्बाह्य मालिन्यापासून मुक्तता अनुभवावी अशी जीवनाची नित्य धडपड चाललेली असते. जिज्ञासेंतून विविध शास्त्रांचा बुभुक्षेंतून भौतिक सुखांचा व रसप्रधान कलांचा आणि मुमुक्षेंतून धर्म

व अध्यात्म यांचा जन्म होतो. जीवनांतील या बहुविध अंगांमध्यें तत्त्वतः विरोध नसला, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत अद्वैताची दृष्टि सुटून गेल्यामुळें कोलाहल माजतो; आणि भीति, हिंसा व अशांति यांचें साम्राज्य सुरू होतें. प्रत्यक्षांतील ही अनवस्था नष्ट करण्यासाठीं शिक्षणानें अद्वैताच्या आधारावर जीवनाच्या सर्व आकांक्षांचें यथायोग्य मीलन घडवून आणलें, तरच जीवनांत अभय, अहिंसा आणि शांति यांचें रामराज्य नांदूं लागेल.

जीवनाची तात्त्विक एकरूपता प्रत्यक्षांत ढळण्याचें कारण त्याचे अंगीं असणारी अखंड क्रियाशीलता हें होय. जीवन आपल्या स्वरूपाचा क्रियेच्या अनंत परंपरेंतून सतत आविष्कार करीत असतें. त्यांतील छंद तुटला म्हणजे अनिष्ट-परंपरा सुरू होतात. शिक्षणानें हा छंद निर्माण करावयाचा असतो. जीवनावर वैय्यक्तिक आणि सामाजिक, व्यावहारिक आणि तात्त्विक, आवश्यक आणि कलात्मक, भौतिक आणि आत्मिक अशा अनेक मागण्या येत असतात. या सर्वांचें एकाच वेळीं सारखें समाधान होईल अशी कृति शोधून काढून जीवनविकासाला शिक्षणानें साह्य करावयाचें असतें. मनुष्याच्या शरीरविकासाकडे पाहिलें तरी देखील हीच गोष्ट आढळून येते. विकासाच्या परंपरेंत क्रियाशक्तीच्या वाढीबरोबरच ज्ञान, भोग आणि शुद्धि या शक्तीहि वाढीस लागलेल्या दिसतात. भौतिक सृष्टि आणि आत्मिक दृष्टि या दोघांचा शरीरक्रिया हा एकच मीलनबिंदु आहे. या शरीरक्रिया जितक्या व्यापक दृष्टीनें होऊं लागतील, तितका जीवन-विकास सिद्ध होत जाईल. आधुनिक शारीरशास्त्र आणि मानसशास्त्र यांनीं ही गोष्ट आतां निर्विवादपणें सिद्ध केली आहे. [ 'The hand is a potent instrument in opening the intellect as well as in training sense and will.'–Stanley Hall, quoted in 'The

Thinking Hand.' ] मनुष्याला शरीरयात्रेसाठीं निसर्गाशीं झगडावें लागतें. या झगडयांतूनच त्याला निसर्गाचें ज्ञान व सौंदर्य यांचाहि लाभ होत जातो. शरीरयात्रेसाठींच त्याला समाजांत राहावें लागतें. पण त्याबरोबरच त्याला आपल्या हृदयांतील व्यापक आणि उदात्त भावनांचा स्पर्श समजूं लागतो. अशा रीतीनें भौतिक प्रगतीबरोबरच आत्मिक उन्नति साधते. मानवी कृतींत भौतिक आणि आत्मिक अशा दोनहि जीवन-विभागांचें घडणारें मीलन जाणून घेऊन त्याचा शिक्षणपद्धतींत समावेश केल्यास जीवन निश्चयानें सफल होईल, असा आधुनिक शिक्षणशास्त्राचा निर्णय आहे.

आपल्याकडे प्राचीन काळीं शिक्षणाचा जीवनाशीं छंद राखिलेला आढळून येतो. गुरुकुलांत जीवनाशीं प्रत्यक्ष समरस होऊन विद्यार्थी सर्व प्रकारच्या विद्या व कला मिळवीत असत. सत्यकाम जाबालाला त्याच्या गौतम नामक गुरूनें उपनयनानंतर चारशें कृश गाई दिल्या आणि 'यांच्या एक हजार झाल्यानंतर परत ये' असें सांगितलें. तसें होण्याला एक वर्ष लागलें. परत येतांना ऋषभ, अग्नि, हंस आणि मद्गु यांनीं त्याला ज्ञानाचा एकेक पाद सांगितला. घरीं आल्यावर यज्ञीय अग्नींनीं त्याला अधिक प्रवचन केलें व शेवटीं गुरूनीं त्याच्या ज्ञानाला शेवटचा संस्कार दिला, अशी छांदोग्यांत कथा आहे. त्यांतच सनत्कुमारांनीं नारदाला उपदेश करतांना 'सत्य हें ज्ञानावर, ज्ञान हें मननावर, मनन हें श्रद्धेवर, श्रद्धा ही निष्ठेवर अवलंबून आहे' असें सांगून 'निष्ठा ही कृतीनें निर्माण होते' असा सिद्धांत केला आहे; आणि 'मनुष्य सुखासाठीं क्रिया करीत असल्यामुळें सुखाचें स्वरूप शोधिलें पाहिजे, तें सुख आत्म्याच्या अद्वैत आणि अनंत स्वरूपांतच आहे' असें उपदेशिलें आहे. यावरूनहि 'अद्वैतावर आधारलेली कृति

हीच जीवननिष्ठा निर्माण करण्याचें साधन होय' असा वैदिक ऋषींचा शिक्षणशास्त्राचा सिद्धांत होता हें स्पष्ट होतें.

आजच्या युगांत जीवनाचें हें अद्वैत पार भंगून गेलें आहे. त्यामुळें सर्वत्र द्वंद्वें निर्माण झालीं आहेत. ज्ञान, आवश्यक भोग, कलोपासना, मानव्याचें प्रेम, यांचा परस्पर छंद नाहींसा झाला आहे. तो पुन: जोडून देणें हें ह्या युगाचें नियोजित कार्य आहे. ही नवसंस्कृति निर्माण करणारें शिक्षण आपण शोधिलें पाहिजे. त्या शिक्षणानें प्रत्येक मनुष्याला ज्ञान, सुख व चारित्र्य यांचा लाभ झाला पाहिजे. कृति ही व्यक्तीला समाज आणि निसर्ग ह्यांशीं जोडून वरील तीनहि गोष्टी मिळवून देण्यास समर्थ आहे. म्हणून कृति ही जीवनाची त्रिपदा गायत्री समजली पाहिजे. गायत्री म्हणजे उपासकांचें रक्षण करणारी देवता. तिचे तीन पाय कल्पिले आहेत. जीवनाच्या उपासकांचें रक्षण करणारी कृति ही उपासकांना ज्ञान, सुख व चारित्र्य मिळवून देणारी आहे. तीच शिक्षणाची त्रिपदा गायत्री समजण्यास हरकत नाहीं.

[९]

## अनुबन्ध आणि समवाय

स. ज. भागवत

विविधतेनें नटलेल्या या जगांत सर्वत्र एकता भरून राहिली आहे. कोळ्याचें जाळें कितीहि गुंतागुतीचें दिसलें, तथापि तो एकच अखंड तंतू असतो. त्याचप्रमाणें विश्वांतील विविध घटनांची केवढीहि संमिश्रता भासली तरी तो एका अखंड जीवनतत्त्वाचा विलास आहे. यामुळें

कोणतीहि एक घटना घेतली म्हणजे तिच्या अनुषंगानें साऱ्या विश्वाची प्राप्ति होऊं शकते. या आध्यात्मिक अनुभवाचा जीवनांत जाणीवपूर्वक उपयोग कसा करावा, हें उपदेशिणारें शास्त्र म्हणजेच जीवनाचें शिक्षणशास्त्र होय.

जीवनाचा प्रारंभ भौतिक गरजांनीं होतो. म्हणून शिक्षणाचा प्रारंभहि भौतिक गरजा भागविण्याच्या साधनांची उपासना करण्यानें व्हावा हें साहजिक होईल. या गरजांचें स्वरूप सामाजिक असतें. त्या भागविण्यासाठीं निसर्गाचा आश्रय घ्यावा लागतो आणि असें करतांना नानाविध कृती निर्माण होतात. मानव आणि निसर्ग या दोघांचें मीलन कृतींत झालें असल्यामुळें कृतीची मीमांसा म्हणजे या दोघांची मीमांसा होय. ही मीमांसा सहजतेनें भरलेली असल्यामुळें ती जीवनाला भारभूत न होतां त्याच्या विकासाला कारणीभूत होते.

या मीमांसेंतून आधिभौतिक आणि आध्यात्मिक या नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या असंख्य ज्ञानविषयांचा उदय होतो. या विषयांमध्यें सर्वत्र अनुबन्ध भरून राहिलेला आहे. मनुष्याला देहधारणासाठीं अन्नवस्त्र लागतें. अन्नासाठीं त्याला शेती, बागाईत, भाजीपाला अथवा शिकार, मच्छीमारी इत्यादि कृती आणि वस्त्रासाठीं रेचणें, पिंजणें, कांतणें, विणणें इत्यादि क्रिया कराव्या लागतात. राहाण्यासाठीं घर लागतें आणि त्यासाठीं लाकूड, माती, दगड, चुना, विटा, कौलें इत्यादि पदार्थ निर्मावे लागतात. या सर्वांचीं अवजारें बनविण्याची आवश्यकता असते. त्यासाठीं सुतारी, लोहारी इत्यादि कामांची निर्मिति होते. जीवनाच्या ह्या सर्व क्रियांमध्यें कार्यकारणसंबंध अनुस्यूत आहे म्हणून त्या परस्पर अनुबद्ध आढळतात. एकाचें साध्य दुसऱ्याचें साधन बनतें. या सर्व क्रिया काल आणि दिक् यांमध्यें पसरलेल्या

असल्यामुळें त्यांना इतिहासादि स्वरूपें लाभतात. धातुसृष्टि, वनस्पति-सृष्टि, पशुसृष्टि इत्यादिकांच्या संगतीनें आणि सहकार्यानें मनुष्य आपला संसार उभारीत असल्यामुळें त्याला नानाविध प्रकारांचें ज्ञान होत जातें. त्या ज्ञानानें त्याच्या क्रिया विकसित होतात आणि त्याच्या क्रियाविकासामुळें त्याचा पुनः ज्ञानविकास होऊं लागतो. उपयुक्तते-साठीं शोधिलेल्या ज्ञानांत आणि देखिलेल्या सौंदर्यांत मनुष्य आपल्या संस्कृतीची अपरसृष्टि रचूं लागतो; आणि भौतिकापलीकडील आत्मिक प्रदेशांत त्याच्या वसाहती वाढूं लागतात. मनुष्याची जीवनयात्रा ज्या सहजक्रमानें सफल आणि संपूर्ण होत जाते, त्या क्रमाचा अनुबन्ध शिक्षणांतहि राखतां येण्यासारखा आहे.

मूल ज्या सामाजिक आणि नैसर्गिक वातावरणांत जन्माला आलें असेल, त्यांतील नित्याच्या उपयुक्त क्रियांच्या द्वारा त्याच्या इंद्रियशक्तीचा, बुद्धिशक्तीचा आणि भावनाशक्तीचा विकास शिक्षणानें घडवून आणिला पाहिजे. उदाहरणार्थ, मुलांना प्रथम आपल्या शरीराचें, घराचें आणि गांवाचें क्रमाक्रमानें निरीक्षण करितां येईल. आसपासच्या प्राण्यांचें, वनस्पतींचें व जडसृष्टीचें अवलोकन करितां येईल. आकाश, त्यांतील दिव्य ज्योती, उषा आणि निशा, नाना ऋतू यांचा परिचय करून घेतां येईल. स्वच्छता आरोग्य यांच्या संवयी लावून घेणें, अनेक प्रकारच्या सामाजिक क्रियांची माहिती करून घेणें आणि बागकाम, मातीचें काम, कागदकाम, सूतकाम, इत्यादि कामें शिकणें हें त्यांना आनंदानें करितां येईल. भाषा व्यवहारासाठीं आहे. ज्या मुलाचा व्यवहार विस्तृत होत जाईल, त्याची भाषा व्यापक होत जाईलच. आपण जें पाहतो तें वर्णूं शकतों. प्रत्यक्षाच्या अभावीं आपणांला त्याचें कल्पनाचित्र आपल्या मनश्चक्षूंसमोर निर्मितां येतें. नानाविध

साधनांनीं आपण त्याला कलाबद्ध करूं शकतों. रेखाचित्रें, शिल्पचित्रें आपणांला निर्मितां येतात. भाषेच्या द्वारा पुनः या कलेचाहि व्यवहार करितां येतो. नाट्य, नृत्य, संगीत, काव्य इत्यादिकांच्या द्वारें आपणांला प्रत्यक्षाची अनुकृति आणि परोक्षाची निर्मिति करितां येते. बालकांच्या बाल आयुष्यांतहि या सर्व गोष्टी अल्प प्रमाणांत होत असतात. त्यांतील अनुबन्ध लक्षांत घेऊन शिक्षणाचा कार्यक्रम आंखल्यास त्यांनाहि वरील सर्व अनुभव संपादितां येतील आणि त्यांचें जीवन सरस व समृद्ध बनेल.

विश्वाच्या नानाविध विभागांत आपणांला हा जो अनुबन्ध आढळून येतो त्याचें कारण असें आहे कीं, हे सारे विभाग जीवनाच्या आत्मरूपाशीं समवाय-संबंधानें जोडलेले आहेत. समवाय म्हणजे नित्य संबंध. ज्या दोन पदार्थांमध्यें समवाय-संबंध असतो, ते सृष्टींत पृथक्पणें कधींच उपलब्ध होत नाहींत. त्या दोहोंपैकीं एकाचा नाश झाला असतां दुसऱ्याचें अस्तित्व उरूं शकत नाहीं. आकार, संख्या, वजन, स्पर्श वगैरे गुण आणि विविध प्रकारच्या क्रिया इत्यादि धर्म वस्तूचे ठिकाणीं नियमानें दिसून येतात. नुसते गुण, नुसत्या क्रिया अथवा गुण आणि क्रिया यांविरहित नुसती वस्तु कधीं कोणाला सांपडणार नाहीं. हाच समवाय-संबंध होय. विश्वांत बाहेर विविधता असून अंतरीं एकता आहे. केवळ अद्वैत म्हटल्यानें विविधेतचा अपलाप होतो व एका महत्त्वाच्या अनुभवाला अन्याय होतो असें वाटून वैशेषिक शास्त्रकारांनीं समवाय-संबंध मानिला आहे. शिक्षणाचा जीवनाच्या अंतर्बाह्य स्वरूपाशीं सारखाच संबंध असल्यामुळें ज्ञान आणि कर्म यांत हाच समवाय-संबंध स्वीकारला पाहिजे. वस्तुतः ज्ञान आणि कर्म यांत अभेदच आहे. कर्म म्हणजे ज्ञानाची मूर्ति होय आणि ज्ञान ही कर्माची स्फूर्ति होय.

समवायाच्या तात्त्विक पायावर व्यवहाराचा अनुबन्ध आधारलेला असल्यामुळें जीवनाच्या या शिक्षणपद्धतीला ‘ समवाय-पद्धति ’ अथवा ‘ अनुबन्ध-पद्धति ’ यांपैकीं कोणतेंहि नांव द्यावयास हरकत नाहीं.

[ १० ]

# वर्धा-योजनेचें हार्द : अनुबन्ध

आचार्य काकासाहेब कालेलकर

१

वर्धा-योजनेचें हार्द उद्योगद्वारां देण्यांत येणारें शिक्षण स्वावलंबी बनविणें हें आहे काय ?—नाहीं. कारण, जर आपण खऱ्याखुऱ्या औद्योगिक शिक्षणाला भरपूर वेळ दिला, तर बुद्धिशाली विद्यार्थ्यांनीं तयार केलेल्या मालास बाजारांत चांगली किंमत येईलच.

शाळा चालविण्याचा सर्व भार विद्यार्थ्यांवरच पडावा हा हेतूहि वर्धा-योजनेच्या मुळाशीं नाहीं. शाळेची इमारत, उद्योगालय, पुस्तकालय, प्रयोगालय इत्यादिकांचा खर्च विद्यार्थ्यांच्या मेहनतीमधून उत्पन्न होणार नाहीं. तो खर्च एक तर सरकारनें केला पाहिजे, समाजानें केला पाहिजे अगर एकाद्या धनवान् व्यक्तीनें तरी केला पाहिजे. वर्धा-योजनेप्रमाणें चालणाऱ्या संस्थांच्या निरीक्षण-परीक्षणाचा खर्चहि विद्यार्थ्यांवर पडतां कामा नये. त्यांच्याकडून इतकीच अपेक्षा आहे, कीं त्यांनीं आपल्या शिक्षणकालांत रोज मिळणाऱ्या तीनचार तासांच्या शिक्षणाबरोबरच कांहीं ना कांहीं उद्योग करून महिन्याभरांत आठबारा आणे अगर एकादा रुपाया मिळवावा व तो गुरुदक्षिणा म्हणून अर्पण करावा, आणि असें करीत असतांना आपण करीत असलेला उद्योग हा केवळ एक खेळ नसून त्याला

बाजारांत कांहीं ना कांहीं किंमत येऊं शकते हें सिद्ध करून दाखवावें. आपण जें शिक्षण मिळवितों तें फुकट मिळवीत नसून त्यासाठीं आपण दररोज कमींत कमी तीनचार तास श्रम करतों आणि तें मिळवतों अशा प्रकारचा संतोषहि विद्यार्थ्यांना वाटला पाहिजे. विद्यार्थ्यांच्या श्रमाचें जें कांहीं उत्पन्न येईल, तें शाळेच्या जमाखर्चांत जमा होईल; परंतु ह्या उत्पन्नावर शिक्षकांचें वेतन अवलंबून राहाणार नाहीं. सुरुवातीस कांहींच उत्पन्न येणार नाहीं, परंतु पुढें पुढें कमी-अधिक प्राप्ति होत जाईल. ह्या उत्पन्नाच्याद्वारां विद्यार्थ्यांच्या औद्योगिक प्रगतीची कसोटी अवश्य होऊं शकेल. परंतु वर्धा–योजनेंत स्वावलंबनाला कितीहि महत्त्वाचें स्थान असलें, तरी तें तिचें हार्द होऊं शकत नाहीं. "तर मग उद्योगाचें प्राधान्य हेंच वर्धा-योजनेचें हार्द आहे काय?" पुष्कळ लोक म्हणतील कीं, 'होय, हेंच वर्धा–योजनेचें हार्द आहे.' परंतु हें उत्तरहि बरोबर नाहीं. औद्योगिक शिक्षण–संस्थांत उद्योगाला प्राधान्य अवश्य असतें; परंतु अशा प्रकारच्या संस्थांचा वर्धा–योजनेशीं कांहीं संबंध नाहीं.

जे लोक औद्योगिक शिक्षण आणि बौद्धिक शिक्षण ह्या दोन गोष्टी अगदीं स्वतंत्र आहेत असें समजतात, त्यांना वर्धा–योजना कधींच समजणार नाहीं. पुस्तकांच्याद्वारां बौद्धिक विकास होतो आणि उद्योगाच्याद्वारां तो होत नाहीं, असें जे मानतात त्यांनाहि वर्धा–योजना समजणार नाहीं. उलट, औद्योगिक शिक्षणाच्या द्वारा जितका बौद्धिक विकास होऊं शकेल तितका बहुधा पुस्तकी शिक्षणानें होणें कठिण आहे, ही भावना वर्धा–योजनेच्या मुळाशीं आहे.

वर्धा–योजनेचा मुख्य उद्देश बौद्धिक विकास अधिक सफल

बनविणें हा आहे. जर मुलाचा बौद्धिक विकास आजच्यापेक्षां अधिक प्रमाणांत होणार नाहीं, तर वर्धा-योजना निष्फळ आहे किंवा ती चालविणारांना आपलें कार्य कळन नव्हतें असेंच म्हणावें लागेल.

राष्ट्रोपयोगी उद्योगधंद्यांचें सफलतापूर्वक शिक्षण देणें हें देखील वर्धा-योजनेचें हार्द नाहीं. तिचें हार्द यांत आहे, कीं राष्ट्रीय उद्योगधंद्यांचें शिक्षण अशा प्रकारें देण्यांत यावें कीं त्या त्या उद्योगधंद्यांच्या माहितीबरोबरच सफल, समृद्ध आणि सर्वांगपरिपूर्ण अशा जीवनाला आवश्यक असणाऱ्या सर्व विषयांचें ज्ञान त्याच वेळीं आणि त्या उद्योगधंद्यांच्याद्वारां विद्यार्थ्याला प्राप्त करून घेतां येईल. केवळ प्राप्त करून घेतां येईल इतकेंच नव्हे, तर तें पचवून त्याच्या द्वारां आपली आकलनशक्ति व कौशल्यहि तो वाढवूं शकेल.

हा उद्देश सफल होण्यासाठीं उद्योगाचें कौशल्य विद्यार्थ्यांत उत्पन्न करीत असतांना त्या उद्योगाच्या सर्व अंग-प्रत्यंगांचा जीवनोपयोगी सर्व विषयांशीं जो निश्चित अनुबंध आहे, त्याच्याकडे विद्यार्थ्यांचें लक्ष वेधणें आणि अनुबंधाच्या साहाय्यानें भिन्नभिन्न विषयांचें ज्ञान योग्य प्रमाणांत देणें हें अत्यावश्यक आहे, अनुबंध दाखवीत दाखवीत योग्य प्रमाणांत जें ज्ञान दिलें जातें, तें सहज ग्रहण करितां येतें आणि अनायासानें पचूंहि शकतें. शाळा-कॉलेजांच्या बाहेर नियमबध्द शिक्षणाव्यतिरिक्त अनुभवांच्याद्वारां जें ज्ञान जन्मभर मिळत असतें त्याचें कधीं कोणाला ओझें वाटलेलें नाहीं. प्राकृतिक मनुष्य ज्या नैसर्गिक पध्दतीनें आयुष्यभर ज्ञान प्राप्त करून घेत असतो, त्याच रीतीनें ज्ञान प्राप्त करून घेण्याची पध्दति वर्धा-योजनेंत मान्य करण्यांत आली आहे. मनुष्याच्या जीवनांतील नवदशांश भाग आजीविका प्राप्त करून घेण्यांत खर्च होत असतो. कोणत्या ना कोणत्या तरी उद्योगधंद्याच्या

अथवा परिश्रमाच्याद्वारां त्याला आपली आजीविका प्राप्त करून घ्यावी लागते आणि तिच्या सफलतेसाठीं त्याला इकडच्या तिकडच्या बऱ्याच गोष्टी जाणाव्या लागतात. त्याचें ज्ञान जितकें अधिक, त्या प्रमाणांत त्याची जीवनसफलताहि अधिक. त्यामुळें आपली आजीविका प्राप्त करून घेण्यासाठीं तो जो उद्योग करीत असतो त्यावेळीं जागरूक राहून जीवनोपयोगी ज्ञान जेथून मिळेल तेथून मिळवीत असतो. ही जागरूकता थोडीदेखील कमी झाली, तर त्याच्या सफलतेंताहि तितकी न्यूनता उत्पन्न होते.

जीवनाच्या व्यापाराशीं ज्या ज्या गोष्टींचा अनुबंध आहे त्या त्या बाबतींत जागरूक राहणें हें वर्धा–योजनेचें हार्द आहे. आतां अनुबंध ही काय चीज आहे हें आपणांला प्रथम पाहिलें पाहिजे.

## २

अनुबंध या शब्दाला इंग्रजींत ‘को–रिलेशन’ असा शब्द आहे. याचें खरेंखुरें स्वरूप प्रथम चांगलें समजावून घेतलें पाहिजे.

ही सृष्टि एकरूप आहे. हिच्यामध्यें आढळून येणाऱ्या सर्व वस्तू कोणत्या ना कोणत्या रूपांत परस्परांशीं संबद्ध आहेत. कोळ्याच्या जाळ्यांत अथवा दुसऱ्या कोणत्याहि जाळ्यांत सर्व तंतूंचा परस्पर संबंध असतो. त्यांतील एक तंतु अथवा धागा ताणला गेला, तर त्याचा परिणाम सर्व जाळ्यावर झाल्याशिवाय राहात नाहीं. याचप्रमाणें या विश्वांतील सर्व वस्तू परस्परसंबद्ध आहेत. कोणत्याहि एका वस्तूची जर आपण पूर्णपणें छाननी करूं लागलों, तर तें संशोधन आपणांला विश्वांतील सर्व वस्तूंच्या सन्निध अवश्य घेऊन जाईल. यामुळें प्रत्येक वस्तूचा दुसऱ्या वस्तूंबरोबर कांहीं ना कांहीं संबंध असतोच. या

संबंधालाच अनुबंध म्हणतात. जर असा अनुबंध न सांपडला तर ? अशी शंका कधींहि मनांत आणितां कामा नये. अनुबंध तर विश्वांत सर्वत्र भरलेलाच आहे. तो शोधून काढण्याची आपली शक्ति असली पाहिजे.

'को-रिलेशन' या शब्दाला 'अनुबंध' हा शब्द नवीन नाहीं. तर्कशास्त्रांत देखील हा शब्द आढळून येतो आणि ग्रामीण लोकांच्या बोलींतहि तो सांपडतो. गीतेसारख्या सार्वभौम ग्रंथांतहि हा शब्द आढळून येतो आणि लोकोक्तिमध्येंहि त्याला स्थान आहे. एकाद्या वेळीं आपणांला एकाद्याच्या घरीं भोजन करण्याचा प्रसंग आला म्हणजे तो यजमान म्हणतो, 'अन्नपाण्याचा अनुबंध होता म्हणून आपणांला मजकडे भोजन करावें लागलें.' 'दाण्यादाण्यावर खाणाराचें नांव' प्रथमपासूनच लिहिलेलें असतें. म्हणून ज्या ठिकाणीं तो दाणा जाईल, तेथें त्याचें भक्षण करणाराहि अवश्य जाईलच. कारण, त्या दोघांमध्यें अनुबंध आहे. महाराष्ट्रांत अशा अवश्यंभावी संबंधाला 'ऋणानुबंध' असेंहि म्हणतात.

आपल्या संस्कृत परिपाठीप्रमाणें कोणत्याहि शास्त्राच्या अध्ययनास प्रारंभ करण्यापूर्वीं प्रथम त्या शास्त्राचें 'अनुबंध चतुष्टय' बघावें लागतें. विषय, प्रयोजन, अधिकारी आणि संबंध हे चार अनुबंध मुख्यतः पाहिले पाहिजेत, अशी शास्त्रीय अध्ययनाची पद्धति आहे. जीवनांत आणि अध्ययनांत 'अनुबन्धादिकं दृष्ट्वा सर्वं कार्यं यथाक्रमम्।' गीतेमध्येंहि सांगितलें आहे कीं, जो आपल्या कार्यांत अनुबंधादिक बघत नाहीं, त्याच्या कार्यांत त्यास सफलता मिळत नाहीं आणि त्याच्या ज्ञानांत अपूर्णता उत्पन्न होते. अपूर्णता कसली ? त्याचें सारें ज्ञानच नष्ट होऊन जातें.

या अनुबंधाचें, अर्थात् को–रिलेशनचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे. पुष्कळसे लोक ' को--रिलेशन ' आणि ' असोसिएशन ऑफ आयडियाज् ' ( सहचारी भाव ) यांच्यांत जो भेद आहे तो जाणत नाहींत. ' असोसिएशन ऑफ आयडियाज् ' काल्पनिकहि असूं शकते. पण अनुबंध ' वस्तुगत ' ( ऑब्जेक्टिव्ह ) असतो. असोसिएशन ' मनोगत ' ( सब्जेक्टिव्ह ) असते. कोणतीहि वस्तु पाहून नाममात्राचें साधर्म्य कल्पनेंत आलें असतां दुसऱ्या कोणत्या तरी वस्तूचें स्मरण होणें हें असोसिएशन ऑफ आयडियाज् होय. हा लैंगिक प्रयोग झाला. अनुबंधाची गोष्ट याहून निराळी आहे. अनुबंध कल्पनेंत येवो अगर न येवो; तो वस्तुगत आहेच. म्हणून अनुबंध शोधून काढणें आणि त्याच्या साहाय्यानें पुढें जाणें ही शास्त्रशुद्ध क्रिया होय.

३

ज्या लोकांना कधींहि ' शिक्षण ' मिळालेलें नसतें पण जे जीवन--व्यवहारांत जागरूक राहून आपल्या ज्ञानाची आणि आपल्या कार्यकौशल्याची वृद्धि करीत असतात. अशा लोकांमध्यें एक प्रकारची स्फूर्ति, प्रत्युत्पन्न बुद्धि आणि आत्मविश्वास आढळून येतो. याचें कारण असें आहे कीं, ते केवळ ज्ञानाच्या पाठीमागें लागलेले नसतात. त्यांना केवळ जगावयाचें असतें. खाणें, पिणें, निरोगी राहणें, वस्तुमात्राचें आकलन करून घेऊन त्यापासून लाभ मिळविणें, आपली कर्तृत्वशक्ति वाढविणें, अंतःकरणापासून प्रेम करणें आणि आपल्या व्यक्तिमत्वाचा विकास करून जीवन समृद्ध करणें हेंच त्यांच्या जीवनाचें प्रयोजन असतें.

यांच्याशीं तुलना करितां, जे लोक केवळ धनसंग्रह वाढविण्याची इच्छा बाळगितात, केवळ साधन-संपत्तीचा ढीग जमवूं बघतात, ज्ञानाचा भार वाढवून त्याच्याखालीं स्वतःला दडपून घेऊं इच्छितात, त्यांचें जीवन खरोखर असमर्थ आणि अनुकंपनीय होऊन जातें.

जितकी क्षुधा असेल त्याहून जो मनुष्य अधिक भक्षण करितो त्याची प्रकृति बिघडते, तो दुर्बल बनतो, त्याचा उत्साह नष्ट होतो आणि ज्या प्राथमिक प्रेरणेनें तो भक्षण करीत असतो, तिची तीव्रता आणि अभिरुचीहि क्षीण आणि विकृत होऊन जाते. जेवढी क्षुधा असेल त्याहून अधिक भक्षण करणाराला आणि क्षुधा नसतांनाहि भक्षण करणाराला खाद्य वस्तूचा पूर्ण आस्वाद मिळत नाहीं. त्याच्या जिव्हेची शक्ति कमी होते. आस्वादामधील सूक्ष्म भेद तर त्याला कळताहि नाहीं. त्याच्या श्वासांतून दुर्गंध बाहेर येतो. दांत कमकुवत होतात, मुखकांति मलिन होऊन जाते आणि शेवटीं अपचन, बद्धकोष्ट, अतिसार इत्यादि अनेक रोगांना तो बळी पडतो.

तोच मनुष्य जर खाण्याच्या पाठीमागें न लागतां सफलतापूर्वक जगण्याचा प्रयत्न करील, जमीन खणणें, लांकडें तोडणें, पोहणें, दौड करणें, ओझीं वाहणें, घोड्यावर बसून रपेट करणें इत्यादि आनंददायी जीवन-व्यवसायांत मस्त राहील आणि केवळ क्षुधानिवारणासाठींच खाण्याची कल्पना ठेवील, तर तो पहिल्या मनुष्यापेक्षां अधिक भक्षण करूं शकेल. त्याला भक्षणांत अधिक आस्वाद मिळेल आणि त्यानें यथेच्छ खाल्लें, अवेळींहि खाल्लें, तरी देखील त्याला भोजनाचा भार वाटणार नाहीं. पशुपक्षी निसर्गाच्या प्रेरणेशीं प्रामाणिक राहतात म्हणून त्यांना कधींहि अपचन झालेलें नाहीं. अरण्यांतील पशुपक्षी आणि वानरें सारा दिवस फिरत असतात, बागडत–उड्या मारीत

असतात आणि खात असतात. त्यांना कधींहि अपचन झालेलें नाहीं. केवळ मनुष्यांसाठीं आणि मनुष्यांबरोबर संबंध ठेवून बिघडलेल्या पशुपक्ष्यांसाठींच अपचन आहे.

भोजनाच्या बाबतींत जी गोष्ट आपण वर पाहिली, तीच ज्ञानाला आणि धनालाहि लागू पडते. आपण भोजनाच्या पाठीमागें लागूं नये. केवळ जीवनाच्या पाठीमागें लागावें. जगतां जगतां जेवढें भोजन घेणें भाग पडलें तेवढेंच घेतलें, हाच नियम जर आपण ज्ञानाला लागूं केला आणि निरर्थक ज्ञानसंग्रह केला नाहीं, तर ज्ञानाच्या अपचनानें जी बौद्धिक क्षीणता येते, नैतिक निर्णयांत जो अनिश्चय उत्पन्न होतो, ते दोष जीवनांत शिरणार नाहींत. मेहनत-मजुरीनें क्षुधा जशी प्रखर होते, त्याचप्रमाणें जीवन-व्यापाराला जेव्हां आपण बुद्धियुक्त, हेतुयुक्त आणि विशाल योजनायुक्त बनवितों तेव्हां जिज्ञासा आणि *चिकीर्षा-रूपी क्षुधा इतकी प्रखर होते, कीं अखिल जगताचें ज्ञान बुद्धिगत केल्यानंतरहि आणि सर्व प्रकारचें कौशल्य हस्तगत केल्यानंतरहि त्यांचें ओझें वाटणार नाहीं.

आहारसेवनांत आपण भोजनपरायण बनतां कामा नये; जीवनपरायण बनलें पाहिजे. शिक्षणग्रहणांतहि आपण ज्ञानपरायण बनतां कामा नये, तर जीवनपरायणच बनलें पाहिजे आणि साधन-संग्रहांतदेखील आपण संपत्तिनारायण न बनतां जर जीवनपरायणच बनलों, तर आमचें जीवन निरामय, समर्थ आणि समृद्ध होईल आणि शारीरिक, बौद्धिक आणि सामाजिक रोगांतून आपण सर्वथा मुक्त होऊं.

---

*__चिकीर्षा__—आमचीं कर्मेंद्रियें आणि ज्ञानेंद्रियें यांची सतत व्यायाम-शीलता; आपापल्या विषयांना स्पर्श करून त्या विषयांचा आणि आपल्या शक्तीचा परस्परपरिचय करून देण्याची त्यांची क्रिया. ही जिजीविषेचें एक आवश्यक अंग आहे.

आपण उत्कटतेनें जगण्याचा प्रयत्न केला पाहिजे. जीवनाच्या सगळ्याच्या सगळ्या पैलूंचा जर आपण विकास करीत जाऊं, तर जीवनाचें प्रत्येक अंग-प्रत्यंग, आपणांशीं अनुबद्ध असलेलें सर्व ज्ञान आणि कौशल्य यांची आपोआप मागणी करील. आणि ज्या वस्तूची मागणी निसर्ग-नियमानुसार झालेली नसेल, त्या वस्तूचा व्यर्थ संग्रह करण्याचा लोभ आपण बिलकुल धरणार नाहीं. (सर्वसाधारण शिक्षणांतलेंच एक उदाहरण घ्या. गुणाकारावांचून गणित-व्यवहार चालूं शकत नाहीं. गुणाकार त्वरित करितां यावा म्हणून आपण पाढे शिकतों. जे लोक ज्ञानपरायण आहेत ते एकापासून हजार, लाख अथवा कोटीपर्यंतचे पाढे बनवून ते कंठगत करण्याकरितां बैठक ठोकून बसतील आणि त्या खटाटोपांतच मग्न होऊन शेवटीं मरून जातील. याच्या उलट, जे लोक जीवन-व्यवहारालाच प्रधान मानितात त्यांना माहीत असतें कीं विसाच्या किंवा तिसाच्या पुढचे पाढे कांहीं कामाचे नाहींत, त्यांत फायदा कमी आहे, केवळ ओझ्याचा भार अधिक आहे. यांतहि जे लोक केवळ ज्ञानपरायण आहेत अथवा अंध आहेत, ते एकापासून वीसपर्यंतचे पाढे कंठगत करीत राहतील आणि आणखी पुढें जाऊन ज्या पाढ्यांचा व्यवहारांत कांहीं उपयोग असतो ते पाढे विसरून जातील. जे गणिताची पर्वा करीत नाहींत, तर व्यवहाराची पर्वा करितात ते लोक अकरा, तेरा, चौदा, सतरा, अठरा आणि एकोणीस यांचे पाढे पाठ करणार नाहींत. आठवड्याचे दिवस मोजावयाचे असतात म्हणून साताचा पाढा उपयुक्त आहे. डझनाचा आणि रुपये-आण्यांचा व्यवहारांत वारंवार उपयोग होत असतो, म्हणून बाराचा आणि सोळाचा पाढा आवश्यक आहे. डबल रोटीच्या भटारखान्यांत तेरा रोट्यांचें एक डझन होत असतें, तेथें तर बाराच्या बरोबर

तेराच्या पाढ्याचीहि आठवण ठेवावी लागेल. सारांश, व्यवहारांत ज्या ज्ञानाची अधिक आवश्यकता असते तें ज्ञान आपण शोधीत राहूं. तेंच ज्ञान आपोआप स्थिर होत जाईल आणि बाकीचें विस्मृति-प्रवाहांत वाहून जाऊन मेंदूवरचा भार हलका करील. आवश्यक वस्तूंचा संग्रह करणें आणि निरर्थक वस्तूंचा त्याग करणें हा सिद्धांत प्रत्येक संग्रहालयांत, ग्रंथालयांत, म्युनिसिपालिटींत जेवढा आवश्यक आहे, तेवढाच ज्ञानसंग्रहाच्या बाबतींतहि आवश्यक आहे. आणि संपत्तीच्या बाबतींत तर या सिद्धांतपालनाची आवश्यकता अतिशयच आहे. )

अनुबंधाचा सार्वभौम सिद्धांत हेंच सांगत आहे कीं, जीवन जगून जा. जीवनाला शुद्ध, 'समर्थ आणि समृद्ध बनवीत जा. आतां जगण्याला परिश्रम आवश्यक आहे, आहार आवश्यक आहे, आजीविकेचें साधन आणि कौशल्य आवश्यक आहे. सामाजिक संघटन आवश्यक आहे. या सर्व खऱ्याखुऱ्या आवश्यकतांच्या परिपूर्तीकरितां जें कांहीं ज्ञान आणि हस्तकौशल्य ज्या क्रमानें आवश्यक होत जाईल, त्याच क्रमानें त्यांची उपासना करा आाणि वृथा संग्रहाचा लोभ करूं नका. व्याख्यानांत असंबध्द गोष्टी आणिल्यानें व्याख्यान नीरस आणि भाररूप होतें. शिक्षणव्यापारांत वास्तविक जीवनाशीं ज्या ज्या गोष्टी अननुबध्द आहेत, असंबध्द आहेत, त्यांच्याविषयींहि तसेंच समजलें पाहिजे.

४

अनुबद्ध शिक्षणपद्धतींत जो अभ्यासक्रम ( सिलेबस ) दिला जातो, तो केवळ सूचनामात्र म्हणून असतो. अनुभवी लोकांनीं केलेलें तें

केवळ मार्गदर्शन असतें. वर्धा–योजनेंत जो अभ्यासक्रम दिला आहे, त्यांत हाच मोठा दोष राहून गेला आहे. कारण, वर्धा–योजना तयार करणारे आम्ही लोक ज्ञानपरायण होतों, जीवनपरायण नव्हतों. ज्ञानप्रेमी आणि ज्ञानलोभी अशा आम्हीं लोकांनीं अनुमान केलें कीं, जीवनांत अमुक अमुक गोष्टींची आवश्यकता राहीलच आणि त्यांचा अनुबंध जीवनाबरोबर सिद्ध होईलच. आजहि मी असें म्हणत नाहीं कीं तो सिद्ध होणार नाहीं, परंतु केवळ अभ्यासक्रम देणें एवढेंच आमचें काम नव्हतें. क्रांति करावयास निघालेले आम्ही जुन्या चाकोरींतूनच चालूं लागलों ! आम्हीं हें दाखवावयास पाहिजे होतें कीं जीवनशुद्धि, जीवनसामर्थ्य आणि जीवनसमृद्धि यांच्या पाठोपाठ जात असतां आम्हांला निसर्गाबरोबर कोणकोणत्या गोष्टींचा परिचय वाढविणें आवश्यक होऊन बसतें. जगण्यासाठीं जो व्यवसाय हस्तगत करावा लागतो, तो सिद्ध करीत करीत आम्हीं हें दाखवावयास पाहिजे होतें कीं, आपण कोणकोणतें हस्तकौशल्य हस्तगत केलें पाहिजे. प्रत्येक हस्तकौशल्याबरोबर कोणकोणतें ज्ञान आवश्यक आहे, हें आम्ही सहज दाखवूं शकलों असतों. प्रत्येक शिक्षकाला हें स्वातंत्र्य असलेंच पाहिजे, कीं आजीविकेसाठीं कसलीहि कला शिकवीत असतां तिच्याबरोबर किती प्रमाणांत ज्ञान आणि हस्तकौशल्य विद्यार्थ्यांसमोर ठेविलें जावें आणि प्रत्येक विद्यार्थ्याचाहि हा अधिकार असलाच पाहिजे, कीं त्याच्यापुढें जें वाढलें जातें त्यांतून त्यानें किती ग्रहण करावें, विद्यार्थी जर बेदरकार असेल, आळशी असेल, तर त्याला आपण आपल्या जबरदस्तीचा गुलाम बनवावें हा उपाय नाहीं. शिक्षक जर कर्तव्यपरायण नसेल तर त्याला हा उपाय नव्हे, कीं आपण त्याच्या पाठीमागें इन्स्पेक्शनचें कुत्रें लावून द्यावें. जो शिक्षक कर्तव्यपरायण नाहीं त्याला सुधारण्याचा आपण प्रयत्न करावा आणि जर त्याच्यांत

सुधारण्याची कुवत नसेल तर त्याला रजा द्यावी. पण त्याच्यावर अविश्वास राखावा, पहारा ठेवावा, धाक दाखवून त्याच्याकडून काम घ्यावें आणि त्याचा अपमान करावा, हा आपला अधिकार नाहीं आणि यांत शिक्षणाच्या दृष्टीनें फायदाहि नाहीं.

आमच्या शिक्षकांची अध्यापनकला साधारणच आहे, त्यांचें ज्ञान अत्यल्प आहे, त्यांची कर्तव्यबुध्दीहि खूपच शिथिल आहे हें आपणांला माहीत आहे. इन्स्पेक्टर ठेवणें हा या सर्व उणीवा दूर करण्याचा उपाय नव्हे. त्यासाठीं तर आम्हीं परिव्राजक असे 'गुरूणां गुरुः' नियुक्त केले पाहिजेत. धर्मप्रचारक ज्याप्रमाणें लोकांमध्यें धर्मसाधनेचा उत्साह वाढवीत असतांच चारित्र्यशुद्धीचा उत्साह निर्माण करितात, त्याचप्रमाणें शिक्षणप्रचारकांनीं देशामध्यें सर्वत्र हिंडून शिक्षणसंस्थांत गेलें पाहिजे आणि शिक्षण-मित्र बनून शिक्षकांचें ज्ञान वाढविलें पाहिजे. त्यांचे आदर्श उच्च केले पाहिजेत.

परंतु अभ्यासक्रमाचा अंतिम निर्णय मात्र शिक्षकांच्याच हातीं राखून ठेविला पाहिजे. आमचे छापलेले अभ्यासक्रम केवळ सूचनामात्र आहेत. प्रत्येक ठिकाणीं विद्यार्थी आणि शिक्षक यांच्या सामाजिक सहयोगाच्या द्वारा जी कांहीं क्षुधा उत्पन्न होईल, तिची तृप्ति करणें हा सार्वभौम नियम ठेविला पाहिजे.

हीच गोष्ट जर अन्य शब्दांत स्पष्ट करावयाची असेल तर आम्ही शिक्षणक्षेत्रांत जिज्ञासा आणि विजिगीषा* यांना केंद्रस्थानीं न राखतां

* **विजिगीषा**—एखाद्याला पराभूत करून त्याच्यावर विजय मिळविणें, त्याला आपल्या ताब्यांत ठेवणें आणि त्याचा स्वामी बनणें. विजयाची इच्छा म्हणजे विजिगीषा.

जिजीविषेला× शिक्षणाचें केंद्र बनविलें पाहिजे. जिजीविषेच्या बरोबर चिकीर्षा आणि सिसृक्षा+ येतच असतात आणि त्यांच्या तृप्तीसाठीं जिज्ञासा आपोआप वाढत जात असते. केवळ जिज्ञासा आणि विजिगीषा यांनाच दृष्टीसमोर ठेविल्यानें उपार्जनबुद्धि, संग्रहबुद्धि, द्रोह आणि हिंसा वृध्दिंगत होऊं लागतात आणि मानवतेचा नाश होतो. खाद्यलोभ, धनलोभ आणि ज्ञानलोभ हे तीनहि असामाजिक आहेत आणि 'लोभमूलानि पापानि' या सूत्रानुसार पापमूलक आहेत. ज्या ठिकाणीं लोभ असतो तेथेंच विजिगीषा असते, द्रोह असतो, हिंसा असते.

× **जिजीविषा**—जगण्याची इच्छा. आपण आपलें जीवन सिद्ध करावें, त्याचें ज्ञान करून घ्यावें, तें कृतार्थ करावें, या धारणेला जिजीविषा म्हणतात.

+ **सिसृक्षा**—मनुष्य स्वतः एक सृष्ट पदार्थ असला, तरी आपल्या बुद्धीच्या योगानें तो विधात्याचा सहयोगीहि आहे. त्याच्यासमोर जें विश्व पसरलें आहे त्याचें ज्ञान करून घेणें आणि त्याच्यामध्यें आपलें जीवन सिद्ध करण्याकरितां कांहीं ना कांहीं कार्य करीत राहणें एवढ्यांतच त्याला संतोष वाटत नाहीं. आपल्या मनांत तो कांहीं ना कांहीं योजना तयार करीत असतो आणि त्या योजनेंत आपलें घटना-कौशल्य अजमावूं इच्छितो. तो ज्याप्रमाणें सृष्ट आहे, त्याचप्रमाणें सर्जकहि बनूं इच्छितो.

याच प्रेरणेनें तो मातृपदाचा आणि पितृपदाचा अधिकारी बनतो. याच प्रेरणेनें तो समाजव्यवस्थापक बनतो. हीच प्रेरणा त्याला कलावान् आणि कवि बनविते. आणि जेव्हां तो सुधारक अथवा क्रांतिकारक बनतो, तेव्हांदेखील हीच सिसृक्षा–निर्माण करण्याची वृत्ति त्याला प्रेरक होत असते.

जेव्हां एकादी व्यक्ति ब्रह्मचर्याचें पालन करून सामाजिक वा आध्यात्मिक क्षेत्रांत अग्रसर बनते तेव्हांहि त्या व्यक्तींत सिसृक्षेचा अभाव असत नाहीं. तर त्या सिसृक्षेच्या खालच्या भूमिकेवरील विस्तार रोखून धरून तिला उच्च आध्यात्मिक क्षेत्रामध्यें ती व्यक्ति घेऊन जात असते.

जेथें केवळ जिजीविषा आहे, चिकीर्षा आहे, आणि सिसृक्षा आहे तेथें सहयोग, सेवा, शुध्दि आणि अहिंसा असते. जेव्हां शिक्षण-प्रवृत्तीच्या आद्य प्रेरणेंतच याप्रमाणें परिवर्तन होईल, तेव्हां जीवन-व्यापारामधूनच शिक्षणव्यापार फलित होईल; आणि या दोहोंच्या सिद्धीसाठीं अनुबंधाचें संशोधन स्वाभाविकतया सिध्द होईल.

५

मोठमोठे शिक्षणशास्त्री सुद्धां असेंच मानून बसले आहेत कीं, " अनुबन्धाची कला अतिशय अवघड आहे. प्रतिभाशाली व्यक्तीलाच त्या बाबतींत मार्गदर्शन करितां येईल आणि ज्यांचेजवळ असाधारण कल्पनावैभव आहे, अशाच लोकांना अनुबन्ध–पद्धति यशस्वी करून दाखवितां येईल. " याचा परिणाम असा झाला आहे, कीं ज्यामुळें कांहीं ना कांहीं प्राप्ति होऊं शकेल, असे राष्ट्रोपयोगी उद्योग शिकण्याची गोष्ट लोकांना समजूं शकते. परंतु त्याबरोबर जितका वेळ मिळेल तेवढ्यांत पुस्तकी शिक्षण होईल अशी त्यांची अपेक्षा असते. पण जेव्हां गांधीजी म्हणतात कीं, ' हें वर्धा–शिक्षण नव्हे, ' तेव्हां ते फार बुचकळ्यांत पडतात. आजपर्यंत कोणींहि उद्योगशिक्षणाचे द्वारा इतर विषयदेखील शिकवून दाखविलेलेच नाहींत. म्हणून लोकांचा अनुबन्धपद्धतीच्या शिक्षणावर विश्वासच बसत नाहीं. ज्या ठिकाणीं शिक्षक तयार केले जातात, त्या ठिकाणीं कांहीं कांहीं संस्थांचे चालक आपल्या विद्यार्थ्यांना सांगतात कीं, " या बाबतींत खुद्द आम्हांला काय किंवा तुम्हांला काय, कोणालाच कांहीं माहीत नाहीं. तेव्हां तुम्ही सर्व एकत्र बसून आपसांत विचार करा आणि अनुबन्धाचा प्रकार शोधून काढा." मग हे विद्यार्थी–शिक्षक

देखील गांवांत जाऊन आपल्या बालविद्यार्थ्यांना असें सांगूं लागले कीं, " तुम्हीसुद्धां स्वतःच अनुबन्धाचा शोध करा " तर त्यांत आश्चर्य कसलें ? " मागून आलें तें पुढें सारलें " म्हणजे झालें.

म्हणून अनुबन्ध–शिक्षणपद्धतीचे कांहीं धडे केवळ तयार करून दाखविल्यानें भागणार नाहीं. तर ते छापून काढून वर्धा–शिक्षणाचा प्रयोग जेथें चालू आहे किंवा चालू होण्याचा संभव आहे, तेथें पाठविले जाण्याची जरुरी आहे.

असें करण्यापूर्वी अनुबन्ध-पद्धतीच्या शिक्षणाचा प्रकार येथें थोडासा स्पष्ट करून दिला पाहिजे.

समजा, बायबलांत पारंगत असलेल्या एकाद्या मिशनऱ्याजवळ आपल्याला रस्किन शिकावयाचा आहे. रस्किनचे विचार उदार असून त्याची लेखनशैली इंग्रजींत असाधारण सुंदर समजली जाते. आपणाला तर रस्किनचे विचार व त्याची भाषाशैली यांच्याशींच कर्तव्य आहे. पण रस्किनच्या लहानपणीं त्याच्या आईनें त्याला बायबल शिकविलें होतें आणि त्याच्याकडून तें इतकें चांगलें मुखोद्गत करविलें होतें, कीं रस्किनच्या लेखनांत बायबलांतील शब्द, वाक्प्रयोग व संदर्भ जागोजाग विखुरलेले आढळतात. यामुळें जर रस्किन नीट समजून घ्यावयाचा असेल, तर जेथें बायबलांतील उल्लेख आला असेल तेथें बायबलांतील तेवढा अंश समजून घेतलाच पाहिजे. सारें बायबल वाचण्याचा आपला संकल्पच नाहीं. फक्त जेथें आणि जितका बायबलांतील उल्लेख आहे, तितकाच भाग नीट समजून घ्यावयाचा आहे. या रीतीनें बायबलाचा पद्धतशीर अभ्यास होणार नाहीं. परंतु रस्किन हा लेखकच असा आहे, कीं त्याच्या पुस्तकांतून बायबलांतील महत्त्वाची अशी गोष्ट क्वचितच निसटली असेल. यामुळें शेवटीं

असें होईल, कीं रस्किनचा अभ्यास पूर्ण होण्याच्या सुमारास आपण बायबलाचेंहि कामचलाऊ पंडित बनूं. आणि तेवढें बायबल शिकण्याचें आपणांस कांहीं ओझें वाटणार नाहीं. बायबलाचा एकादा भाग राहून गेला तरी बिघडणार नाहीं. आणखी कोणा लेखकाचीं इंग्रजी पुस्तकें वाचीत असतांना त्याचा उल्लेख आल्यास तेथें तो वाचतां येईल. आणि तो जर कोठेंहि आला नाहीं, तर ज्याचा उल्लेख कोठेंच येत नाहीं त्याचें ज्ञान प्राप्त करून घेतल्याशिवाय आपण राहिलों म्हणून आपलें कांहीं बिघडणार नाहीं. त्याची किंमतच काय ? आपले मिशनरीशिक्षक तेवढा भाग आपणाला शिकविण्यासाठीं त्याचा रस्किनशीं ओढूनताणून अनुबंध जोडूं लागतील, तर तेंहि आपणांला आवडणार नाहीं.

या उदाहरणावरून अनुबन्धाची पद्धति व त्याची मर्यादा यांची नीट कल्पना येईल. आपल्या संस्कृत ग्रंथांचे टीकाकारसुध्दां आपली टीका लिहितेवेळीं अनुबन्धाच्या पद्धतीचाच कमीअधिक उपयोग करतात. ज्या ठिकाणीं ज्या गोष्टीचा उल्लेख येईल, त्या ठिकाणीं तिचें संपूर्ण विवरण करून ते पुढें जातात. अशा प्रकारें व्याकरण, छंदःशास्त्र, अलंकारशास्त्र, एवढेंच नव्हे, तर संगीत, वैद्यक, कर्मकाण्ड, युद्धशास्त्र, राजनीति इत्यादि सर्वच विषय थोडे थोडे येतात. आणि टीकेच्या सहाय्यानें अध्ययन करणारा विद्यार्थी आपल्या विषयांत सर्वज्ञ आणि बाकीच्या सर्व विषयांत बहुश्रुत बनतो. अनुबन्धाची मर्यादा सोडून टीकेंत इकडल्या तिकडल्या असंबद्ध गोष्टी दडपून देणाऱ्या टीकाकारांचें हंसें होत असे. जो टीकाकार आपल्या ज्ञानाचें प्रदर्शन करण्याच्या उद्देशानें निरर्थक गोष्टी वाचकांसमोर ठेवी, त्याची फजीती होत असे. कालिदासाच्या

साहित्यावर टीका लिहिणाऱ्या मल्लीनाथानें आरंभींच प्रतिज्ञा केली आहे :–

" नामूलं लिख्यते किंचित् । नानपेक्षितमुच्यते ॥ "

या टीकाकारांपैकीं पुष्कळसे लोक अनेक शास्त्रांत पारंगत असत आणि आपल्या टीकांच्या द्वारा अध्ययनशील विद्यार्थ्यांना त्या सर्व शास्त्रांचें थोडथोडें ज्ञान अनुबन्ध–पद्धतीनें देत असत.

महाभारत हा ग्रंथ देखील अनुबन्ध–पद्धतीचाच एक नमुना आहे. जेथें ज्या गोष्टीचा उल्लेख आला आहे, तेथें ती विस्तारपूर्वक समजावून देण्यांत आलेली आहे. तसें पाहिलें तर महाभारत हें केवळ भारतीय युद्धाचें वर्णन आहे. परंतु त्यांत अनुबन्धाच्या द्वारा तत्कालीन भारतीय संस्कृतीचें संपूर्ण चित्र तिच्या अंगोपांगांसह रेखाटलें गेलें आहे. तत्कालीन युद्धनीति, राजनीति, धर्मचर्चा, तीर्थाटन, लोककथा, राजवंशावली, प्रमाणशास्त्र, भूरचना, स्वर्गलोक इत्यादि साऱ्या दुनियेच्या गोष्टींचा उल्लेख त्यांत येतो. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांची अनेकविध शास्त्रें त्यांत येतात, आणि तींसुद्धां अनुबन्धपद्धतीनें आणि यथाप्रमाण. आज देखील जेव्हां आपण एखाद्या अभिजात ग्रंथाचें अध्ययन करितों, तेव्हां अध्यापक आपल्या टिपणांचे द्वारा त्या ग्रंथांतील विषयाची आणि त्यांत आलेल्या उल्लेखांच्या अनुबन्धाच्या आधारानें अनेक विषयांची आणि साहित्यांची माहिती आपणांस देत असतात.

टिपणें किंवा टीका लिहिणारा अध्यापक जेव्हां कधीं एखाद्या मोठ्या ग्रंथालयांत जाऊन बसतो, तेव्हां तो आपल्या पुस्तकाचा अनुबन्ध साऱ्या ग्रंथालयांत अनेक जागीं शोधतो आणि अशा प्रकारें आपल्या पाठ्य विषयावर प्रकाश पाडून घेतो.

रेनानला येशूचें जीवनचरित्र लिहावयाचें होतें, तेव्हां तो जरुसलेम येथें गेला आणि येशूच्या जीवनाशीं ज्या ज्या गोष्टींचा अनुबन्ध होता त्या सर्व गोष्टी त्यानें पाहिल्या. आनातोले फ्रान्स यानें आपली 'थाइ' ही कादंबरी लिहिली, तेव्हां त्यानें रोमन इतिहास आणि ख्रिस्ती धर्माचा प्रारंभींचा सर्व इतिहास पाहून घेतला होता. कारण, आपल्या कथेशीं तो इतिहास त्याला अनुबद्ध करावयाचा होता. जॉर्ज इलियटला 'रोमोला' कादंबरी लिहावयाची होती, तेव्हां तिनें सेवेनारोलाच्या काळचा सारा इतिहास वाचून काढला; इतकेंच नव्हे, तर त्या काळीं जे उत्सव केले जात त्यांची बारीकसारीक माहितीहि तिनें मिळविली. तत्कालीन लोकजीवन जॉर्ज इलियटला जेव्हां समक्ष पाहिल्याप्रमाणें ज्ञात झालें, तेव्हांच तिला 'रोमोला' सारखी जिवंत कादंबरी निर्मितां आली. जॉर्ज इलियटचें नांव कांहीं इतिहासकार म्हणून कोठें प्रसिद्ध नाहीं. तिला फक्त आपली एक कादंबरी एका ऐतिहासिक कालखंडांत बसवावयाची होती व तिच्यांत चैतन्य आणावयाचें होतें. म्हणून कादंबरींतील कथानकाशीं ज्या ज्या गोष्टींचा अनुबन्ध जोडला जात होता, त्या गोष्टी मोठ्या उत्साहानें व प्रेमानें तिनें आपल्याशा केल्या.

आज लोक असें म्हणूं शकतात कीं, सेवेनारोलाच्या काळाचें साक्षात् दर्शन जॉर्ज इलियटनें आम्हांस जसें करविलें आहे, तसें इतिहासकारालासुद्धां करवितां येणार नाहीं. शेक्स्पिअर आणि टेनिसन्च्या बाबतींतसुद्धां असेंच म्हणतां येईल. मेकॉलेसारख्या इतिहासकारानें कबूल केलें आहे कीं, इंग्लंडच्या इतिहासांतील मर्म आपणांला जसें शेक्स्पिअरमध्यें सांपडलें तसें इतिहासग्रंथांतून सांपडलें नाहीं.

जें ज्ञान अनुबंधपद्धतीच्या द्वारा दिलें किंवा घेतलें जातें, तें सहज पचवितां येतें. तें कधींच भाररूप वाटत नाहीं आणि कायमचें उपस्थित राहून तें प्राणशक्ति वाढवीत असतें.

आम्हीं नवी गोष्ट एवढीच काढली आहे कीं, अनुबन्धाची संस्कारिता केवळ पांढरपेशा लोकांसच नव्हे, तर उन्हातान्हांतून राबणाऱ्या ऐशीं टक्क्यांहून अधिक संख्या असणाऱ्या श्रमजीवी लोकांसहि मिळावी. सारें आवश्यक ज्ञान व संस्कारिता हीं जेव्हां उद्योगधंद्याशीं अनुबद्ध होतील, तेव्हांच तीं श्रमजीवी लोकांस सुलभ होतील. शिक्षणाच्या नांवाखालीं श्रमजीवी लोकांस श्रमविमुख करून परोपजीवी पांढरपेशा लोकांची संख्या वाढविणें म्हणजे हिंदुस्थानाला आत्महत्त्येच्या मार्गाकडे नेणें होय. आणि श्रमजीवी लोकांना विद्या व संस्कार यांपासून वंचित ठेवणें, हा तर पहिल्या प्रतीचा समाजद्रोह आहे.

म्हणून देशांतील कोट्यवधि लोकांना आजीविका, ज्ञान आणि कौशल्य देऊन त्याच्याशीं बाकीचें सारें ज्ञान अनुबद्ध करण्याचा प्रकार आम्हीं शोधून काढला आहे.

६

काम करीत असतांना धनाची जसजशी आवश्यकता वाटेल, तसतसें आम्हीं धन गोळा करीत जावें, आणि त्याचा व्यय करीत जावें, ही स्वाभाविक स्थिति आहे. अशा धनाचें कधींच ओझें वाटत नाहीं.

जितकी भूक लागली तितकेंच खाल्लें आणि काम करूं लागलें,

थकून गेल्यावर थोडीशी विश्रांति घेतली, पुन्हां भूक लागतांच पुन्हां खाल्लें आणि पुनश्च काम करूं लागलें, ही स्वाभाविक स्थिति आहे. यामुळें आरोग्य चांगलें राहतें, शक्ति वाढते, पुरुषार्थ सिद्ध होतो, आणि पोट, रक्त किंवा मेंदू यांवर कसलाच ताण पडत नाहीं. मिताहाराचें हें रहस्य प्रत्येकास माहीत आहे. मितधनार्जनाचें रहस्य अजून मनुष्याच्या लक्षांत आलेलें नाहीं. म्हणून तो बिलकुल विचार केल्याशिवाय हावरेपणानें धनार्जन करीत जातो आणि धनरोगानें ग्रस्त होतो.

पोटांत फाजील अन्न कोंबल्यानें तें आंत सडूं लागतें आणि आरोग्याचा बिघाड करितें. खिशांत फाजील धन सांचविल्यानें तें लुटलें जाण्याची भीति निर्माण होते. आणि मस्तकांत धनाची कृत्रिम कल्पना जमल्यामुळें मस्तकहि बिघडून जातें.

ज्ञानाचा जेव्हां अत्याहार होतो आणि अजीर्ण होतें तेव्हां त्यामुळें काय काय हानी होतात, याची कल्पना मानवजातीला अद्यापि आलेली नाहीं.

आवश्यकता आहे ती केवळ ज्ञानवृद्धीची नाहीं, पण जीवनसमृध्दीची आहे. जीवन जसजसें समृध्द होत जातें तसतशी ज्ञानाची भूक वाढतच जाते आणि अशा रीतीनें जीवनसमृध्दीसाठीं जें ज्ञान संपादन केलें जातें, तें भाररूप होत नाहीं; उलट, जीवनपुष्टि, जीवनतुष्टि व पुरुषार्थ यांना तें वृध्दिंगत करितें.

शिक्षणशास्त्र्यांना ही गोष्ट वारंवार सांगण्याची आवश्यकता आहे, म्हणून तिची पुनरावृत्ति केली आहे. ही दृष्टि पूर्णपणें नवीन असल्यामुळें तिचा वारंवार पुनरुच्चार केला पाहिजे.

आजपर्यंत शिक्षणशास्त्री मानीत असत, कीं शिक्षणाचा उद्देश ज्ञानवृद्धि हा आहे. त्यानंतर या उद्देशांत सुधारणा करून ते म्हणूं लागले, कीं शिक्षणाचा उद्देश ज्ञानाची समृध्दि हा तर आहेच, परंतु त्याबरोबर संस्कारिता वाढविणें हाहि आहे; कारण तेव्हांच कोठें मनुष्य प्रभावशाली बनतो आणि नेतृत्वाचे गुण प्रकट करितो.

राजसत्तेचे दिवस संपून जेव्हां लोकसत्तेचे दिवस आले, तेव्हां शिक्षणाच्या उद्देशांत आणखी एका गोष्टीची भर पडली. ती ही कीं, शिक्षणाच्या द्वारा कौशल्याची वृध्दि झाली पाहिजे आणि धनार्जनाची पात्रताहि आली पाहिजे. या परिवर्तनाकडेहि आपणं लक्ष दिलें पाहिजे. शिक्षणाच्या हेतूंत हें संशोधन होतांच पांढरपेशांच्या संस्कारितेची प्रतिष्ठा कांहींशी कमी झाली आहे.

परंतु आतां आपणांस हें समजून घेतलें पाहिजे, कीं शिक्षणाचा उद्देश प्रधानतया जीवनशुध्दि आणि जीवनसमृध्दि हाच असणें उचित आहे.

“ जीवनासाठीं शिक्षण ” नाहीं; पण “ जीवनद्वारा शिक्षण व शिक्षणद्वारा जीवन ” हेंच आमचें सूत्र झालें पाहिजे.

विद्यामंदिरांत काय शिकविलें जातें या प्रश्नापेक्षां विद्यामंदिरांत जीवन कशा प्रकारें घालविलें जातें, हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. जो मूलोद्योग आपण निवडतों, तो जर आपल्या जीवनाशीं ओतप्रोत होईल, अथवा आपल्या मूलोद्योगाच्या ताण्यावर आपलें समग्र जीवन विणलें जाईल, तर आपलें शिक्षण व आपलें जीवन हीं दोन्हीं कृतार्थ होतील. उत्पादक कामाबरोबर कोणकोणते विषय आपणांला अनुबद्ध करितां येतात हें पाहण्यापेक्षां त्या परिश्रमाशीं केवढी जीवनसमृद्धि

आपणांस अनुबध्द करितां येते, हें पाहिलें पाहिजे. मग ती जीवन-समृध्दिच काय शिकावयाचें व किती शिकावयाचें तें सांगेल.

आपल्या शिक्षणांत अमुक अमुक विषय आवश्यक आहेत हें आपण प्रारंभींच निश्चित केलें आणि नंतर त्या सर्वांचा परिश्रमाशीं अनुबन्ध करण्यास निघालों, हा चुकीचा मार्ग झाला. देशाच्या आणि विशिष्ट समाजाच्या आजच्या परिस्थितींत प्रत्येक व्यक्तीचें अथवा प्रत्येक समाजाचें जीवन कसें आहे आणि त्याला कोणतें रूप द्यावयाचें आहे, कोठपर्यंत त्यास न्यावयाचें आहे आणि केवढी जीवनसमृध्दि आपणांस सिध्द करितां येण्यासारखी आहे हें जर आपण पाहिलें असतें, तर मूलोद्योगाची निवड करण्यांत आम्हांस अडचण वाटली नसती; त्याचप्रमाणें त्या मूलोद्योगाशीं कोणकोणतें ज्ञान, कौशल्य आणि संस्कारिता हीं अनुबध्द करावयास पाहिजेत, याचाहि निर्णय करणें कठीण गेलें नसतें. एका सूत्रांत सांगावयाचें म्हणजे—"शिक्षणांत ज्ञानदृष्टि सोडून आपण जीवनदृष्टीचें धारण आणि अनुकरण केलें पाहिजे." जे शिक्षक जीवन–दरिद्री आहेत, ते वर्धा–योजनेचे यशस्वी शिक्षक होणार नाहींत. मग ते किती का विद्वान् आणि अनुबंधाच्या कलेंत पारंगत असेनात! जे शिक्षक जीवनवीर आहेत, जीवनकुशल आहेत, जीवनसमृध्द आहेत, त्यांचा प्रभाव समाजावर आपोआपच पडतो आणि त्यांच्या द्वारा दिलें जाणारें शिक्षण जीवनजागृतीला पुरेसें होतें.

शिक्षणाच्या विद्यमान व भावी पद्धतींतील फरक एक उदाहरण देऊन आपणांला चांगल्या प्रकारें स्पष्ट करितां येईल. जे आनंदी स्वभावाचे शिक्षक असून ज्यांना जीवनदृष्टि आहे, त्यांच्यासंबंधीं कधीं कधीं अशी तक्रार करण्यांत येते कीं, ते आपल्या वर्गांत विषयान्तर फार करतात.

ज्यांच्या बुध्दीला कांहीं ठावठिकाणाच नाहीं, थोडा आधार सांपडताच जे कोठल्याकोठें वाहात जातात आणि आपला उद्देश विसरून उगाच बडबड करूं लागतात, असे विहंगवृत्ति शिक्षक तर कोणालाच आवडणार नाहींत. ते पक्ष्याप्रमाणें एका विषयावरून दुसऱ्या विषयावर आणि त्यावरून तिसऱ्याच एकाद्या गोष्टीवर उडत जातील. इंग्रजींत ज्याला "नॉन्सेन्स व्हाइम्स" म्हणतात त्यांप्रमाणें विषयांतर करणाऱ्यांना तर शिक्षकाचें काम देतांच कामा नये.

परंतु जे यशस्वी शिक्षक आहेत, विद्वान् आणि बहुश्रुतहि आहेत, त्यांच्या विषयांतराचें उदाहरण आपणांला घ्यावयाचें आहे. जे मुख्याध्यापक विषयपरायण, पाठ्यक्रम-परायण आणि परीक्षा-परायण असतात त्यांना असल्या प्रतिभाशाली शिक्षकांनीं केलेलें विषयान्तर नेहमीं बोंचतें. आणि कित्येक वेळां नाइलाज होऊन असे शिक्षक आपल्या प्रिय विद्यार्थ्यांना घरीं बोलावून स्वतंत्रपणें शिकवितात.

वर्धा-योजना अशा शिक्षकांना स्वतंत्रता देते. पण त्यावर योग्य नियंत्रणहि घालते. आपला मूळ विषय घेऊन त्याच्याशीं जितक्या गोष्टी अनुबध्द होऊं शकत असतील, तितक्या साऱ्या त्यानें अवश्य शिकवाव्या. असें विषयांतर केल्याबद्दल त्याला कोणी दोष देणार नाहीं, उलट धन्यवादच देईल. परंतु ज्यांत अनुबन्धाचा संभव नाहीं आणि मूळ विषयाला प्राधान्य नाहीं, अशा गोष्टी त्यानें सोडून दिल्या पाहिजेत.

मराठींत एक म्हण आहे कीं, 'हरिदासाची कथा मूळपदावर.' ही समजण्यास महाराष्ट्रांतील एका खास रिवाजाची माहिती असली पाहिजे. महाराष्ट्रांतील 'हरिदास' म्हणजे कीर्तनकार रामायण, महाभारत, वेदांगें, पुराणें इत्यादि धार्मिक ग्रंथ आणि कथा-साहित्य

यांत प्रवीण असतात. संगीत व काव्य यांत सुध्दां त्यांची चांगली गति असते. ते देवळांत जाऊन कथा करितात तेव्हां प्रथम एखादें धर्मवचन किंवा एकाद्या संताचें जीवनसूत्र घेऊन त्यावर प्रवचन करितात. त्याला पूर्वरंग किंवा ब्रह्मनिरूपण म्हटलें जातें. यांत मूळ वचनाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं ते साऱ्या दुनियेंतील गोष्टी आणतात. नंतर उत्तररंगास सुरुवात होते. त्यांत मूळ वचन सिध्द करण्यासाठीं एकादी कथा किंवा आख्यान विस्तारपूर्वक सांगतात व त्यांतून नवरसांचा साक्षात्कार करवितात. परंतु जें कांहीं विषयांतर होईल त्याचा मूळ वचनाशीं अनुबंध दाखवून देतां आला, म्हणजे हरिदासाची सफलता झाली. चातुर्मास्यांत चार महिने हरिदासाची कथा ऐकून श्रोत्यांना अनेकविध विषयांचें जीवनस्पर्शी ज्ञान होतें. एका विद्वान् हरिदासाच्या सहवासानें सारा समाज बहुश्रुत, धर्मज्ञ व रसिक बनतो. दोघांतहि शिक्षणदृष्टि गौण असते, जीवनदृष्टि प्रधान असते; मात्र आजच्या आदर्शाच्या कसोटीप्रमाणें तिला एकांगी म्हटलें पाहिजे.

या सर्व उदाहरणांवरून वाचकांच्या लक्षांत एवढें आलें असेल, कीं अनुबन्ध ही कांहीं अपूर्व गोष्ट नाहीं. त्याचें शास्त्र देखील गूढ नाहीं. जीवनांत सर्वत्र अनुबन्ध भरलेला आहे आणि म्हणून अनुबन्ध-पद्धतींत सारें जीवन भरून दिलें पाहिजे.

आतां मूलोद्योगी शिक्षणपद्धतींत भिन्न भिन्न हस्तव्यवसाय घेऊन आपणांस कोणकोणते अनुबन्ध उभे करितां येतील, त्याचीं प्रत्यक्ष उदाहरणें दिलीं पाहिजेत. त्याशिवाय शिक्षकांना पूर्ण दिग्दर्शन होणार नाहीं.

—' सर्वोदय ' मधून

# [ ११ ]

## अनुबन्धाची कला

**श्री. जुगतराम दवे**, स्वराज्यआश्रम, वेडछी

" Correlation " या इंग्रजी शब्दाबद्दल आचार्य काकासाहेब यांनीं वरील शब्द प्रचलित केलेला आहे. वर्धा-योजनेंत ज्ञान आणि अनुभव यांच्या अनन्त विषयांचा संबंध परस्परांशीं जोडून देण्यास सुचविण्यांत आलें आहे. त्याला कित्येक समन्वय म्हणतात. भिन्न भिन्न विषयांचा नुसता एक ढीग रचावयाचा नाहीं, किंवा त्या विषयांचीं टोकें नुसतीं एकमेकांशीं जुळवून द्यावयाचीं असें नाहीं; त्यांचा एकमेकांशीं असणारा संबंध एकाद्या जाळ्यांतील दोऱ्यांप्रमाणें नव्हे, एकाद्या कापडांतील आडव्याउभ्या धाग्याप्रमाणेंहि नव्हे–तर प्राण्याच्या देहांत व्यापून राहिलेल्या जीवाप्रमाणें असतो. असा संबंध दर्शविण्यासाठीं काकासाहेबांचा अनुबन्ध शब्द फारच समर्पक वाटतो.

वर्धा–योजनेवरील चर्चेत ज्याविषयीं अधिकांत अधिक बोललें जात असेल, आणि तरी देखील ज्याची कल्पना कमींत कमी स्पष्ट राहात असेल, असा विषय म्हणजे हा अनुबन्ध होय.

पूज्य गांधीजींनीं आपली मूळ कल्पना खालील शब्दांत वर्धा-परिषेदेत व्यक्त केली होती :

" माझा ज्या गोष्टीवर खास भर आहे ती उद्योग नव्हे, पण उद्योगद्वारा शिक्षण ही होय. अक्षरज्ञान, इतिहास, भूगोल, गणित, विज्ञान वगैरे सर्व विषयांचें ज्ञान उद्योगशिक्षणाच्या द्वारा दिलें पाहिजे.

याचा उपाय हा आहे, कीं कोणत्याहि हस्तव्यवसायाची संपूर्ण कला आणि तिचें एकंदर शास्त्र व्यवहारद्वारा दिलें जावें, आणि या उद्योगाच्या द्वारा सर्व शिक्षण द्यावें. उदाहरणार्थ, तकलीवर कांतणें शिकवावयाचें असेल, तर त्या निमित्तानें कापसाच्या अनेक जाती, हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या प्रांतांतील जमिनींचे भिन्नभिन्न प्रकार, या धंद्याच्या नाशाचा इतिहास, त्याचीं राजकीय कारणें ( यांत हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्याचा इतिहास येईल ), गणित इत्यादि विषयांचें ज्ञान देणें आवश्यक होऊन बसेल. ”

पण हें तर सात किंवा दहा वर्षांच्या विस्तृत कालासाठीं आंखलेल्या अभ्यासक्रमाचें अतिशय संक्षिप्त वर्णन झालें. रोजच्या रोज काय शिकवावें याचा विचार करणाऱ्या शिक्षकाला एवढ्यानें संतोष वाटणार नाहीं. कराची ते कलकत्ता आणि काश्मीर ते रामेश्वर एवढया वर्णनानें हिंदुस्थानाचा अभ्यास करणाऱ्याला समाधान वाटणार नाहीं. या स्थळांच्यामध्यें अनेक प्रकारच्या विविधतेनें भरलेले देश पडलेले आहेत. त्याचप्रमाणें वरील संक्षिप्त वर्णनाच्या दरम्यान अनेकरंगी विषय पडलेले आहेत.

वेडछी आश्रमांतील अध्यापन-वर्ग चालवीत असतां या संबंधींच्या तपशीलांत शिरण्याचा आम्हीं थोडासा प्रयत्न केला आहे. त्यांतील सार येथें देऊं इच्छितों.

१ उद्योगधंदे आणि दुसरीं आवश्यक व जीवन घडविण्यास मदतरूप होणारीं कामें हें ज्ञानाचें मुख्य साधन आहे.

२ ईश्वरानें रचलेला निसर्ग आणि मनुष्यानें रचलेला समाज हें सुद्धां ज्ञानाचें दुसरें महत्त्वाचें साधन आहे.

३ या दोहोंचें अनुशीलन ज्ञानपूर्वक आणि गुरूच्या मार्गदर्शनाखालीं होईल, तर विद्यार्थ्याला उत्तम शिक्षण मिळाल्याशिवाय राहाणारच नाहीं.

४ जुन्या पद्धतीच्या शाळांतून शिकविण्यांत येतें तेवढें विद्यार्थ्याला येईल यांत आश्चर्य नाहींच, पण त्यापेक्षांहि त्याला फारच अधिक येईल.

५ आजच्या शाळांतून भाषा व गणित यांवर जास्तींत जास्त जोर देण्यांत येतो. तरी देखील दोहोंपैकीं एकाचाहि चांगल्या प्रकारें उपयोग करावयाची शक्ति थोड्याच विद्यार्थ्यांना प्राप्त होते.

६ उद्योगादि प्रवृत्ती, निसर्ग आणि समाज हीं अशीं साधनें आहेत कीं विद्यार्थी त्यांचें डोळे मिटून सेवन करील, तरी सुद्धां त्यांतून ज्ञान निर्माण होईल. रोपावर फूल बाहेरून चिकटवावें लागत नाहीं किंवा रंगवावें लागत नाहीं.

७ असें असलें तरी शिक्षकानें अनुबंधांचा योजनापूर्वक विचार केलाच पाहिजे.

८ त्यानें उद्योग आणि ज्ञानाचीं इतर साधनें यांतून कोणत्या विषयांचें विद्यार्थ्यांना शिक्षण द्यावयाचें आहे तें प्रथम निश्चित करावें. समजा, कीं त्याला 'तकली' हा विषय घ्यावयाचा आहे अथवा अधिक पोटविभाग पाडून 'सूत' किंवा 'कापूस' अथवा 'गतिचक्र' किंवा 'कांतणयज्ञ' यांतून एकादा विषय निवडावयाचा आहे. किंवा समजा, कीं त्याला निसर्गांतून 'अग्नि' किंवा 'पाऊस' यांचा अभ्यास करवून घ्यावयाचा आहे. किंवा समाजांतून 'पाहुणा' किंवा 'गाय' किंवा 'लढाई' यांसारखा एकादा विषय शिकवावयाचा आहे.

९ या पसंत केलेल्या विषयाचा अनुबन्ध त्याला शोधून काढावा लागेल. अनुबन्धाच्या सुमारें दहा शाखा आणि प्रत्येक शाखेच्या तितक्याच उपशाखा त्याच्या डोळ्यांसमोर तरंगूं लागतील. याप्रमाणें पसंत केलेल्या विषयावर १०० दिशांकडून प्रकाश फेंकला जाईल. किंवा दुसऱ्या रीतीनें सांगावयाचें म्हणजे १०० प्रकारचे प्रश्न या विषयासंबंधीं उभे राहातील आणि जबाब मागतील. हे जबाब देतांना त्या विषयाचा सर्वांगसंपूर्ण अभ्यास होईल.

१० अनुबंधाच्या शाखा आणि उपशाखा खालीं देण्यांत येत आहेत. इतक्या शाखा व उपशाखा मिळून अनुबन्धरूपी वृक्ष समाप्त होतो असें सुचविण्याचा भाव नाहीं. जीवन व ज्ञान हीं अनन्त आहेत, आणि त्यामुळेंच अनुबन्धाच्या शाखा देखलि अनन्तच होतील. शिवाय, या शाखांचा जो क्रम किंवा जीं नांवें येथें देण्यांत आलीं आहेत तींच अखेरचीं आणि सर्वांत समर्पक आहेत, असें सांगण्याचा आशय नाहीं. दुसरीं नांवें व क्रम सुचविण्यास पूर्ण अवकाश आहे. प्रत्येक विचारी शिक्षकाला स्वतःस अनुकूल वाटेल तेथें उभें राहून तो तो विषय न्याहाळून पाहाण्याचें स्वातंत्र्य आहे.

११ अनुबन्धाच्या शाखा–उपशाखा देत असतांना एक महत्त्वाची सूचना देऊन ठेवितों. हे सर्व विषय एकमेकांपासून स्वतंत्र नाहींत. आणि म्हणून प्रत्येकाचा वेगळा तास, वेगळा शिक्षक आणि वेगळीं पाठ्य पुस्तकें अशा प्रकारच्या जुन्या चाकोरींत कोणींहि शिरूं नये. ह्या एका अनुबन्धाच्या शाखा आहेत, एका जिवंत देहाचीं हीं अंगें आहेत. तोंड खातें आणि सारें शरीर तृप्त होतें; डोळे पाहतात आणि सर्व शरीर आनंदित होतें. कार्यकुशलता येत जाते आणि सोबत भाषासुद्धां विकास पावते, भाषा शिकत असतांच शास्त्रांचा उलगडा

होत जातो, शास्त्रें शिकत असतांनाच गणित पक्कें होत जातें. या केवळ अनुबन्धाच्या शाखा आहेत, वेळापत्रकांत वाटून द्यावयाचे विषय नव्हत.

१२ शिक्षक आणि विचारक वेगवेगळ्या विषयांकडे १०० दिशांनीं अवलोकन करून जें दिसेल त्याची नोंद करतील, तर त्यांना स्वतःलाच मोठें आश्चर्य भासेल. अर्थात् त्यांनीं विद्यार्थ्याला डोळ्यांसमोर ठेवलेंच पाहिजे. मुलाचा हात धरून फिरण्यास निघालेला बाप त्याला रडत ठेवून स्वतः धावूं शकणार नाहीं. शिक्षकानेंसुद्धां विद्यार्थ्याला डोळ्यांसमोर ठेवून आपला अनुबन्ध तयार केला पाहिजे. विषय 'माता' का असेना! पण पहिल्या इयत्तेचा शिक्षक त्यावर एक अनुबन्ध रचील, तर सातव्या इयत्तेचा शिक्षक अगदीं वेगळाच रचील.

१३ वेगवेगळे विषय घ्यावे, भिन्न भिन्न वयांचे विद्यार्थी नजरे-समोर ठेवावे आणि शाखाउपशाखांसहित त्यांवर अनुबन्ध रचावे, हा खरोखर एक सरस उद्योग होणार आहे. वर्धा–योजनेचा विकास करण्यांत ज्यांना गोडी वाटते, त्यांनीं हा उद्योग स्वीकारावा अशी त्यांना माझी विनंति आहे.

## शाखा आणि उपशाखा

१ शाखा : कार्यकुशलता.

उपशाखा : १ अभ्यासाच्या विषयासाठीं कोणकोणत्या क्रिया आवश्यक आहेत व त्यांना किती वेळ लागतो तें जाणून घेणें. २ क्रियांची संवय लावणें. ३ क्रियांची नोंद. ४ क्रिया करींत असतां होणाऱ्या द्रव्यप्राप्तीचा हिशेब.

२ शाखा : अवजारें

उपशाखा : १ अभ्यासाच्या विषयांतील उपयोगी अवजारें ओळखणें. २ तीं कशीं वापरावीं तें शिकविणें. ३ बनवितां येतील तेवढीं बनाविणें. ४ अवजारांच्या प्रगतीचा इतिहास.

३ शाखा : सेवा

उपशाखा : १ ग्रामसफाई.

सूचना : १ मळसफाई. रस्ते आणि मोहोल्ले यांची सफाई. २ विहिरी, तळीं इत्यादि पाणवठ्यांची सफाई; धर्मशाळा इ० ३ सार्वजनिक जागांची सफाई; खड्डे भरून काढणें; डबकीं बुजविणें इत्यादि.

उपशाखा : २ सभा, जत्रा वगैरे स्थळीं सफाईव्यवस्था.

उपशाखा : ३ झाडें लावणें.

उपशाखा : ४ प्रौढ शिक्षण. १ लिहिण्यावाचण्यास शिकविणें. २ कांतणें इ० उद्योग शिकविणें ३ स्वतः शिकलेल्या गोष्टी, शास्त्रें इत्यादि लोकांस सांगणें. ४ पुस्तकें, वर्तमानपत्रें वाचून दाखविणें. ५ गाणीं शिकविणें.

उपशाखा : ५ मुलांची सेवा.

सूचना : १ आंघोळ करण्यास शिकविणें. २ खेळ शिकविणें ३ मोठ्या मुलांनीं लहान मुलांना अभ्यासांत मदत करावी.

उपशाखा : ६ पाहारा. गांव आणि शींव यांच्या रक्षणासाठीं.

४ शाखा : भाषा.

उपशाखा : १ गद्य आणि पद्य साहित्यांतून निवड. २ शिक्षकानें स्वतः रचलेलें साहित्य. ३ गोष्टी, संवाद, संभाषण, व्याख्यान, नाटक. ४ भाषाशास्त्र.

सूचना : भाषेला संस्कार देतांना खालीं सांगितलेल्या विषयांचा आधार घ्यावा.

१ उद्योग २ विज्ञानशास्त्रें ३ घर, गांव, देश ४ माणसें, पशू, पक्षी ५ सत्य आदि धर्म, ६ दया आदि भावना ७ इतिहास ८ खेळ.

५ शाखा : गणित.

उपशाखा : १ संख्या २ वजन ३ माप ४ किंमत ५ काळ ६ भूमिति.

सूचना : १ संख्या पाठ होईपर्यंत रोज थोडा वेळ म्हणवून घेणें. २ वजनें, मापें आणि भूमितीचीं साधनें सर्व विद्यार्थ्यांकडून आपापलीं तयार करवून घ्यावीं. ३ खालच्या इयत्तांत वजनें वगैरेंचे अपूर्णांक आल्यास त्यांना पूर्ण समजूनच व्यवहार करावा. ४ कांतण वगैरे उद्योगांची नोंद मुलांनीं स्वतः ठेवावी.

६ शाखा : संगीत.

उपशाखा : १ धून-(तालाबरोबर) २ स्वभाषेंतील गाणीं आणि हिंदी गीतें-चांगल्या कवींचीं. ३ मूलोद्योग आणि इतर व्यवसाय यांच्याशीं संबंध असलेलीं गीतें.

सूचना : १ खालच्या इयत्तांतून संपूर्ण गाणीं न शिकवितां दोनचार कडवीं निवडून घ्यावीं २ मूलोद्योग व दुसरीं कामें करीत असतां थोड्या मर्यादित वेळीं गाणीं गातां येतील. पण त्यासाठीं योग्य प्रकारें तयार झालेलीं गाणींच पसंत करावीं.

७ शाखा : सुलेखन आणि चित्रकला.

उपशाखा : १ कुंचल्यानें काढावयाचीं चित्रें २ भूमितीच्या आकृती ३ सुलेखन-शब्द, सूत्रें, सुभाषितें, सूचना ४ मुलांनीं स्वतः रचलेलें लिखाण.

सूचना : १ वडाची पारंबी, बाभळीचें दांतण वगैरे वस्तूंपासून कुंचले बनवावे. २ रंगसुद्धां गांवठी वस्तूंपासून तयार करावे ( चुना, हळद, कांहीं भाज्यांचीं हिरवीं पानें इ० ). ३ अक्षरें कुंचल्यानें त्याचप्रमाणें पेन्सिलीनें लिहून घ्यावीं.

८ शाखा : शास्त्रीय अभ्यास.

उपशाखा : १ यंत्रशास्त्र २ अर्थशास्त्र ३ समाजशास्त्र आणि राजकारण ४ आरोग्यशास्त्र ५ शारीरशास्त्र ६ प्राणिशास्त्र ७ पदार्थशास्त्र ८ भूगोल, खगोल, भूस्तरशास्त्र.

सूचना : शास्त्रांच्या नांवांनीं घाबरून जाण्याची आवश्यकता नाहीं. मूलोद्योग आणि रोजचीं इतर कामें ज्ञानपूर्वक करींत असतांना या ना त्या शास्त्राचे प्रश्न स्वाभाविकपणें विद्यार्थी व शिक्षक यांच्या-समोर उभे राहतातच.

९ शाखा : पर्यटन.

उपशाखा : १ भूगोलाच्या अभ्यासासाठीं २ इतिहासाच्या अभ्यासासाठीं ३ रमणीय स्थळें पाहाण्यासाठीं ४ कारागीर लोकांचीं कामें पाहाण्यासाठीं ५ संस्था पाहाण्यासाठीं ६ मोठ्या पुरुषांचें दर्शन घेण्यासाठीं ७ वनस्पती, प्राणी इत्यादींच्या अभ्यासासाठीं ८ संग्रहास योग्य अशा वस्तू शोधून आणण्यासाठीं ९ लोकांच्या चालीरीती पाहाण्यासाठीं १० नगररचनेचा अभ्यास करण्यासाठीं ११ केवळ फिरण्यासाठीं.

१० शाखा : संग्रह.

उपशाखा : १ वनस्पतीसंबंधीं २ प्राण्यासंबंधीं ३ उद्योगांत दाखविलेल्या वस्तूंबाबत ४ रंगीबेरंगी दगड, धातूंचा मूळ मसाला, मातीचे नमुने ५ वर्तमानपत्रांतून वगैरे येणारीं चित्रें ६ कलाकारागिरीचे

नमुने ७ स्वतः तयार केलेलीं साधनें. उदा०, दगडांचीं वजनें, मापें, पट्टया व मापाच्या दोऱ्या, पातळ पदार्थ भरण्याचीं मापें. भूमितीचीं साधनें, कुंचले, लेखण्या वगैरे. ८ धुळींतून मिळणारें धन; उदा०, चिंध्या धुवून त्यांचा संग्रह करणें, पाठकोऱ्या कागदांच्या वह्या बांधणें, फेंकून दिलेले लिफाफे पुन्हां वापरण्यालायक बनविणें किंवा ते उलगडून आंतील बाजूचा लिहिण्याकडे उपयोग करणें. फेकून दिलेले जोडे, हाडें इत्यादींचा खताकडे उपयोग करणें.

## २ विषयांची निवड

कोणत्याहि विषयाचा अभ्यास शंभर दृष्टींनीं कसा केला पाहिजे हें आपण गेल्या लेखांत पाहिलें. असा अभ्यास करण्यासाठीं योग्य विषयांची निवड करणें हीच वर्धा-योजनेची अमंलबजावणी करण्यांत अत्यंत महत्त्वाची बाब आहे.

जुन्या पद्धतीच्या शाळांत भाषा, गणित, विज्ञान, इतिहास, भूगोल या प्रकारानें विषयांची निवड करण्यांत येते. स्वभाषेच्या धड्यांत धर्म, नीति, विज्ञान हे विषय आणि क्वचित् उद्योगाचें वातावरण देखील आणण्याचा प्रयत्न केल्याचें आढळतें. पण चांगलीं व्याकरणशुद्ध वाक्यें किंवा लेख लिहितां वाचतां यावे, हाच त्यांत मूळ उद्देश असतो. धड्यांत असलेला उपदेश किंवा उद्योग कृतींत आणण्याकडे लक्ष देणें आवश्यक मानिलें जात नाहीं. गणितांत तर तसलें वातावरण निर्माण करण्याचा दिखाऊ प्रयत्नहि अद्यापि सुरू झालेला आढळून येत नाहीं. बहुतेक उदाहरणें केवळ कोरड्या आकड्यांचीं असतात अथवा परदेशांतील आणि शहरांतील व्यापारधंद्यांविषयीं असतात. जुन्या

शाळांत विद्यार्थी किंवा शिक्षक यांचा उद्योगांशीं कसलाच संबंध असत नाहीं, आणि आसपास ग्रामोद्योग जरी पुष्कळ चालत असले तरी त्यांकडे सहानुभूतीनें पाहण्याचें शिक्षण देण्यांत येत नाहीं. म्हणून गणितशिक्षणांत त्याला पोषक असें वातावरण आणावें हें कोणाला सुचूं शकत नाहीं हें स्वाभाविक आहे.

याचप्रमाणें विज्ञानशिक्षणांतहि जुन्या शाळांतील शिक्षण केवळ औपपत्तिक नियम शिकविण्यापुरतेंच असतें. खेड्यांतील शाळांत प्रयोगांसाठीं लागणारीं उपकरणें क्वचितच असतात. आणि जेथें प्रयोग करून दाखविण्यांत येतात तेथेंहि पदार्थांचे शास्त्रीय धर्म दाखविण्या-पुरतेच ते प्रयोग असतात. रोजच्या कामकाजांत आणि जीवनांत ते कसे लागू पडतील हें दाखविण्याचा प्रयत्न क्वचितच केला जातो. उदाहरणार्थ, स्वच्छतेच्या नियमांच्या अभ्यासाला पाठ्य पुस्तकांत हल्लीं चांगल्या प्रमाणांत स्थान मिळालें आहे. असें असूनहि विद्यार्थी आणि शिक्षण यांनीं ते नियम अमलांत आणावयाचे आहेत, अशी अपेक्षा जुन्या शाळांत राखण्यांत येत नाहीं.

इतिहास आणि भूगोल यांचें शिक्षणहि घटना जाणण्यापुरतेंच असतें. चालू जीवनाचें विशेष चांगलें ज्ञान व्हावें यासाठीं त्याच्या झाल्या-गेल्या गोष्टी जाणाव्या आणि शोधाव्या यावर जुन्या शाळांत लक्ष नसतें. पाठ्य पुस्तकांत देण्यांत येणाऱ्या राजा-बादशहांच्या वंशावळीवर तेथें लक्ष दिलें जातें, पण विद्यार्थ्याचें स्वतःचें कुटुंब, त्याचा गांव, त्याचा समाज, त्याच्या गांवांतील कला–कारागिरी, इत्यादिकांच्या जुन्या हकिकती जाणण्या-शोधण्याला उत्तेजन दिलें जात नाहीं. त्याचप्रमाणें भूगोलांत देशा–परदेशांतील स्थलादिकांचीं नांवें पाठ्य पुस्तकांत येतात. केव्हां केव्हां अद्ययावत् राहूं इच्छिणारा

शिक्षक स्थानिक महत्त्वाचीं स्थळेंहि अभ्यासक्रमांत दाखल करतो. परंतु जीवनाच्या अनुषंगानें भूगोलाचें ज्ञान प्राप्त करून घेण्याची आवश्यकता उत्पन्न होईल असें शाळेंतील जीवन असत नाहीं.

वर्धा-योजनेप्रमाणें चालणाऱ्या नव्या शाळांत विषयांची निवड करणाची ही रीत असूं शकणार नाहीं हें तर स्पष्टच आहे. तथापि, जुन्या संवयीमुळें ती रीत येणाचा संभव आहे आणि येत असलेलीहि आढळत आहे.

उद्योग–शिक्षणावर भर देण्यासाठीं उद्योगाचीं वर्णनें, गोष्टी, कविता जोडून देण्यांत येतात. समाजपरिचयावर जोर देण्यासाठीं स्वदेश-परदेशांतल्या लोकांच्या वर्णनाचे धडे जोडण्यांत येतात. या गोष्टींमुळें जुन्या पाठ्य पुस्तकांत कांहींसा ताजेपणा निर्माण होतो ही गोष्ट खरी. पण ती कांहीं वर्धा–योजना होत नाहीं. तें जुन्या पद्धतीचें भाषा-शिक्षणच झालें.

उद्योग आणि इतर आवश्यक प्रवृत्ती यांना शाळेच्या जीवनांत प्रमुख स्थान प्राप्त होईल आणि तें चांगलें बुद्धिपूर्वक तसेंच हृदयपूर्वक व्हावें, म्हणून भाषा, गणित, विज्ञान इत्यादींचा जरूर तेवढा उपयोग करण्यांत येईल, तर त्याला वर्धा–योजनेप्रमाणें चालणारें शिक्षण म्हणतां येईल. त्यांत तकलीसारख्या मूळ उद्योगाला प्रमुख स्थान प्राप्त होईल आणि त्याच्या द्वारा सर्वांगीण शिक्षण मिळावें म्हणून कापसापासून विणण्यापर्यंतच्या सर्व क्रियांमध्यें कुशलता सिद्ध करावी ही अभ्यासक्रमाची मुख्य प्रवृत्ति असेल. आणि त्यांत संपूर्णता मिळावी म्हणून त्यांच्या अंगभूत आवश्यक साहित्याचा अभ्यास आणि त्याची निर्मिती, तदनुषंगी विज्ञान, गणित इत्यादींचा अभ्यास वगैरे विषय योग्य स्थानीं आणि योग्य प्रमाणांत येतील.

मात्र प्रसंगोपात्त खादीच्या एकाद्या केंद्राचें अवलोकन करावें किंवा शेतांत जाऊन खेडूत काम करीत असतील तर कंबरेवर हात देऊन पाहावें आणि परत शाळेच्या खोलींत बसून त्याचीं वर्णनें वाचावीं, लिहावीं किंवा गावीं यांत वर्धा–योजनेचा आत्मा येणार नाहीं. एस्किमो किंवा आफ्रिकेंतील जंगली लोक यांचीं वर्णनें शाळांत बसून वाचणें, त्याचीं चित्रें पाहणें किंवा नाटकें करणें एवढयानेंच वर्धा-योजनेंतील समाजपरिचयाचें शिक्षण होऊं शकणार नाहीं. आसपासच्या हरिजन, रानीपरज किंवा तसल्याच दुसऱ्या दीन-दलित प्रजेची सेवा हाच समाजपरिचयाच्या शिक्षणाचा पाया बनविला पाहिजे. त्या लोकांच्या वस्तींत एकादे वेळीं जाऊन फेरी मारून यावें आणि नंतर वर्गांत बसून त्यांचीं गीतें गावीं किंवा त्यांचीं वर्णनें वाचावीं वा लिहावीं हा समाजपरिचय नव्हे. त्या लोकांत जाऊन त्यांच्या स्थितीच्या आकड्यांचीं कोष्टकें भरून परत यावें आणि त्यांवर तऱ्हेतऱ्हेचीं गणितें रचावीं हें पण समाजपरिचयाचें शिक्षण नव्हे. नव्या शाळांनीं असल्या प्रजेच्या सेवेसाठीं स्वतःच्या अभ्यासक्रमांत अगत्याचें आणि नियमित स्थान दिलें पाहिजे. ह्या सेवेच्या प्रवृत्ती ज्ञानपूर्वक व्हाव्या म्हणून भाषा, गणित, विज्ञान इत्यादिकांची मदत यथाकाळ व यथाप्रमाण घेण्यांत येईलच.

इतक्या प्रस्तावनेनंतर वर्धा-योजनांच्या शाळांतील अभ्यासक्रमांत पसंत करण्याला लायक असलेल्या विषयांची यादी पुढें देत आहें :

### १ दररोजच्या आवश्यक प्रवृत्तींशीं संबंध असलेले विषय

१ मलमूत्रविसर्जन २ दांत घासणें ३ स्नान करणें ४ कपडे धुणें ५ झाडणें ६ खाणें ७ भांडीं घासणें ८ पाणी भरणें वगैरे.

### २ शाळेंतील मूलोद्योगाशीं संबंध असलेले विषय

१ तकली २ रू ३ सूत ४ कापूस ५ कापसाचें शेत ६ खादी ७ चरखा ८ फाळका ९ पिंजण १० तांत ११ घर्षण १२ गतिचक्र १३ ताणाबाणा वगैरे.

### ३ शेतीवाडींतील बालोचित कामांशीं संबंध असलेले विषय

१ खुरपणें २ रोप लावणें ३ कुदळ ४ नांगर ५ बैलगाडा ६ फूलफळ वगैरे

### ४ सफाईच्या कामांशीं संबंध असलेले विषय

१ ग्रामसफाई २ शौचकूप–सफाई ३ शाळेची सफाई ४ खताचा खड्डा.

### ५ गृहउद्योगांशीं संबंध असलेले विषय

१ दळणें २ ताक करणें ३ कांडणें ४ पाखडणें ५ स्वयंपाक वगैरे.

### ६ ग्रामउद्योगांशीं संबंध असलेले विषय

१ कुंभार २ सुतार ३ लोहार ४ चांभार ५ गवळी ६ गवंडी वगैरे.

### ७ नैसर्गिक विषय

१ शरीर २ सूर्य, चंद्र, नक्षत्रें ३ नदी, तलाव, ४ दिवा, अग्नि ५ ढग, पाऊस ६ पाणी, हवा, प्रकाश ७ माती, धातू ८ झाड, जनावर वगैरे.

### ८ सामाजिक विषय

१ आईबाप २ घर ३ गांव, देश ४ गाय, बैल ५ पाहुणा ६ झोंपडी ७ गांवची विहीर ८ देऊळ, मशीद, शाळा, धर्मशाळा वगैरे ९ पाळलेले पशुपक्षी १० जंगली पशुपक्षी ११ भिल्ल, हरिजन वगैरे जाती १२ हिंदु, मुसलमान इत्यादि जाती १३ शेतकरी, मजूर, कारागीर वगैरेंचीं घरें १४ सभा, उत्सव, जत्रा १५ आजार १६ इतर देशांतील लोक १७ प्राचीन काळचे लोक १८ मुलें १९ गांवांतील श्रेष्ठ पुरुष २० स्वदेशांतील व जगांतील श्रेष्ठ पुरुष.

—' शिक्षण अने साहित्य ' वरून.

[ १२ ]

## जीवन–शिक्षण

**श्री. कमलाबाई कानेटकर**, एम. ए., बी. टी., लोणी

वर्धा-शिक्षण-योजनेची आंखणी होऊन गेली. इतक्या अवधींत चर्चा, वादविवाद, प्रश्नोत्तरें व सभासंमेलनें यांच्या द्वारा जनतेपुढें या विषयाची मांडणीहि भरपूर झाली. आतां प्रश्न प्रत्यक्ष अंमलबजावणीचा राहिला आहे. अद्यापिहि या योजनेसंबंधीं कांहीं शंका व प्रामाणिक मतभेद असूं शकतील. तथापि, कार्य अगदीं नजीक येऊन ठेपल्यामुळें शिक्षकांच्या दृष्टीनें अंमलबजावणीचा प्रश्न अधिक महत्त्वाचा व जिव्हाळ्याचा आहे. तेव्हां कार्यपद्धतीचा विचार होणें आतां अवश्य आहे. म्हणून या लेखांत वर्धा–योजनेंतील समवाय-पद्धती-( Correlation Method ) चा विचार करण्याचें ठरविलें आहे. या

योजनेप्रमाणें प्रत्यक्ष कार्य ज्यांनीं हातीं घेतलें आहे, अशांनाच या लेखाचा उपयोग व्हावा अशी अपेक्षा आहे.

## समवायाची तात्त्विक भूमिका

समवाय या शब्दाचा या ठिकाणीं दुहेरी उपयोग केला आहे· वर्धा–योजनेचें ध्येय व हेतु यांसहि समवाय शब्द लावतां येतो व त्याचा जो रोजचा व्यवहार म्हणजे अभ्यासक्रम व अध्यापनपद्धति यांतहि समवाय येतो. या दृष्टीनें समवायाला एक तात्त्विक व दुसरी व्यावहारिक अशा दोन बाजू आहेत.

व्यापक दृष्टीनें पाहिलें, तर आपल्याला जीवन व शिक्षण या दोहोंमध्यें समवाय घडवून आणावयाचा आहे. या मानवी संसाराचीं तीं सकृद्दर्शनीं स्वतंत्र वाटणारीं अशीं दोन स्वरूपें आहेत. वास्तविक तीं एकरूपच आहेत. इतकेंच नव्हे, तर एक दुसऱ्यावांचून निर्जीव व निराधार ठरेल इतकीं तीं एकमेकांशीं संलग्न अतएव अभिन्न आहेत. शिक्षणाचा काल हा पुढील आयुष्यक्रमाची पूर्वतयारी म्हणून जर मानलें, तर शिक्षणांत मुलाला जीवनाच्या अंग-प्रत्यंगांचें दर्शन घडलें पाहिजे हें उघड आहे. जीवनापासून पूर्णपणें अलग असा कोणताहि भाग शिक्षणांत येऊं नये. ज्याप्रमाणें मन व शरीर यांचे व्यापार समांतर रेषेंत न चालतां ते परस्परावलंबी व परस्परपोषक असतात, त्याचप्रमाणें शिक्षणांत संपूर्ण जीवनदर्शन आलें पाहिजे व जीवनक्रम शिक्षणाचें मार्गदर्शकत्व पत्करून आंखला पाहिजे. तेव्हां यापुढें जीवन व शिक्षण असे दोन स्वतंत्र शब्द न राहतां जीवनशिक्षण या एक रूपांत ते आपल्याला योजावे लागतील. याला उदाहरण संगीतांतून घेतां येईल. तंतुवाद्यामध्यें वाजविण्याच्या तारा व तरफांच्या तारा असे दोन प्रकार असतात. वरच्या तारा नाद निर्माण करतात व तरफांच्य

तारांतून यांचा निनाद निघत असतो. नाद व निनाद यांच्या गोड मिलाफांतून ( Harmony ) एकरूप, सुरेल संगीत निर्माण होत असतें.

ज्या कांहीं मूलभूत तत्त्वांवर जीवन उभारलें आहे, त्याच तत्त्वांभोंवतीं शिक्षण व शिक्षणांतून मिळणारें ज्ञान यांची गुंफण झाली पाहिजे. आपण पाण्यांत एकादा लहानसा खडा टाकला, तर त्याच्याभोंवतीं एकापेक्षां एक मोठीं वर्तुळें निर्माण होतात. हीं वर्तुळें प्रवाहाच्या कांठाला येईपर्यंत कितीहि मोठीं झालीं, तरी त्यांचा जन्म एका बिंदूतून–आपण फेकलेल्या खड्यांतून झालेला आहे, ही गोष्ट आपणांस दृष्टिआड करितां येत नाहीं. आपला आतांपर्यंतचा शिक्षणक्रम या प्रतिक्षणीं वाढत जाणाऱ्या वर्तुळांवरच खिळून राहिला होता. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, हीं वर्तुळेंच आपण आपल्या शिक्षणाचा पाया मानीत होतों. आतां या नवीन योजनेप्रमाणें आपल्याला मूलबिंदूवर नजर स्थिर ठेवून तेथून शिक्षणाचा व्याप वाढवावयाचा आहे. एवढ्यासाठीं आपल्या जीवनाचीं मूलभूत तत्त्वें कोणतीं हें आपण शोधून काढलें पाहिजे. या दृष्टीनें **निसर्ग व समाज यांच्या पार्श्व-भूमीवरून व्यक्तिविकासाला मदत करणारी अशी एकादी कृति हेंच जीवनाचें मूलतत्त्व ठरतें** आणि म्हणूनच व्यवसायाचें ज्ञान व व्यवसायामार्फत इतर विषयांचें ज्ञान अशा तऱ्हेचा समवाय घडवून आणणें अवश्य ठरतें.

तेव्हां जीवन–शिक्षण हें आपलें ध्येय आहे. कृतिप्रधान शिक्षणाच्या द्वारा तें ध्येय गांठण्याचा आपला हेतु आहे. या हेतुपूर्तीसाठीं जो कार्यक्रम आपण आंखलेला आहे त्यांत समवायाचें स्थान काय आहे, तें आतां आपणांस पहावयाचें आहे.

[ १३ ]

# वर्धा–योजना : समाज–परिचय

## (SOCIAL STUDIES)

श्री. **कमलाबाई कानेटकर**, एम्. ए., बी. टी., लोणी

मागील लेखांत समवायाची व्यापक व तात्त्विक दृष्टीनें थोडक्यांत चर्चा केली. तथापि तेवढ्यावरून जीवन–शिक्षणाची निश्चित कल्पना येणार नाहीं. जीवनाची मूलभूत गरज भागविणारी एकादी कृति म्हणजेच मूलोद्योग हें एक प्रकारचें कारंजें आहे. कारंजांतून ज्ञानाचे फवारे बाहेर पडून आपल्या जीवनाचा हौद समृद्ध करावयाचा आहे. पुनः हे ज्ञानतुषार सुद्धां जीवनसरितेंतूनच निर्माण होत असतात. असा हा चक्रनेमिक्रम आहे आणि हें तत्त्व आपण एकदां समजून घेतलें म्हणजे समवायाची निश्चित कल्पना यावयास हरकत नाहीं. आतां जीवनांतील ज्ञानाचीं विविध अंगें कोणतीं व शेवटीं त्यांचा मीलनबिंदु एकच कसा आहे हें आपण पाहूं.

वर्धा–योजनेमध्यें भाषा, गणित, समाज–परिचय ( Social Studies ), सामान्यविज्ञान ( General Science ) व रेखन ( Drawing ) असे पांच विषय घेतले आहेत आणि या सर्व विषयांची मांडणी मूलोद्योगाच्या द्वारा करावयाची आहे. यांपैकीं प्रथम आपण समाजपरिचय हा विषय घेऊं. या विषयांत इतिहास, भूगोल, आरोग्यशास्त्र व नागरिकनीति या गोष्टींचा मुख्यत्वेंकरून समावेश केला आहे. हे चार भाग एकमेकांशीं तर अनुस्यूत आहेतच, परंतु त्यांचा धागादोरा एकंदर समाजजीवनाशीं जाऊन पोंचला आहे.

किंबहुना त्या सर्वांचें एकप्रकारें रासायनिक संयोगीकरण होऊनच समाज-परिचय हा विषय बनला आहे.

आतांपर्यंत इतिहास म्हणजे मोठ्या लोकांचीं चरित्रें ( History is the biography of great men ) ही जी आपली कल्पना होती ती यापुढें बदलली पाहिजे. अर्थात् या ठिकाणीं जीवितप्रवाहामध्यें खळबळ उडवून टाकणाऱ्या थोर व्यक्तींची आपणांस कोणत्याहि तऱ्हेनें उपेक्षा करावयाची नाहीं. त्या विभूती आपणांस केव्हांहि वंदनीय आहेतच. परंतु त्यापेक्षांहि त्यांनीं केलेल्या कार्यांतून निर्माण झालेला समाज अधिक महत्त्वाचा आहे. म्हणून इतिहास म्हणजे ‘ मानवी समाजाचा इतिहास ’ अशी इतिहासाची व्यापक व्याख्या आपण केली पाहिजे. ज्या निरनिराळ्या अवस्थांतून मानवी समाजाचा विकास झाला व सामाजिक संस्था परिणत झाल्या त्या त्या अवस्थांचें चित्रीकरण म्हणजे इतिहास, असा इतिहासाकडे पाहण्याचा नवीन दृष्टिकोन आहे.

या दृष्टीनें मानवी समाजाच्या परिणतीचे चार कालखंड पडतात. सात वर्षांच्या अभ्यासांत ते पूर्ण करावयाचे अशी योजना आहे. पैकीं पहिला म्हणजे इतिहासपूर्व काल ( Pre-Historic Times ). हा मनुष्याच्या रानटी अवस्थेचा व शिकारी वृत्तीचा निदर्शक आहे. म्हणून रानटी लोकांचें जीवित व त्यासंबंधीं गोष्टी यांचा पहिल्या दोन इयत्तांच्या अभ्यासक्रमामध्यें समावेश केला आहे. त्याचप्रमाणें पुराण-काल ( Ancient Times ), मध्यकाल ( Middle Ages ) व सद्यःकाल ( Modern Times ). यांतील भटक्या वृत्तीचे लोक, निरनिराळे उद्योगधंदे व हुन्नर जाणणारे कारागीर व आधुनिक शास्त्रीय युगाचे प्रवर्तक इत्यादि लोकांच्या गोष्टी इयत्तावार अभ्यास-

क्रमांत आल्या आहेत. याशिवाय समाजप्रवाह अधिक जोमदार व शुद्ध करण्यासाठीं चिरंतन तत्त्वांचा पुरस्कार करणारे कांहीं धर्मप्रवर्तकहि यांत समाविष्ट केलेले आहेत. या दृष्टीनें विचार केला तर पिरॅमिडची गोष्ट, पांच चिनी बादशहा, साक्रेटिस, बुद्ध, शुनःशेप व नचिकेता इत्यादि गोष्टींना अभ्यासक्रमांत काय स्थान आहे तें सहज लक्षांत येईल. हा अभ्यासक्रम अत्यंत व्यापक असून विद्यार्थ्यांच्या बुद्धीचा विकास करण्यास पूर्णपणें समर्थ आहे. ग्रीस, इराण, ईजिप्त, चीन, हिंदुस्थान वगैरे देशांतील लोकांच्या गोष्टी समजल्यामुळें मुलांचें ज्ञान वाढेल आणि शिवाय त्यांत वैचित्र्य व विविधता भरपूर असल्या-मुळें तें ज्ञान मुलांना आकर्षक होईल यांत शंका नाहीं.

हा अभ्यासक्रम अपरिचित वातावरणांतील असल्यामुळें तो लहान मुलांना समजणार नाहीं अशी शंका कोठें कोठें घेतली जाते. वास्तव त्या शंकेचें निराकरण केलें पाहिजे. प्रथम हें लक्षांत घेण्यासारखें आहे कीं, आपण वरील कालखंड मानवी वंशाच्या इतिहासाला धरून पाडले असल्यामुळें त्यांस स्थलाचें बंधन नाहीं. म्हणून त्या त्या कालांतील गोष्टी तुटक व अपरिचित अशा वाटतात. परंतु मुलांच्या तीव्र व तरल कल्पनाशक्तीपुढें हा स्थल-कालाचा अपरिचितपणा टिकत नाहीं हा शिक्षणासंबंधींचा अनुभव आहे. पूर्वीच्या शिक्षण-क्रमामध्यें सुद्धां ही गोष्ट मान्य केलेली आहे. आपल्या महाराष्ट्रीय –विशेषत: खेड्यांतील–मुलांच्या दृष्टीनें पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर हा जितका अपरिचित तितकाच साक्रेटिसहि अपरिचित आहे. मग पहिला जर आपणांस चालतो तर दुसरा कां चालूं नये ? दोघांच्याहि चरित्रांतून आपणांस साधी राहणी आणि सत्याची व सेवेची आवड या गोष्टीच सूचित करावयाच्या आहेत.

शिवाय अपरिचित वातावरणाचा सुद्धां मुलांच्या परिचित जीवनाशीं साम्यविरोधाच्या तत्त्वानुसार संबंध जोडतां येतो. ईजिप्त किंवा चीन-मधील गोष्ट आपल्या जीवनाशीं सहज अनुबध्द करितां येण्यासारखी आहे. हीच खरी समवायपद्धति होय. अशा प्रकारें समाजपरिचय या विषयांत अंतर्भूत असलेल्या इतिहासाचा अभ्यास, जसजसा मुलगा वरच्या वर्गांत जाईल तसतसा परिपूर्ण व अवयवावत् होईल. आपल्याला सद्यःस्थितीकडे किंवा परिचिताकडे दुर्लक्ष करावयाचें नाहीं. पाया-खालची जमीन अभंग असल्याशिवाय आकाशांतील सौंदर्याचा आस्वाद घेतां येणार नाहीं. म्हणून अपरिचित व परकीय वातावरणांतील आयुष्यक्रमाचा पडसाद आपल्या जीवनांत कितपत उमटला आहे हें प्रत्येक वेळीं अजमावीत आपणांस सद्यःकालीन जीवनांत यावयाचें आहे. शेवटच्या वर्गांतील मुलगा जेव्हां सध्यांच्या शास्त्रीय युगाचा, हिंदुस्थानच्या आणि जगाच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीचा आढावा घेऊं लागेल तेव्हां पहिल्या पहिल्या वर्गांत शिकलेल्या गोष्टींचा त्याला अवश्य उपयोग होईल. वर्तमानकालाचा धागा मागें कोठपर्यंत नेऊन भिडवितां येईल हा विचार करण्याची एक दृष्टि त्याला प्राप्त होईल.

[ १४ ]

## वर्धा–योजना : तंत्र व मंत्र

श्री. **शं. धों. सार्दळ**, वाङ्मयविशारद

वर्धा-योजनाकारांनीं "प्रचलित शिक्षण हें सर्वस्वीं पुस्तकी ( entirely book-centred ) आहे" असा शेरा मारला आहे. हा

शेरा किती समर्पक आहे हें विद्यमान पाठशाळांतून पाठ्यपुस्तकांचा जो सुळसुळाट झाला आहे त्यावरून सहज समजून येईल. पाठ्य-पुस्तकांच्या भरमसाट वाढीला कायद्यानें नियंत्रण घालण्याची आवश्यकता भासूं लागली आहे! सध्यांच्या प्राथमिक शिक्षणाचा पुस्तकी पाठ्यक्रम हेंच या आपत्तीचें मूळ कारण आहे. हा पाठ्यक्रम सर्वस्वीं पुस्तकी ज्ञानावर आधारलेला असल्यामुळें पाठ्यपुस्तकांतील नेमून दिलेला अभ्यासक्रम एकदांचा कसा संपवितां येईल ही एक चिंता शिक्षकाला सतत भेडसावीत असते. अर्थात् पुस्तकांतील तें प्रचंड ज्ञान (?) ज्या बालकाला द्यावयाचें त्याच्या डोक्यांत तें कितपत उतरलें हें पाहण्यापेक्षां पुस्तकांतील किती भाग शिकविला हें पाहण्यांतच शिक्षकांना इतिकर्तव्यता वाटते; व नियोजित भाग संपविल्यावर शिक्षक उपरणें झाडून मोकळा होतो !

वास्तविक लहान मुलांना जें शिक्षण द्यावयाचें त्याचा मुख्य उद्देश त्यांच्या डोक्यांत माहिती कोंबणें हा नाहीं. तर, मुलांच्या शारीरिक व मानसिक शक्तींचा विकास करून त्या वृद्धिंगत करणें हा आहे. शिक्षणानें जर बालकाच्या व्यक्तित्वाचा विकास साधावयाचा आहे तर ती गोष्ट पुस्तकांच्या घोकंपट्टीनें साध्य होणार नाहीं. त्यासाठीं बालकाला निरीक्षण, परीक्षण, प्रयोग इत्यादि जीवन-शिक्षणाच्या साधनांचा उपयोग करितां आला पाहिजे. प्रचलित शिक्षणपद्धतींत या साधनांचा अभाव असल्यामुळें ही शिक्षणपद्धति जीवनाच्या विकासाला निरुपयोगी झाली आहे. वर्धा–शाळांचा प्रयोग सुरू झाल्यावर मुलांच्या हातीं पुस्तकांऐवजीं तकली दिसूं लागतांच कित्येक मंडळींना धक्काच बसला. "मुलें सारखी तकलीच फिरवितात, मग तीं शिकतात केव्हां?" असे प्रश्न कित्येकांनीं विचारले! जणूंकाय

सूत कांततां येणें, वस्त्र बनविणें अगर एकादा जीवनोपयोगी व्यवसाय शिकणें हें शिक्षणच नव्हे! शिक्षणाची जीवनाशीं फारकत झाल्यामुळें असल्या भ्रामक व घातुक कल्पना शिक्षणाविषयीं पसरल्या आहेत.

प्रचलित शिक्षणपध्दतींत काम करणारे शिक्षकहि इतके पुस्तकावलंबी झाले आहेत कीं, त्यांच्या हातून पुस्तकें काढून घेऊन शिकवा म्हटल्यास त्यांची स्थिति पाण्यांतून काढिलेल्या माशांप्रमाणें होते! जीवनाचें शिक्षण देण्याचीं साधनें कोणतीं याची जाणीव आजच्या शिक्षकांनाहि उरलेली नाहीं. आजची शिक्षणपध्दति शाळेच्या भिंतींच्या आड बैठक मारून बसली आहे. तिला तेथून बाहेर काढून जीवनाची मोकळी हवा दाखविणें जरूर आहे. शाळेंतील खोलींत बालकाचा कोंडमारा झाला आहे. हवेची साधी माहिती सुध्दां बालकांना वर्गांतील त्या गुदमरविणाऱ्या जागेंत देण्यांत येते; तर आकाशस्थ तारकांची माहिती भर दुपारीं शाळेच्या छपराखालीं पुस्तकांतून सांगितली जाते! असलें पुस्तकी शिक्षण मुलांच्या जीवनाचा विकास कसा घडविणार? पुस्तकांच्या ह्या जाचांतून बालकांची मुक्तता करण्याचें महत्कार्य वर्धा-योजनेंतील शिक्षकांना करावयाचें आहे. प्रसिध्द शिक्षणशास्त्री रूसो यानें आपल्या मानसपुत्राच्या-'एमिल'च्या-हातांत वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंत एकहि पुस्तक न देतां त्याला शिकविलें आहे आणि चौदा वर्षांनंतर त्याला एक धंदा शिकवून तद्द्वारा त्याचें शिक्षण चालू ठेविलें आहे. "पुस्तक हें बालकांच्या दुःखाचें एक मोठें कारण (Instrument of their greatest misery) आहे" असे उद्गार त्यानें एके ठिकाणीं काढले आहेत. रविबाबूंची 'पोपटाची कहाणी' प्रसिद्धच आहे. राजाच्या पोपटाला शिक्षण देण्याकरितां अनेक जाड्या जाड्या पंडितांची योजना झाली. त्या पुस्तकी पंडितांनीं पोपटाला पढविण्या-

साठीं जाड्या जाड्या पुस्तकांचे ढीग रचले. अखेरीस पुस्तकांच्या त्या प्रचंड भाराखालीं पोपट ठार झाला ! तपासण्यासाठीं राजा आला तेव्हां शिक्षणाधिकारी निवेदन करिते झाले कीं, "पोपटाचा अभ्यासक्रम पुरा झाला आहे." राजा पोपटाला तपासूं लागला तेव्हां त्याला आढळून आलें कीं, पोपटाच्या पोटांत पुस्तकांचीं पानें खच्चून भरलीं असून पोपटाची हालचाल बंद पडली आहे ! पुस्तकी शिक्षणाचें इतकें भेसूर चित्र इतरत्र क्वचितच पाहावयास मिळेल.

वर्धा-योजनेंत पुस्तकी शिक्षणाचा निषेध केला आहे. वर्धा-योजनेचे जनक म. गांधी म्हणतात, "निव्वळ पुस्तक वाचतां येणें अगर कांहीं लिहितां येणें हें शिक्षण नव्हे. हा शिक्षणाचा आरंभहि नव्हे." अर्थात् पुस्तक हें शिक्षणाचें माध्यम होऊं शकत नाहीं. निरिक्षण, परीक्षण आणि प्रयोग यांच्या द्वारा म्हणजेच प्रत्यक्ष कृतींच्या द्वारा जें शिक्षण दिलें जातें त्यानेंच बालकांचा सर्वांगीण विकास होतो. "बालकाला एकादा जीवनोपयोगी धंदा शिकवा, त्याच्याभोंवतीं जी नैसार्गिक व सामाजिक सृष्टि आहे तिच्याशीं त्याचा दृढ परिचय करून द्या" हा वर्धा-योजनेचा आदेश आहे; व त्याप्रमाणें जीवनाशीं अनुबन्ध राखील असें शिक्षण बालकांना द्यावयाचें आहे. अनुबन्ध-पद्धति ही बालकांची जिज्ञासा जागृत करण्याची युक्ति आहे. जीवनाशीं अनुबन्ध राखण्याची प्रयोगनिष्ठा ज्याला स्वतःचे जीवनांत सिद्ध करतां येईल तोच बालकांच्या शिक्षणांत यशस्वी होईल. शिक्षकानें विद्यार्थी-बालकाच्या जीवनाकडे प्रेमानें व आस्थेनें लक्ष पुरविलें पाहिजे. प्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ पेस्टॉलाज्झी यानें म्हटल्याप्रमाणें (The individuality of the pupil must be sacred for the teacher) "विद्यार्थ्यांचें व्यक्तित्व हें शिक्षकानें अत्यंत पवित्र मानिलें पाहिजे." वर्धा-योजनेंत बालकाच्या जीवनालाच सर्वस्वी महत्त्व देण्यांत आलेलें

आहे. या योजनेंतील अभ्यासक्रम बालकनिष्ठ अगर बालककेंद्रित (Child–centred) आहे. बालकाला केंद्रस्थानीं धरून त्याच्याभोंवतीं जीवनांतील विविध अंगांचा पसारा कसा वाढत जातो याची कल्पना देणारा एक नकाशा जाकिर हुसेन समितीच्या अहवालांत परिशिष्ट म्हणून दिलेला आहे. त्यावरून असें दिसून येईल कीं, "मूलोद्योगाच्या द्वारें शिक्षण द्या" हें जर वर्धा-योजनेचें तंत्र आहे तर "बालकाच्या जीवनविकासाविषयीं आस्था बाळगून त्याला शिक्षण द्या" हा वर्धा–योजनेचा मंत्र आहे.

[१५]

## सूतकाम आणि स्वभाषा

स. ज. भागवत

वर्धा-योजनेंत हस्तव्यवसायाचे द्वारा बौद्धिक ज्ञान देण्याची जी मूलभूत कल्पना गृहीत धरलेली आहे तिच्याविषयीं अनेकांना साशंकता वाटत असते. इतर विषयांचें कसेंहि असो; पण भाषा-विषयाचे बाबतींत तरी कांहींच अडचण पडण्याचें कारण नाहीं. भाषा ही मानवाची खास मिळकत असून तिचा जन्मच क्रियेसाठीं झालेला आहे. मनुष्येतर सृष्टींत क्रिया चाललेली असते आणि प्राण्यांना कांहीं क्रियांचें अंधुक आणि अस्पष्ट भान असण्याचा संभव आहे. तथापि त्यांच्या क्रिया केवळ सहज प्रेरणेनें चालतात. मनुष्यांत मात्र ही स्थिति असत नाहीं. मनुष्येतर सृष्टींत धुमसत असलेली जीवनज्योति मनुष्यसृष्टींत प्रज्वलित आणि प्रकाशमान होते. मनुष्य-

जीवनाच्या अत्यंत तमोयुगांतहि ही ज्योत आढळून येते. आपल्या जीवनयात्रेसाठीं मनुष्याला निसर्गाशीं सतत संग्राम करावा लागत असल्यामुळें मनुष्याला निसर्गातील विविध वस्तूंचा परिचय होतो; आणि हा परिचय प्रारंभीं बहुतांशीं बाह्यक्रियात्मक असल्यामुळें त्याची पहिली भाषा क्रियांच्या आश्रयानेंच पोसली जाते. मनोविश्लेषणवादी असें मानतात कीं, कामेच्छा तृप्त करण्याचें साधन म्हणून प्रथम भाषेचा अथवा शब्दांचा जन्म झाला असावा. भाषाशास्त्रवेत्त्यांनीं असें सुचविलें आहे कीं, उद्योगासाठीं भाषेचा म्हणजे वाणीचा प्रथम उदय झाला. सामान्यतः मनुष्याच्या आयुष्यांत कामेच्छा जागृत होण्यापूर्वींच त्याला निव्वळ जगण्यासाठीं उद्योग करावाच लागत असल्यामुळें वाणीचा उद्योगाशीं असलेला संबंध अधिक पुरातन आणि अधिक स्वाभाविक मानिला पाहिजे असें वाटतें.

भाषेमध्यें क्रियेला प्राधान्य आहे ही गोष्ट निरुक्तकारांनीं प्रतिपादिलेली आहे. भाषेंतील सर्व शब्द क्रियांवरून अथवा मूळ धातूंवरून निष्पन्न झालेले आहेत, हा यास्काचार्यांचा सिद्धांत समाजशास्त्राच्या दृष्टीनेंहि समर्थित होतो. मनुष्य स्वतः क्रिया करीत करीत निसर्गांतील वस्तूंचा परिचय संपादितो त्या वेळीं देखील त्या वस्तूंच्या अंगीं असलेल्या क्रियाचें स्वरूप जाणूनच तो तसें करूं शकतो. निसर्गांतील वस्तूंना व्यवहारासाठीं जाणावें लागतें आणि त्यासाठीं त्यांना नांवें अथवा नामें देण्याची आवश्यकता निर्माण होते. वस्तूंच्या अंगीं निरनिराळे गुण असतात ते व्यवहाराच्या मिषानें व्यक्त होऊं लागतात. या गुणांवरून वस्तूंमध्यें भेद करण्याची शक्ति मनुष्याला प्राप्त होते. क्रियेच्या पदाशिवाय वाक्याला पूर्णता लाभत नाहीं, ही गोष्ट आपणांस माहीतच आहे. यावरूनहि भाषेचा आणि क्रियेचा संबंध किती अभेद्य आहे तें ध्यानांत येण्यासारखें आहे.

मूल जेव्हां बोलूं लागतें तेव्हां त्याची भाषा त्याच्या व्यवहारामधूनच त्याला मिळत असते. ज्या व्यक्ति वा ज्या वस्तु त्याच्या व्यवहाराला आवश्यक असतात त्या व्यक्तींना वा त्या वस्तूंना नांवें देण्याचें त्याचें काम सुरू होतें; आणि क्रियांवरूनच त्याचा शब्दकोश बनूं लागतो. मुलांशीं बोलतांना वडील माणसांनाहि ह्याच शब्दकोश वापरावा लागतो. उदाहरणार्थ–गाईच्या हंबरण्यावरून मुलें गाईना ‘ हम्मा ’ आणि मोटारीच्या शिंगावरून मोटारीला ‘ पम् पम् ’ अशीं क्रियादर्शक नांवें देतात. कुत्र्याला ‘ यू ’ म्हणून बोलाविलें जात असल्यामुळें कुत्र्याला ‘ यू ’ आणिं मांजरीच्या शब्दावरून मांजरीला ‘ म्यांव ’ असे शब्द तीं वापरतात. ‘ हम्मा आली ’, ‘ पम् पम् आली ’, ‘ यू आला ’, ‘ म्यांव आली ’ अशी मुलांची भाषा आपण नेहमीं ऐकतों. इतकेंच नव्हे, तर आपण हें तत्त्व जाणूनच त्यांच्याशीं सर्व तऱ्हेचा व्यवहार करितों. असें असल्यामुळें सहा किंवा सात वर्षांच्या मुलांना जेव्हां शाळेंत शिकविण्याला प्रारंभ केला जातो त्या वेळीं या तत्त्वाचा एकाएकीं विसर पडण्याचें कारण काय ? परिचित क्रियांच्या द्वाराच त्याची भाषा समृद्ध होत जाईल अशी व्यवस्था शाळेंत अवश्य झाली पाहिजे. त्याच्या क्रियांच्या क्षेत्राचा विस्तार जसजसा होत जाईल तसतसा त्याचा शब्दकोशहि समृद्ध होत जाईल. आजपर्यंतच्या शिक्षणपद्धतींत अक्षरज्ञानाला अवास्तव महत्त्व दिलें गेल्यामुळें खरोखर मुलांचें भाषा-ज्ञान अपुरें आणि सामर्थ्यहीन झालें आहे. भाषेंत क्रियेला जें स्वाभाविक स्थान आहे तें ओळखून आपण अक्षरज्ञानाचें स्तोम माजवितां कामा नये. मुलांचा नानाविध, स्वाभाविक आणि उपयुक्त क्रियांमध्यें प्रवेश करून दिला आणि त्या सर्व क्रियांचा

त्यांना चांगला परिचय झाला म्हणजे त्यांना तो परिचय वाणीनें प्रकाशित करण्यास शिकविलें पाहिजे. मुलांची वाक्शक्ति संपूर्णपणें प्रगल्भ होईपर्यंत त्यांना अक्षरांच्या जंजाळांत नेऊन सोडणें म्हणजे त्यांना भाषेच्या दृष्टीनें पंगू बनविण्यासारखें आहे. वर्धा-योजनेंत स्वभाषा शिकविण्याचे बाबतींत हीं दोन्हीं तत्त्वें स्पष्टपणें मांडलेलीं आहेत.

सामान्यतः कोठल्याहि उपयुक्त हस्तव्यवसायामधून मुलांची भाषा विकसित करितां येईल. कारण कोठलाहि हस्तव्यवसाय घेतला तरी त्याचेभोंवतीं निसर्ग आणि समाज यांची मिळणी झालेली असते. यामुळें मुलांच्या जीवनांत जितक्या गोष्टींचा संबंध येतो तितक्या साऱ्या गोष्टी कोणत्याहि हस्तव्यवसायानें प्रकाशित होऊं शकतात. आपण सूतकाम घेतलें तरी त्याच्या द्वारा मुलांना आवश्यक तेवढा सर्व भाषाविषय शिकवितां येईल. अन्न आणि वस्त्र या मनुष्याच्या अत्यंत मूलभूत गरजा आहेत; आणि मानवी समाजाचा सारा इतिहास या दोहोंशीं विलक्षण रीतीनें एकजीव होऊन गेलेला आहे. सूतकामाचा प्रारंभ कापसाच्या शेतीपासून होतो. कापसाच्या अनेक जाती आहेत. निरनिराळे नमुने शाळेभोंवतालच्या शेतांत अथवा शाळेसमोरच्या बागेंत लावितां येतील; आणि जमीन तयार करण्यापासून विद्यार्थ्यांच्या व्यवसायाला सुरुवात होईल. कापसाची शेती म्हटली तरी जमीन, हवा, पाणी, दिवस, रात्र, निरनिराळे ऋतू यांच्याशींच व्यवहार येणार. नांगरणें, खत घालणें, पेरणें, पिकांची जोपासना करणें इत्यादि व्यापार असणार. कापसाचें झाड घेतलें तरी त्याचीं मुळें, पानें, बोंडें असतातच. त्यांचे आकार, रंग, स्पर्श, गंध, स्वाद इत्यादि गुण आलेच. या सर्वांचें तशाच समान वस्तूंशीं असणारें साधर्म्य आणि

भिन्न वस्तूंशीं असणारें वैधर्म्य याहि कल्पना उत्पन्न होणारच. या सर्वांचें बुद्धीनें आकलन करून वाणीनें वर्णन करणें हा भाषा-विषयच होय. कापसाचा शोध लागण्यापूर्वी वस्त्रासाठीं माणसें झाडाच्या साली, पशूंचीं चामडीं इत्यादि वस्तू कशा वापरीत, त्यासाठीं त्यांना किती सायास पडत असत याची माहिती देतांना भाषाविषयच समृद्ध होणार आहे. कापसाच्या शोधामुळें मनुष्यजीवनांत स्वच्छता आणि पवित्रता हे संस्कृतिगुण निर्माण झाले, त्याची हिंसावृत्ति थोडी कमी होऊन त्याच्या अहिंसावृत्तीचा थोडा विकास झाला या नैतिक प्रगतीचें ज्ञान मुलांच्या भाषाज्ञानांतहि भर घालील. कापसाच्या शेतीनंतर रेचणें, पिंजणें, कातणें आणि विणणें इतक्या ठोकळ क्रिया सूतकामांत येतात. रंगविणें आणि शिवणें या क्रिया झाल्या, कीं वस्त्राचा प्रश्न संपूर्ण होतो. कापसाबरोबरच लोंकर व रेशीम हे पदार्थ येतात आणि त्यांच्या अनुषंगानें पुनः विविध प्रकारचें ज्ञान एकत्रित होतें. रेचणें-पिंजणें आणि कातणें-विणणें यांच्यांतहि अनेक प्रक्रिया सामावलेल्या आहेत. सुतारी, लोहारी, यंत्रशास्त्र इत्यादि ज्ञानविषयांचा त्यांच्याशीं निकट संबंध असल्यामुळें सूतकाम करणाऱ्या मुलांना या साऱ्या विषयांशीं परिचित व्हावें लागणार आहे. यामुळें त्याची भाषा अधिक व्यापक आणि जीवनाचा विविध प्रदेश आक्रमणारी होईल. भाषाविषय हा सर्व ज्ञानांचा, कृतींचा संग्रहकोश होय. काव्य, कथा इत्यादि साहित्य आणि छंद, व्याकरण इत्यादि शास्त्र म्हणजेच केवळ भाषाविषय नाहीं. सध्यां भाषाविषयाची व्याप्ति अत्यंत संकुचित झाली असल्यामुळें सूतकामांतून स्वभाषा कशी शिकवितां येईल अशी शंका उत्पन्न होऊं शकते. परंतु जीवनाचा सारा व्यवहार हें स्वभाषेचें क्षेत्र आहे हें लक्षांत ठेविलें तर अशी शंका उत्पन्नच होणार नाहीं. वर दिग्दर्शित

केलेल्या सूतकामाच्या व्याप्तींत आणखी पुष्कळच भर घालावयाची आहे. कापडाचे निरनिराळे प्रकार, निरानिराळ्यां समाजांची निरनिराळे पोषाख करण्याची पद्धति, व्यापारामधील कापडाचें स्थान, त्यामुळें हिंदुस्थानच्या इतिहासांत घडलेल्या विलक्षण आर्थिक व राजकीय घडामोडी ह्याहि गोष्टींचा समावेश त्यांत केला पाहिजे. हें सर्व लक्षांत घेतलें म्हणजे सूतकामांतून स्वभाषा किती शिकवितां येईल याची चांगली कल्पना येण्यासारखी आहे. वर वर्णन केलेल्या सर्व ज्ञानविभागांतून अनेक रसमय आणि नाट्यपूर्ण असे भाग निवडून काढून साहित्याची भूक देखील चांगली भागवितां येईल.

भाषाविषय शिकविणें म्हणजे लेखन-वाचन शिकविणें असाहि एक अर्थ कांहीं वेळां घेतला जातो. वस्तुतः हा कांहीं भाषाविषयाचा खरा अर्थ नव्हे. भाषाविषय म्हणजे जीवनांतील सर्व व्यवहार वाणीनें प्रकाशित करणें होय. हा प्रकाश सत्यपूर्ण, सौंदर्यमय आणि जीवनाच्या शुद्धीला प्रेरक असा झाला पाहिजे. केवळ लिपिज्ञानानें अथवा अव्यवस्थित वाचनानें हें साधणार नाहीं. तथापि लेखन-वाचनाला भाषाविषयांत स्थान आहेच. वर्धा-योजनेमध्यें मुलांना एकदम अक्षरओळख करून द्यावयाची नाहीं अशी कल्पना असून अक्षरओळख करून देण्यापूर्वी त्यांची वाक्शक्ति चांगली प्रगल्भ व्हावी यासाठीं वाणीचा उपयोग करून घ्यावयास सांगितला आहे. मुलांची वाणी शुद्ध, स्पष्ट, मोजकी व परिणामकारक करण्याकडे अधिक लक्ष दिलें असतां मुलांचें लेखनवाचनहि विनासायास सुधारतें असा अनुभव आहे. म्हणून लेखनवाचन शिकवितांनाहि मुलांच्या वाणींत वरील महत्त्वाचे गुण निर्माण होतील याकडे शिक्षकांनीं अधिक लक्ष दिलें पाहिजे.

वाक्शक्ति सिद्ध होण्यासाठीं अवश्य असणारी पूर्वतयारी झाल्यानंतर मुलांना अक्षरओळख करून द्यावयाची. त्यासाठीं प्रथम वाचन शिकवावें. नंतर कांहीं दिवसांनीं लेखनास प्रारंभ करावा. अक्षरलेखन शिकविण्याचे पूर्वीं मुलांना परिचित वस्तूंचें रेखन (Drawing) करण्यास शिकविलें पाहिजे. कारण वर्णलिपी ही तोंडानें उच्चारल्या जाणाऱ्या वर्णांची चित्रमालाच आहे. मूर्त पदार्थांचें रेखन येऊं लागल्यावर अमूर्त वर्णांचें रेखन सुलभ होईल. आधीं भाषण व रेखन; नंतर वाचन आणि शेवटीं लेखन असा क्रम ठेविला पाहिजे. लहान मुलांसाठीं जी 'बालबोधिनी' करावयाची ती शिक्षणाचें वाहन म्हणून जो मूलोद्योग निवडला असेल त्याच्याच आधारें तयार करण्यांत यावी असें मला वाटतें. वस्तुतः अनेक प्रकारच्या 'बालबोधिनी' रचतां येण्यासारख्या आहेत. तकलीचा मूलोद्योग घेऊन एक बालबोधिनी सहज रचतां येईल. कापूस, रोप, पान, बोंड, वेचणें, निवडणें, साफ करणें, सळी, फळी, रू, सरकी, चटई, सरकट, सुतळी, पिंजण, गोटिला, काकर, तात, ढोल, पोल, पेळूपाट, हाथ्या, पेळू, भिंगरी, तकली फिरणें, फिरविणें, पीळ भरणें, तुटणें, सांधणें, फाळका, गुंडाळणें, सांध, दोरा, सूत, धागा, तार, कळी, लटी, गुंडी, वजन, कस, राख, गति, मौन, डावा, उजवा, हात, पाय, पोटरी, कचरा, घट, काळा, पिवळा, पांढरा, लोखंड, पितळ, लांकूड, चामडें, तराजू, कांटा, पारडें, दांडा, तोळा, छटाक, रत्तल, शेर, तकली-पेटी इत्यादि सुमारें ७५ शब्द तकलीच्या अगदीं प्रारंभींच्या शिक्षणांत येऊन जातात. याच शब्दांचे लहान लहान धडे तयार करून 'तकली बालबोधिनी' कोणाहि शिक्षकाला सहज तयार करितां येईल. यानंतर पहिल्या वाचनपुस्तकांत समाज-परिचयांतील कित्येक कथा, स्वच्छता, आरोग्य, आहार इत्यादि विषयांवरील पाठ, लोककथा, लोकगीतें आणि सामाजिक व राष्ट्रीय

गाणीं वगैरे विषय देतां येतील. राष्ट्रीय विभूतींचीं चरित्रें, ऐतिहासिक व पौराणिक कथा यांचाहि त्यांत समावेश करतां येईल; आणि हे सर्व विषय तकली-चरख्याच्या भोंवतीं गुंफितां येतील. अशा रीतीनें पुढील पुस्तकांतहि इयत्तावर अभ्यासक्रम पाहून सूत-कामाच्या अनुषंगानें विविध विषयांवर पाठ देतां येण्यासारखे आहेत.

व्याकरणविषयक माहिती देतांना सूत-कामांतील विविध पदार्थांचा व प्रक्रियांचा चांगलाच उपयोग करितां येण्यासारखा आहे. नामें, विशेषणें आणि क्रियापदें यांच्या कल्पना मुलांना प्रत्यक्ष काम करीत असतां सहज देतां येण्यासारख्या आहेत. सर्वनामें आणि अव्ययें यांचें ज्ञानहि व्यवहारांतच करून दिलें पाहिजे. व्याकरण हें केवळ भाषेला असतें अशी कल्पना धरून चालतां कामा नये. व्याकरण म्हणजे भाषेची मीमांसा होय. पण भाषा ही जीवनावर उभारलेली असल्यामुळें व्याकरणाचा संबंधहि वस्तुत: जीवनांतील व्यवहाराशींच असतो. हा संबंध विद्यार्थ्यांच्या नीट ध्यानीं आणून दिला जात नाहीं; आणि त्यामुळें व्याकरण हा विषय विनाकारण रुक्ष आणि क्लिष्ट झाला आहे. जीवनाशीं त्याचा संबंध जोडून दाखविल्याबरोबर तो लागलीच सरळ व सरस झालेला दिसेल.

भाषा म्हणजे मनुष्यानें निर्मिलेल्या सांकेतिक शब्दांची एक सृष्टिच आहे. या सृष्टीचा प्रत्यक्ष सत्यसृष्टीशीं नित्य संबंध असला तरी शब्द निराळे व शब्दांचा वाच्य पदार्थ निराळा. हा भेद मुलांना चांगला समजला पाहिजे. निसर्गांतील वस्तु, तिची आपण कल्पनेनें आपल्या डोळ्यांसमोर उभारलेली मूर्ति, तिचें आपण काढलेलें चित्र या निरनिराळ्या गोष्टी आहेत. आपण वाणीनें उच्चारितों तो शब्द केवळ निसर्गांतील पदार्थाचा प्रतिनिधि होय. त्याचप्रमाणें वाणीनें उच्चारलेल्या

शब्द व लेखणीनें कागदावर काढलेला शब्द यांतहि फरक आहे. कागदावरील शब्द हा वाणीच्या शब्दाचा प्रतिनिधि आहे. हा भेदहि स्पष्ट करून सांगण्यासारखा आहे. लिहिलेल्या शब्दांत अथवा उच्चारलेल्या शब्दांत खरेंखुरें जीवन नाहीं. तें या सर्वांच्या पलीकडे आहे. पण आपणांला प्रत्यक्षरूपानें नेहमीं उपलब्ध होणारें आहे. या सर्वेंद्रियांनीं जाणतां येण्यासारख्या जीवनाशीं बेइमान होऊन जेव्हां आपण वाणीच्या अथवा लिपीच्या सर्वस्वी आहारीं जातों त्या वेळीं आपण खऱ्या भाषेपासूनहि दूर जातों. मग त्याचा परिणाम खोटे शब्द आणि काल्पनिक मनोराज्यें यांची निर्मिति करण्यांत होतो. त्यांतून निर्माण होणाऱ्या साहित्यांत गूढता. असत्यता आणि दुर्बलता इत्यादि दोष भरून राहतात; आणि असलें साहित्य मनाला सर्वस्वीं पंगू बनवितें. जो समाज आपल्या हातांनीं जीवनाच्या प्रत्यक्ष भूमीवर क्रियाशील राहिला असेल त्याची अशी दशा कधींच होणार नाहीं. म्हणून वर्धा–योजनेंतून जें समाज–मन निर्माण होईल त्याची भाषा जीवनाशीं इमानदारी राखणारी होईल; आणि त्या भाषेंतील साहित्य जीवनाला हंसवील, खेळवील इतकेंच नव्हे, तर तें पुरुषार्थाला प्रेरक करील अशी मला आशा आहे.

[ १६ ]

## चतुर्विध कृती आणि शिक्षण

**स. ज. भागवत**

लहान मुलांना एकसारखें कांहीं तरी करीत असावें असें वाटत असतें. यामुळें तीं कधींहि स्वस्थ बसत नाहींत. या त्यांच्या स्वाभाविक प्रवृत्तीचा विचार करूनच त्यांच्या शिक्षणाची आंखणी झाली पाहिजे. मूलोद्योगी शिक्षणपद्धतींत उत्पादक उद्योगावर विशेष भर दिलेला

असला तरी शिक्षणाचें तेंच एक वाहन बनविण्याची आवश्यकता नाहीं. कारण मूलोद्योगाप्रमाणेंच शिक्षणासाठीं आणखी कृतीचीं केंद्रें उपलब्ध आहेत. या केंद्रांचाहि शिक्षणाकडे अवश्य उपयोग करून घेतला पाहिजे. मुलांच्या जीवनांत प्रारंभीं तरी खेळकर वृत्तीचें प्राधान्य असतें आणि त्यांतच जिज्ञासावृत्तीचाहि अंतर्भाव झालेला असतो. किंबहुना, त्यांचा 'जाणण्याचा खेळ' चालू असतो असें म्हटलें तरी चालेल. यासाठीं मुलांच्या शिक्षणांत खेळाला जितकें महत्त्व ठेवितां येईल तेवढें अवश्य ठेविलें पाहिजे. खेळ ही कांहीं उत्पादक कृति नव्हे. तथापि तिचा जिज्ञासेप्रमाणेंच सिसृक्षेशीं निकट संबंध आहे. सिसृक्षा म्हणजे सर्जन करण्याची-निर्मिति करण्याची इच्छा होय. मानवी जीवनांत या सिसृक्षेला फार महत्त्वाचें स्थान आहे. म्हणून मुलांच्या शिक्षणांत विविध प्रकारच्या खेळांचा समावेश करून घेतला पाहिजे. शिक्षणाच्या प्रारंभकालांत तर या खेळांचे द्वारा इंद्रियशिक्षण आणि शरीरविकसन या दोनहि गोष्टी सुलभतेनें साधितां येतील. खेळ हें कृतीचें प्रथम केंद्र समजण्यास हरकत नाहीं.

मुलाची जिज्ञासावृत्ति अशीच प्रखर असते. तो सृष्टींतील प्रत्येक पदार्थ आपल्या इंद्रियांच्या द्वारा जाणण्याचा सतत प्रयत्न करीत असतो. शिक्षणानें त्याच्या या प्रवृत्तीला उत्तेजन दिलें पाहिजे. जिज्ञासेंतून निर्माण झालेल्या कृतींचें स्वरूप प्रथम निरीक्षणांत व्यक्त होतें. निरीक्षण हें सर्व ज्ञानाचें व प्रयोगांचें मूलस्थान होय. निरीक्षणा-मुळें केवळ इंद्रियशक्ती विकसित होतात इतकेंच नाहीं तर, बौद्धिक शक्तींचाहि विकास घडून येतो. आपल्या सर्वेंद्रियांनीं सृष्टीचें सर्वांशानें ज्ञान मिळविण्याच्या सर्व प्रयत्नांना निरीक्षणांत दाखल करण्यास हरकत नाहीं. म्हणून निरीक्षण हें कृतीचें दुसरें केंद्र समजलें पाहिजे.

प्रत्येक शाळेंत खेळ आणि निरीक्षण यांच्या द्वारा विविध प्रकारचें ज्ञान देण्याची शिक्षकांनीं दक्षता बाळगिली पाहिजे. याशिवाय प्रत्येक शाळेंत आणखी एक कृतीचें केंद्र निर्माण करितां येण्यासारखें आहे. तें बागकाम होय. बागकाम लहान प्रमाणावर असल्यामुळें त्यांतून आर्थिक दृष्टया कांहीं उत्पादन होईल अशी अपेक्षा नाहीं. परंतु खेळ आणि निरीक्षण या दोनहि प्रवृत्तींचा बागकामांत समावेश झालेला आढळून येईल. उत्पादक उद्योगाला अवश्य असणाऱ्या सर्व प्रवृत्तींचीं बीजें या बागकामांत सामावलेलीं असल्यामुळें कृतीच्या या तिसऱ्या केंद्रालाहि शिक्षणांत महत्त्वाचें स्थान मिळालें पाहिजे.

उत्पादक उद्योग हें कृतीचें चवथें आणि शेवटचें केंद्र होय. या केंद्रांत बुद्धिपूर्वकता या गुणाची मुख्यतः आवश्यकता असते. यामुळें उच्च बौद्धिक विकासाला हें केंद्र अत्यंत पोषक बनतें. पहिल्या तीन केंद्रांतील विविध कृतींच्या द्वारा बालकाचें मन विकसित करीत करीत त्याला या केंद्रांत आणून स्थिर करणें हें मूलोद्योगी शिक्षणांत अतिशय महत्त्वाचें कार्य समजलें पाहिजे. जितक्या प्रमाणांत कृतीच्या पहिल्या तीन केंद्रांचा शिक्षणाकडे उपयोग करून घेतला गेला असेल तितक्या प्रमाणांत हें चवथें केंद्र शिक्षणाचे दृष्टीनें सुफलदायी आढळून येईल. यासाठीं कृतीच्या या चारहि केंद्रांचा साकल्यानें विचार करून तीं परस्परांना पोषक आणि परिवर्धक होतील अशा रीतीनें त्यांची शिक्षणांत योजना बसविली पाहिजे.

या चारहि केंद्रांचा सुव्यवस्थित उपयोग करून घेतला तर मुलांना शिक्षणांत मुळींच कंटाळवाणेपणा भासणार नाहीं. शालागृह म्हणजे शाळा नव्हे. या चारहि कृतींचीं केंद्रें जेथें जेथें उपलब्ध होतील तेथें तेथें मुलांचें शिक्षण चालू झालें पाहिजे. म्हणून शालागृहाची

संकुचितता या शिक्षणाला बाधणार नाहीं, आणि यामुळें शिक्षणांत नावीन्य, वैचित्र्य यांचा रस निर्माण होईल. त्यायोगें शिक्षण जिवंत आणि तेजस्वी बनेल.

बौद्धिक विषयांतील सर्व विभागहि परस्परांशीं संबद्ध असल्यामुळें कृतीच्या या चारहि केंद्रांभोंवतीं त्यांची गुंफण सहज करितां येईल. निरनिराळ्या प्रकारचें रेखन, चित्रण हा तर खेळाचाच विभाग आहे. याचेभोंवतीं भाषा उभी राहतेच. वर्णन, विवरण, गायन इत्यादि भाषाविभाग कोणत्याहि कृतीशीं सहज जोडिले जातात. भाषेच्या द्वाराच इतिहासादि समाजअंगांचा परिचय करून द्यावयाचा असतो. यामुळें तो विभागहि कृतीशीं जोडणें अवघड नाहीं. आपण जें जाणतों तें प्रथम वाणीनें प्रकट करावयाचें. म्हणजे वाक्शक्ति विकसित होत जाते. वाक्शक्तीच्या संपूर्ण विकासानंतर लिखित वर्णांचें वाचन करावयाचें आणि शेवटीं लेखन करावयाचें. अनुभवाचा कोश जसजसा कृतीनें समृद्ध होत जाईल तसतसें वाणीचें सामर्थ्य स्वभावत:च वाढत जाईल. आणि वाक्सामर्थ्य ज्या प्रमाणांत सिद्ध होत जाईल त्या प्रमाणांत लेखनशक्ति देखील अंकित होऊन राहील. अनुभवाची मीमांसा म्हणजे शास्त्रज्ञान. कृतीच्या द्वारा अनुभवाची मीमांसा करण्याची सवय आणि शक्ति मुलांमध्यें निर्माण होत गेली म्हणजे त्यांच्या बुद्धीचा विकास निश्चयानें होणारच.

बुद्धिविकासाची चाड बाळगणाऱ्या शिक्षणानें कृतीच्या या चतुर्विध केंद्रांशीं कधींहि बेइमान होतां कामा नये. या केंद्रांतूनच सारें शिक्षण निर्माण होणार आहे.

[ १७ ]

## सण आणि शिक्षण

स. ज. भागवत

समाजांत वेळोवेळीं निरनिराळ्या प्रयोजनासाठीं निरनिराळे सण साजरे केले जातात. विशेषतः हिंदुस्थानांत हिंदु समाजामध्यें सणांचा विस्तार फारच आढळून येतो. या सणांच्या निमित्तानें शाळांना सुट्या देण्याची पद्धत आहे. वस्तुतः या सणांच्या द्वारा विद्यार्थ्यांना फारच चांगल्या प्रकारचें जीवनशिक्षण देतां येण्यासारखें आहे. सण ही एक सामाजिक संस्था असून समाजाच्या विकासाला आवश्यक असणाऱ्या विविध वृत्तींची जोपासना करण्यासाठीं तिचा जन्म झालेला आहे. जीवनाशीं समन्वय जोडूं पाहणाऱ्या वर्धा-योजनेमध्यें तर शिक्षणाचे दृष्टीनें सणांना विशेष महत्त्व दिलें पाहिजे. कारण सणांचें केंद्र धरून शिक्षणांतील बहुतेक विभागांची स्वाभाविक उभारणी करितां येण्यासारखी आहे.

सणांभोंवतीं समाजाचा सारा इतिहास गुंफलेला आढळून येतो. चैत्र आणि कार्तिक यांतील पाडवे शालिवाहन आणि विक्रमादित्य यांच्या प्रतापांचें स्मरण करून देतात. नारळी पौर्णिमा आणि विजया-दशमी हे दोन सण जलसंचार व स्थलसंचार करण्यासाठीं प्रस्थान ठेवणारे आहेत. श्रावणी आणि ऋषिपंचमी यांच्यासारखे सण वैदिक परंपरांची स्मृति राखण्यासाठीं आहेत. रामनवमी, कृष्णाष्टमी इत्यादि धार्मिक महोत्सवांमध्यें इतिहासाबरोबर अध्यात्माचें मीलन झालें आहे. शिवजयन्ती, टिळक पुण्यतिथि, गांधीजयन्ती इत्यादिकांतील राष्ट्रीय दृष्टि अगदीं उघड आहे. इतिहासाप्रमाणेंच निसर्गाचाहि सणांशीं

निकट संबंध आहे. दिवाळी व शिमगा हे सण शरद् आणि वसंत या ऋतूंचे उत्सव आहेत. मकरसंक्रांत हा उदगयनाचा उत्सव आहे. नागपंचमी, गणेशचतुर्थी, नवरात्र इत्यादि सणांत सामाजिक आणि पौराणिक गोष्टींचें मिश्रण झालेलें आहे. वटपौर्णिमा, हरतालिका इत्यादि सणांत स्त्रीजीवनाचा विचार प्रामुख्यानें दृष्टीस पडतो. आषाढी–कार्तिकी एकादशी आणि महाशिवरात्र यांचे भोंवतीं भक्ति आणि मुक्ति याची गुंफण करण्यांत आलेली आहे. याशिवाय ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास यांच्या पुण्य-तिथींचे उत्सव महाराष्ट्रांत मोठ्या समारंभानें साजरे केले जातात. या हिंदु सणांशिवाय अन्यधर्मीयांचे सणहि आहेतच. राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या या काळांत आपणाला त्यांचाहि उपयोग करून घेतां येईल. इस्लाममधील दोन ईदा, मोहरम आणि पैगंबरजयन्ती यांच्या द्वारा इस्लाममधील श्रद्धा, भक्ति, हौतात्म्य इत्यादि वृत्तींचें दर्शन करून घेतां येईल. ईस्टर आणि नाताळ हे ख्रिस्ती धर्मातील आपल्या परिचयाचे सण आहेत. त्यांच्या द्वारा ख्रिस्तप्रभूच्या प्रेमधर्माचा परिचय आपणांस होऊं शकेल. याशिवाय महावीर, बुद्ध, शंकराचार्य यांच्या जयंत्या, व्यासांची गुरुपौर्णिमा, गीताजयन्ती आणि भीष्माष्टमी या सणांचा शैक्षणिक आणि सांस्कृतिक दृष्टीनें अवश्य स्वीकार करण्यासारखा आहे.

संस्कृतीच्या परंपरेचें रक्षण करणें आणि समाजाला पुरुषार्थाची प्रेरणा देणें हें सणांचें प्रमुख प्रयोजन आहे. विवेकदृष्टीचा लोप झाल्यामुळें सध्यां आपल्या सणांमध्यें विशेष शक्ति दिसेनाशी झाली आहे. आळस आणि विलास यांनीं सणांचें शुध्द स्वरूप ग्रासून टाकलें आहे. केवळ यांत्रिक जडता आणि दुबळा धर्मभोळेपणा

एवढेंच स्वरूप उरलें आहे. समाज-संजीवनाचा एक प्रभावी उपचार म्हणून सणांचा उपयोग व्हावयाचा असेल तर त्यांना नवीन संस्कार दिले पाहिजेत. हें कार्य वर्धा-योजनेंतील शाळांना सहज करितां येईल. सणांच्या दिवशीं सामाजिक कार्यक्रम योजून विद्यार्थी आणि ग्रामीणजन यांना जीवनाची नवी दृष्टि देतां येईल, आणि त्यायोगें समाजांत नवा उत्साह निर्माण करतां येईल.

सणांच्या दिवशीं शाळांना सुटी असते. पण या सुटीचा उपयोग शैक्षणिक दृष्टीनेंच करावयाचा असा शिक्षकांनीं कटाक्ष ठेवला पाहिजे. सणाच्या द्वारा सामाजिक जीवनाला आवश्यक असणाऱ्या विविध वृत्तींचें शिक्षण विद्यार्थ्यांना देतां येईल. देवळें, यात्रास्थानें, जलस्थानें यांची सफाई कशी करावी व यांचा व्यवस्थित रीतीनें उपयोग कसा करून घ्यावा याचें ज्ञान समाजाला द्यावें. सध्यां सणांत जे अनेक अनाचार घुसले आहेत त्यांची तेथून उचलबांगडी करण्याची खटपट करावी. आहार-विहाराच्या बाबतींत शास्त्रीय मर्यादा कोणत्या पाळल्या पाहिजेत त्यांचें ज्ञान करून द्यावें. दारूसारख्या व्यसनांचा अथवा हिंसात्मक बलिदानाचा प्रचार थांबवावा. मर्दानी खेळ आणि सात्त्विक विनोदसाधनें, भजन-कीर्तन आणि व्याख्यान-प्रवचन इत्यादि कार्यक्रम योजावे. यामुळें समाजांतील सर्वच मंडळींना शिक्षणाचा लाभ होईल. विद्यार्थ्यांना समाजपरिचय आणि स्वभाषा या दोन विषयांचें अध्ययन सहज घडेल. कारण निरानिराळ्या सणांत निरनिराळ्या कथा, कविता आणि सामाजिक स्थित्यन्तरांचा इतिहास हीं अन्तर्भूत असतातच. यामुळें सणांच्या द्वारा विद्यार्थ्यांचें बौद्धिक शिक्षण चांगलेंच पुष्ट करितां येईल.

[ १८ ]

# आकाश-दर्शन आणि शिक्षण

स. ज. भागवत

जीवनाचें शिक्षण देणारी शाळा जीवनाइतकीच विशाल आणि व्यापक असली पाहिजे. तिचें स्वरूप सध्यांच्या शाला-गृहांसारखें कोंदट आणि संकुचित असून चालणार नाहीं. जीवनाचा द्यावा-पृथिवीशीं सारखाच संबंध आहे. यामुळें जीवनाची शाळा देखील पायांखालच्या भूमीप्रमाणेंच मस्तकावरच्या आकाशाशींहि जोडली गेली पाहिजे. यासाठीं आकाशाखालीं रोज थोडा वेळ तरी शिक्षकांनी आपल्या विद्यार्थ्यांना घेऊन बसलें पाहिजे. पावसाचे 'दुर्दिन' सोडले तर एरव्हीं उघड्या आकाशाखालीं निदान पूर्व रात्रीं एकादअर्धा तास घालविल्यानें शरीराला आरोग्य आणि मनाला प्रसन्नता यांचा सहजीं लाभ होण्यासारखा आहे. मूठभर शहरें सोडलीं तर खेडेगांवांतून ज्या असंख्य शाळा चालत आहेत अथवा चालावयाच्या आहेत त्यांतील बालकांना तरी आकाशाच्या दिव्य दर्शनापासून वंचित होण्याची काय आवश्यकता आहे ?

आकाश-दर्शनांचा शिक्षणाशीं इतका निकट संबंध आहे की, आतांपर्यंत त्याची उपेक्षा कशी झाली याचेंच आश्चर्य वाटतें. आपली पृथ्वी आकाशांतील ग्रहनक्षत्रांशीं इतकी निगडित झालेली आहे कीं, तिच्यावरील घडामोडींचें ज्ञान आकाश-ज्योतींच्या परिचयाशिवाय होऊंच शकत नाहीं. आपली भारतीय जीवनपद्धति तर चंद्र-सूर्यांच्या गतिमानावरच उभारलेली आहे. आपले वारच काय पण तिथी, पक्ष, मास आणि वर्ष या सर्वांचा सूर्याशीं आणि चंद्राशीं अभेद्य संबंध

आहे. नवग्रह, सत्तावीस नक्षत्रें, बारा राशी यांचा पावलोपावलीं उच्चार करून आपले सणवार आणि क्रियासंस्कार चालत असतात. यांत जो कांहीं अडाणी धर्मभोळेपणा भरलेला आढळेल त्याचें अवश्य निर्मूलन केलें पाहिजे. तथापि शुद्ध ज्ञानाच्या दृष्टीनेंहि आपल्या परंपरेंत पुष्कळच विचारणीय अंश आढळून येईल. त्याचा जीवनांत उपयोग असल्यामुळें शिक्षणांतहि त्याचा समावेश करण्याची जरूरी आहे.

गेल्या पिढींत ब्राह्मणांच्या मुलांना तरी वार, मास, नक्षत्र, राशी इत्यादिकांचीं नांवें क्रमवार पाठ करावीं लागत. इतरांना तोहि लाभ होत नसे. आणि ब्राह्मणांतहि हें ज्ञान केवळ नांवापुरतेंच असे. कारण आकाशांतील नक्षत्रांचा साक्षात् परिचय वडिलांनाहि नसावयाचा तेथें तो मुलांना कोठून असणार? आपणांला असें तोंडपाठी ज्ञान नको आहे. बालकांचा आकाशाशीं प्रत्यक्ष परिचय झाला पाहिजे, आणि तो पुन्हां सर्व जातींच्या मुलामुलींना झाला पाहिजे. असें व्हावयाचें असेल तर रात्रीं आकाशाखालीं थोडा वेळ शाळा भरविली पाहिजे.

आपले महिने चांद्र व आपलें वर्ष सौर आहे. यामुळें पौर्णिमा-अमावास्या, शुक्लपक्ष-कृष्णपक्ष, दक्षिणायन-उत्तरायण, मकरसंक्रांत-रथसप्तमी, इत्यादि घटनांशीं आपला नित्य व्यवहार येतो. पावसाच्या नक्षत्रांची गोष्ट अशीच आहे. हा सर्व व्यवहार आकाश-दर्शनानें मुलांना चांगला समजूं शकेल व त्यांतील रस त्यांना चाखतां येईल. शुक्ल-पक्षांतील लवकर मावळणारा आणि कलेकलेनें वाढत जाणारा चंद्र कृष्णपक्षांत उशीरा उगवूं लागतो आणि त्याचें तेज कलेकलेनें घटूं लागतें ही गोष्ट आकाश-दर्शनानेंच यथासांग कळूं शकेल. दिशांचें आणि रात्रिमानाचें ज्ञान होण्यालाहि आकाश-दर्शनाची आवश्यकता

आहेच. सूर्य–चंद्राप्रमाणेंच मंगळ, बुध, गुरु, शुक्र आणि शनि यांची देखील आकाशांतच ओळख करून घेण्यासारखी आहे. उदाहरणार्थ, एखाद्या महिन्यांत सूर्यास्तानंतर हे पांचाहि ग्रह स्पष्ट दिसत असले तर ते कितीजणांनीं पाहिले आणि दाखविले असतील ? आपलें पंचांग पाश्चात्य पद्धतीच्या कॅलेंडरापेक्षां कितीतरी पटींनीं उद्बोधक असतें. तो एक आकाशाचा नकाशाच असतो. त्याचें ज्ञान आकाशाच्या साह्यानें अगदीं सुलभतेनें करून देतां येईल आणि त्यायोगें विद्यार्थ्यांच्या बौद्धिक ज्ञानांत व सामाजिक जीवनांत परस्पर मेळ घडून येईल.

आकाश–दर्शनाचा सामाजिक जीवनाप्रमाणेंच गणित, विज्ञान, साहित्य इत्यादि केवळ बौद्धिक विषयांशीं देखील पुष्कळ संबंध आहे. उत्तरेचा ध्रुव आणि त्याचे भोंवतीं फिरणारा ध्रुवमत्स्य व सप्तऋषी, सप्तऋषींतील वसिष्ठ व अरुंधती, दक्षिणेकडील अगस्त्य आणि त्रिशंकु, यांच्याप्रमाणेंच नक्षत्रमालेंतील कृत्तिका, मृग व त्याची पारध करणारा व्याध, श्रवण इत्यादि नक्षत्रें आणि राशिचक्रांतील वृश्चिकासारख्या राशी इत्यादिकांच्या आकृती मोठ्या प्रेक्षणीय व रमणीय आहेत, आणि त्याचे संबंधीं अनेक रसपूर्ण कथा आपल्या प्राचीन वाङ्मयांत भरून राहिल्या आहेत. यांच्या स्थिति-गतींचें ज्ञानहि असेंच मनोरंजक व बौद्धिक क्षुधा जागृत करणारें आहे. या साऱ्या ज्ञानाचा आकाश-दर्शनाशीं सहज समवाय असल्यामुळें हें ज्ञान स्वाभाविकतेनें मुलांना ग्रहण करितां येईल.

आपल्या वैदिक ऋषींना आकाश-दर्शनाचा मोठा छंद होता. त्यांनीं आकाशांतील नक्षत्र–तारकांना ‘ देवाचें काव्य ’ म्हटलें आहे व हें काव्य ‘ अमर आणि अजर ’ असल्याचें वर्णिलें आहे. देवाच्या ह्या अमर काव्याचा आस्वाद घेण्याची कला आपल्या शिक्षणांत आपण अवश्य समाविष्ट केली पाहिजे.

[ १९ ]

# वर्धा-योजनेंतील बालवर्ग

स. ज. भागवत

जाकिर हुसेन समितीनें आंखलेल्या शिक्षणक्रमांत बालवर्गाची कल्पना नाहीं. सात वर्षें पूर्ण झालेल्या मुलांमुलींना शाळेंत दाखल करून त्यांना पुढें सात वर्षें नव्या पद्धतीनें कसें शिक्षण द्यावें याचाच विचार तेथें करण्यांत आलेला आहे. तथापि प्रत्यक्ष प्रयोगाचे वेळीं बालवर्गाची अपरिहार्यता दिसून आल्यामुळें त्याचाहि अभ्यासक्रम योजण्यांत आलेला आहे. गुजरात विद्यापीठातर्फे थामणा येथें चाललेल्या वर्धा राष्ट्रीय शाळेंत बालवर्ग सुरू करण्यांत येऊन त्याचा अभ्यासक्रमहि तयार करण्यांत आला. मुंबई सरकारनें नेमिलेल्या बेसिक कमिटीनें थामण्याच्या अभ्यासक्रमांत थोडा फेरफार करून बालवर्गासाठीं अभ्यासक्रम तयार केला आहे; आणि त्याप्रमाणें वर्धा-शाळांतून बालवर्ग शिकविण्यांत आले. बालवर्गाच्या या अभ्यासक्रमासंबंधीं कांहीं विचार येथें नमूद करितों.

हा अभ्यासक्रम नीटपणें अवलोकिला असतां कोणालाहि सहज आढळून येईल कीं, विद्यार्थ्यांना वर्धा-योजनेसाठीं करावी लागणारी पूर्वतयारी या अभ्यासक्रमानें चांगली साधणार आहे. वर्धा-योजनेंत शिक्षणाचा जीवनाशीं जिवंत संबंध जोडण्यांत आलेला असल्यामुळें बालवर्गाच्या अभ्यासक्रमांतहि तीच दृष्टि राखण्यांत आलेली आहे. हस्तव्यवसाय, वैयक्तिक आणि सामाजिक स्वच्छता, इंद्रिय-शिक्षणात्मक खेळ, सहली व निरीक्षण, स्वभाषा, गणित, रेखन आणि गायन असे आठ विषय योजिलेले आहेत. हस्तव्यवसायांत हस्तशिक्षणाकडेच

मुख्यत: नजर द्यावयाची आहे. काम किती झालें हें पहावयाचें नाही. उद्योगाच्या आर्थिक बाजूचा विचारहि करावयाचा नाहीं. म्हणून या विषयाला मूलोद्योग असें नांव न देतां हस्तशिक्षण हें नांव देण्यांत आलेलें आहे. परंतु यांत सांगितलेल्या सर्व क्रिया चांगल्या रीतीनें विद्यार्थ्यांजवळून करून घेतल्यास त्यांचें ज्ञान व कौशल्य हीं दोन्ही चांगलीं वाढतात असा सर्वत्र अनुभव आला आहे. या पद्धतीनें तयार झालेला बालवर्गांतील विद्यार्थी प्रथम वर्षाच्या मूलोद्योगाला विशेष लायक बनतो आणि उत्पादक दृष्टीनेंहि त्याचा उद्योग अपेक्षेपेक्षां चांगल्या प्रकारचा होऊं शकतो असें आढळून आलें आहे. स्वभाषा आणि गणित या बौद्धिक विषयांतहि समवायपद्धतीनें शिक्षण द्यावयाचें असल्यामुळें विद्यार्थ्यांची प्रगति सहज होते, त्यांना हे विषय कंटाळवाणे होत नाहींत असे दिसून आलें आहे. रेखन आणि गायन हे तर मुलांचे स्वाभाविक आवडीचे विषय असल्यामुळें त्यांत तीं आनंदानें रमतात. मूलोद्योगाच्या बाबतींत ज्याप्रमाणें उत्पादनाकडे लक्ष न देतां हस्तकौशल्याकडे लक्ष द्यावयाचें आहे, त्याचप्रमाणें स्वभाषेच्या बाबतींत लेखनवाचनाकडे आधीं लक्ष द्यावयाचें नसून विद्यार्थ्यांची वाक्शक्ति विकसित करण्याकडे लक्ष द्यावयाचें आहे. भाषा ही मुख्यत: कानानें आणि वाणीनें शिकावयाची असते. लेखन आणि वाचन हीं भाषेचीं कृत्रिम स्वरूपें आहेत. मनुष्याच्या संमिश्र जीवनांत त्यांची कितीहि आवश्यकता भासत असली तरी तीं तत्त्वतः गौण आहेत हें विसरून चालणार नाही. म्हणून बालवर्गांतील स्वभाषेचा अभ्यास जीवनाच्या स्वाभाविक पद्धतीनेंच चालविण्यांत आला पाहिजे. दुसऱ्याचा भाव कानानें समजून घ्यावयाचा आणि स्वतःचा भाव वाणीनें प्रकट करावयाचा हीच जीवनाची स्वाभाविक भाषापद्धति होय. या पद्धतीप्रमाणें

भाषेचा अभ्यास होत गेल्यास विद्यार्थ्यांचें भाषेवरील प्रभुत्व थोड्या वेळांत सिद्ध होईल. समवायपद्धतीनें शब्दाचा प्रत्यक्ष पदार्थाशीं संबंध जोडावयाचा असल्यामुळें या भाषेला स्पष्टपणा, रेखीवपणा आणि स्वाभाविकपणा हे गुण प्राप्त होतील; आणि शब्दशक्ति सिद्ध झाल्यानंतर लेखन–वाचन शिकविलें असतां तें बुद्धिविकासाला अधिक साह्य करूं शकेल. लेखनापूर्वी रेखन शिकविलें पाहिजे. रेखनानें हात चांगला वळल्यावर लेखनाला सहजच सौष्ठव लाभेल. मूर्त वस्तूंचें रेखन केल्यानंतर अमूर्त वर्णांचें लेखन सुलभ होईल. अनुभवानें या विचारसरणीला चांगलीच पुष्टि मिळालेली आहे.

बालवर्गाच्या या अभ्यासक्रमांत सर्वत्र कृतिप्रधानता भरून राहिलेली आहे हें अवश्य लक्षांत ठेविलें पाहिजे. जुन्या पद्धतींत विद्यार्थ्यांना एके जागीं डांबून ठेविणें आणि पाट्या–पेन्सिलींच्या द्वारें केवळ घोकंपट्टी चालविणें इतकेंच बालवर्गाचें शिक्षणकार्य असे. नव्या योजनेंत विद्यार्थी संचारी आणि क्रियाशील राखावयाचा आहे. यासाठीं बालवर्गाचा शिक्षक वर्धा–योजनेचा तज्ज्ञ असला पाहिजे, तो हस्तव्यवसायांत निपुण असला पाहिजे आणि जीवनाशीं समरस होण्यांत त्याला आनंद वाटला पाहिजे. अशा शिक्षकाच्या हातीं हा बालवर्गाचा अभ्यासक्रम पडेल तर वर्धा–योजनेला आवश्यक असे विद्यार्थी बालवर्गामधून तयार होतील अशी खात्री वाटते.

[ २० ]

# वर्धा-योजनेची व्यवहार्यता

स. ज. भागवत

वर्धा-योजना राष्ट्रापुढें आल्यापासून निरनिराळ्या दृष्टींनीं निरनिराळ्या लोकांनीं तिच्यावर अव्यवहार्यतेचा आरोप केलेला आहे. राष्ट्रीय सभेच्या मंत्रिमंडळांनीं या योजनेचा स्वीकार करून आपापल्या प्रांतांत तिची अंमलबजावणी सुरू केल्यापासून सरकारी शिक्षण-खात्यांतील अधिकारी आपापल्या परीनें ती व्यवहार्य करण्याचे प्रयत्न करीत आहेत. म. गांधींच्या विधायक कार्यक्रमावर निष्ठा ठेवून स्वतंत्रपणें काम करणाऱ्या राष्ट्रसेवकांनींहि या योजनेचा विचार व आचार चालविला आहे. पुण्याच्या परिषदेंत सरकारी शिक्षणाधिकारी आणि स्वतंत्र विधायक कार्यकर्ते एकत्र झाले होते. या परिषदेंत जी चर्चा झाली आणि परिषदेनंतर ठिकठिकाणीं जें अभिप्रायप्रदर्शन झालें त्यावरून प्रत्यक्ष कार्य करणाऱ्या लोकांतहि या योजनेच्या व्यवहार्यतेविषयीं भिन्नभिन्न दृष्टिकोण आहेत असें आढळून आलें आहे. यासाठीं या योजनेच्या व्यवहार्यतेविषयीं कांहीं कल्पना निश्चित करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे.

ही योजना सार्वत्रिक लोकशिक्षणाची राष्ट्रीय योजना आहे. यामुळें या योजनेचा लोकजीवनाच्या सर्व प्रमुख अंगांशीं संबंध राखलेला आहे. आपल्या राष्ट्रांतील लोकजीवन उन्नत आणि सुसंस्कृत करण्यासाठीं आपणांला आर्थिक स्वावलंबन, सामाजिक सहकार आणि बौद्धिक विकास या गोष्टी मुख्यतः घडवून आणावयाच्या आहेत. वर्धा-योजनेच्या मुळाशीं या तीनहि कल्पना स्पष्टपणानें दाखक

केलेल्या आहेत. यांतील एकाद्या गोष्टीकडे दुर्लक्ष झालें तरी आपलें इष्ट साध्य होणार नाहीं. आतांपर्यंत शिक्षणाचा विचार करणारे लोक नुसत्या बौद्धिक विषयांचाच विचार करीत असत. आर्थिक व्यवहाराचा विचार करण्याची कल्पनाहि या उदार शिक्षणाला ओंगळ वाटत असे! वस्तुत: ही उदार शिक्षणाची कल्पना मूठभर श्रीमंत लोकांची कल्पना आहे. बहुजनसमाजाला या कल्पनेचें शिक्षण कधींहि देतां येणार नाहीं. बहुजनसमाज स्वत:च्या शरीरश्रमांनींच आजवर जगत आला आहे आणि पुढेंहि आपल्या जीवितयात्रेसाठीं त्याला शरीरश्रमच करावे लागणार आहेत. लोकशाहीच्या या नव्या युगांत बहुधा कोणालाही निवळ ऐतखाऊपणानें जगतां येणार नाहीं. यामुळें बहुजनसमाजाच्या शिक्षणांत शरीरश्रम आणि आर्थिक स्वावलंबन यांना अग्रस्थान मिळालें पाहिजे. मूलोद्योगाच्या पायावर शिक्षण उभारणें याचा हाच अर्थ आहे.

हा मूलोद्योग म्हणजे मुख्यतः ग्रामोद्योगच होय हेंहि नीट जाणलें पाहिजे. मूलोद्योगाचें शिक्षण म्हणजे ग्रामोद्योगाचें शिक्षण आहे; आणि ग्रामोद्योगाचें शिक्षण द्यावयाचें म्हटलें म्हणजे ग्रामजीवनाशीं सर्वांशानें समरस झालें पाहिजे. आपली नवी शाळा ही खेड्यांतील बालकाला खेड्यांतील जीवनाशीं एकरूप करून देणारी संस्था झाली पाहिजे. ती तशी व्हावयाची असेल तर या नव्या शाळेंतील शिक्षक, या शिक्षकांचे अध्यापक, निरीक्षक व शिक्षणमंत्र्यापर्यंतचे सर्व शिक्षणाधिकारी ग्रामसेवेच्या भावनेनें ओतप्रोत भरून गेले पाहिजेत. हा कांहीं केवळ बौध्दिक कुशलतेचा प्रश्न नाहीं. हा प्रत्यक्ष समाजसेवेचा प्रश्न आहे. सध्या तरी ग्रामसेवा करावयाची म्हणजे बहुतेक शहरी विलास सोडून देण्याची तयारी असली पाहिजे.. ही तयारी ठेवल्यानेंच बहुजनसमाजाला स्वावलंबी शिक्षण घेण्याची स्फूर्ति

होईल. सध्यां खेड्यांत घनघोर दारिद्र्य, अज्ञान आणि संस्कारहीनता हीं सर्वत्र पसरलेलीं आहेत आणि असें असूनहि श्रमाचा कंटाळा, विलासाची आवड इत्यादि वृत्ती झपाट्यानें वाढत आहेत. परिश्रमाच्या आणि साधेपणाच्या पायावर सामाजिक सहकार्याचें जीवन उभारण्याची दृष्टि खेड्यांतील नवीन पिढीला जर देतां येईल तरच खेड्यांतील जीवन सुधारलें जाऊं शकेल. ही दृष्टि येणें हाच खरा बौद्धिक विकास असून तो केवळ शाब्दिक मार्गानें कधींहि साध्य होणार नाहीं. वर्धा-योजनेचें हेंच मुख्य मर्म आहे. या मर्माकडे दुर्लक्ष करून भाराभर बौद्धिक विषय मुलांच्या डोक्यांत कोंबण्याची चिंता धरल्यानें ही योजना सफळ होणार नाहीं. आजच्या शिक्षणाधिकाऱ्यांना हीच चिंता लागलेली दिसते! यामुळें ते बौद्धिक विषयांचा उद्योगाशीं समवाय कसा साधावयाचा याचाच सारखा ऊहापोह करीत असतात! वस्तुत: कोणताहि मूलोद्योग संपूर्णतया हस्तगत कसा होईल याची चिंता या योजनेचा विचार करणारांनीं सतत बाळगिली पाहिजे. अशी चिंता बाळगणारे शिक्षणतज्ज्ञ जेव्हां निर्माण होतील तेव्हां बौद्धिक विषयांच्या समवायाचा प्रश्नच उरणार नाहीं. तो सर्वत्र सहज उलगडला जाईल.

शिक्षणासंबंधींच्या एकांगी आणि विकृत कल्पनांमुळें सध्यां सुशिक्षित वर्गांत विलक्षण विचार वावरूं लागले आहेत. आणि सुशिक्षितांच्या अंध अनुकरणानें अशिक्षित जनतेंतहि विपरीत वृत्ती पैदा होत आहेत. याचा परिणाम वर्गयुद्धासारख्या भयानक परिस्थितींत झाल्याशिवाय राहणार नाहीं. त्या परिस्थितींतून कोणताच वर्ग वांचू शकणार नाहीं ही गोष्ट विचारवंतांनीं आगाऊ ओळखली पाहिजे. वर्धा-शिक्षण-योजनेनें राष्ट्राला या आपत्तींतून वांचविण्यासाठीं एक अत्यंत व्यवहार्य मार्ग आपणांपुढें मांडलेला आहे. व्यवहार्य म्हणजे व्यवहाराला सर्व बाजूंनीं यशस्वी करणारा. व्यवहार्य म्हणजे ध्येयहीन, त्यागहीन असा

अर्थ नव्हे. उलट खऱ्या व्यवहार्य मार्गासाठीं विवेक आणि त्यागबुद्धि यांची विशेष जरूरी असते. वर्धा-शिक्षणानें आपल्या व्यवहार्यतेसाठीं अशा विवेकाची आणि त्यागबुध्दीची राष्ट्रांतील विचारवान लोकांकडून अपेक्षा करूं नये काय ?

## [ २१ ]

## वर्धा-योजना आणि इंग्रेजी भाषा

स. ज. भागवत

पुण्याच्या परिषदेंत पुढील ठराव एकमतानें मंजूर करण्यांत आला आहे:—

“ या परिषदेचें असें मत आहे कीं, हिंदुस्थानांतील अभ्यासक्रमांत इंग्रेजीचें शिक्षण फार लवकर सुरू केलें जात असल्यामुळें हिंदुस्थानांतील शिक्षणाची फारच हानि झाली आहे. तसेंच विद्यार्थ्यांना परकीय भाषेच्या द्वारा सर्व विषय शिकावयास लाविल्यामुळें त्यांच्यावर जो अन्याय होत आहे आणि त्यांची जी हानि झाली आहे ती सोडली तरी सर्व विषय देशी भाषांतून शिकविले जात नसल्यामुळें देशी भाषांची शिक्षाशक्ती देखील क्षीण झाली आहे.

“ म्हणून या परिषदेची अशी शिफारस आहे कीं, केवळ मूलोद्योगी शाळांतूनच नव्हे, तर हिंदुस्थानांतील सर्व शाळांत कोठेंहि जोंपर्यंत विद्यार्थ्यांना स्वभाषेच्या द्वारा सात वर्षें रीतसर शिक्षण मिळालें नाहीं तोंपर्यंत इंग्रेजी मुळींच शिकविलें जाऊं नये असा नियम करण्यांत यावा.

" ज्यांची इंग्रेजी ही जन्मभाषा असेल त्यांना हा नियम लागू नाहीं. "

आपणांला आपल्या राष्ट्रांतील अखिल जनतेला साक्षर आणि सज्ञान करावयाचें असेल, तिला संस्कारसंपन्न करून स्वराज्याचा कारभार चालविण्याला लायक बनवावयाचें असेल, तर आपल्या प्रांतीय भाषा आपण समृद्ध आणि सामर्थ्यवान् बनविल्या पाहिजेत. त्यासाठीं शिक्षणाचा सर्व व्यवहार प्रांतीय भाषांतूनच चालला पाहिजे. वर्धा-योजनेला हें कार्य साधावयाचें असल्यामुळें तिनें आपला सात वर्षांचा सारा अभ्यासक्रम प्रांतीय भाषांतच चालविण्याचा निर्धार केला आहे. या सात वर्षांत विद्यार्थ्यांना बौद्धिक दृष्टीनें सध्यांच्या मॅट्रिकइतका दर्जा प्राप्त करून देतां येईल असा या योजनेच्या पुरस्कर्त्यांचा दृढ विश्वास आहे. वर्धा-योजना म्हणजे केवळ प्राथमिक शिक्षणाची योजना नव्हे. सध्यां प्राथमिक आणि दुय्यम असें दोन प्रकारचें शिक्षण दिलें जातें. त्या दोनहि प्रकारांचा येथें समावेश करण्यांत आला आहे. हें सारें शिक्षण खेड्यांतील मुलांमुलींना मुक्तद्वारानें उपलब्ध करून द्यावयाचें ही महनीय आकांक्षा सिद्धीस जाण्यासाठीं प्रचलित शिक्षणपद्धतींत आमूलाग्र क्रांति घडवून आणावी लागेल.

प्रांतीय भाषांच्या मानेभोंवतीं परक्या इंग्रेजी भाषेचा प्राणघेणा पाश पडला आहे तो तोडून टाकिल्याशिवाय त्यांची वाढ होऊं शकणार नाहीं. इंग्रेजी भाषेचें महत्त्व एरव्हीं कितीहि असलें तथापि ती आपल्या देशांतील अखिल जनतेला शिकण्याची मुळींच गरज नाहीं. त्याचप्रमाणें ही गोष्ट कधींहि शक्य होणार नाहीं. आपल्या राष्ट्रावर जें परकीय आक्रमण आलें आहे त्यांतच परकीय भाषेचें

आपल्या प्रांतीय भाषांवर चाललेलें आक्रमण याचाहि समावेश होतो. स्वराज्यासाठीं अनेक प्रकारच्या चळवळी चालल्या आहेत. त्याच-प्रमाणें परकीय भाषेच्या आक्रमणाविरुद्ध प्रांतीय भाषांचा लढाहि जोमानें चालविला पाहिजे. कारण तो एक स्वराज्याचा-स्वातंत्र्याचाच-गंभीर लढा आहे.

सध्यांच्या शिक्षणपद्धतींत विद्यार्थ्याला चार वर्षें जेमतेम स्वभाषेची तोंडओळख होते न होते तोंच त्याचा परभाषेचा अभ्यास सुरू होतो. यामुळें त्याच्या बुद्धीचा संपूर्ण नाश होतो. स्वभाषेच्या दुर्बलतेमुळें त्याला परभाषेंतहि प्रावीण्य मिळवितां येत नाहीं. त्याची दोन्ही बाजूंनीं फजिती होते. दुय्यम शिक्षणाला प्रारंभापासून परभाषा आवश्यक ठेविल्यामुळें त्याच्या विकासाला वाव राहत नाहीं. याला उपाय म्हणून दुय्यम शिक्षणांतील विषय स्वभाषेंतून शिकवावे, असा सांगण्यांत येतो. बहुतेक विद्यापीठांनीं ही गोष्ट आतां मान्य केली आहे. तथापि एवढ्यानें हा लढा थांबणार नाहीं. मॅट्रिकपर्यंतचें सर्व बौद्धिक शिक्षण स्वभाषेंतून दिलें पाहिजे हें तर खरेंच; परंतु सात वर्षांपर्यंत स्वभाषेचा अखंड आणि निर्वेध अभ्यास झाला पाहिजे. तरच प्रांतीय भाषा समृद्ध आणि समर्थ होतील. यासाठीं सध्यांच्या हायस्कुलांतून पहिल्या तीन इयत्तांत इंग्रेजी भाषा शिकविणें बेकायदे-शीर ठरविलें पाहिजे. असें झालें तरच वर्धा-योजनेच्या शाळा यशस्वी होऊं शकतील. नाहीं तर वर्धा-योजनेंत इंग्रेजीचा प्रवेश करविला जाईल अथवा वर्धा-शाळांच्या वरच्या इयत्तांत बुध्दिहीन, आकांक्षाहीन अथवा अनन्यगतिक अशा विद्यार्थ्यांना शिक्षण देत बसावें लागेल ! सध्यां व्हर्नाक्युलर फायनलची जी दशा आहे तीच वर्धा-योजनेनुसार चालणाऱ्या शाळांची होईल. इंग्रेजी शिक्षणाचा

मोह शहरांतील सर्व लोकांच्या बुध्दीला खग्रास ग्रहण लावून आतां खेड्यांतील जनतेच्या बुध्दीचा ग्रास करण्यास निघाला आहे. या मोहांतून आपण आपल्या जनतेला वांचविलें पाहिजे.

प्रांतीय भाषेचे आणि भाषावार विद्यापीठांचे जे कोणी पुरस्कर्ते असतील त्यांनीं वर्धा-योजनेचें हें स्वरूप ध्यानीं घेऊन प्रांतीय भाषांच्या अभिवृद्धयर्थ वर्धा–योजनाकारांशीं उत्साहानें सहकार्य केलें पाहिजे. इंग्रेजी भाषेला आपल्या देशाच्या विशिष्ट राजकीय परिस्थितीमुळें जी नाहक प्रतिष्ठा लाभली आहे ती देशी भाषांच्या अभिमान्यांनीं प्रयत्नपूर्वक हिरावून घेतली पाहिजे. बालमनाला प्रतिष्ठेची मोठी भुरळ पडत असते. ही भुरळ नाहींशी केल्याशिवाय आपल्या जनमनाचा जोरदारपणें विकास होणार नाहीं. वर्धा–शिक्षणयोजना इंग्रेजीची प्रतिष्ठा नाहींशी करणार आहे.

स्वतंत्र भारतांत इंग्रजीला मुळींच स्थान राहणार नाहीं असा याचा अर्थ नव्हे. तिचें योग्य स्थान तिला मिळेल. ती शिक्षणांत बोधभाषा राहणार नाहीं. व्यवहारांत लोकभाषा म्हणून ती मिरवणार नाहीं. सरकारदरबारीं राजभाषा म्हणून तिचा डौल चालणार नाहीं. साहित्य. संशोधन, परराष्ट्रव्यवहार इत्यादि थोड्या पण महत्त्वाच्या क्षेत्रांत तिला मान्यता अवश्य मिळेल. सम्राज्ञी म्हणून नव्हे, पण एक समृद्ध भगिनी म्हणून स्वतंत्र भारताच्या प्रांतीय भाषा तिचा सत्कार करतील. राष्ट्रभाषा म्हणून, आंतरप्रांतीय व्यवहारासाठीं म्हणून हिंदी–हिंदुस्तानीचा स्वीकार होणार आहे. बाकी गृह्य, ग्राम्य, लौकिक, शास्त्रीय इत्यादि जीवनाच्या झाडून साऱ्या क्षेत्रांत प्रांतीय भाषाच राजमान्य आणि लोकमान्य होऊन राहतील. वर्धा–योजना स्वभाषेच्या क्षेत्रांत स्वराज्य प्रस्थापित करणार आहे.

[ २२ ]

# पुण्याची परिषद आणि प्रदर्शन

स. ज. भागवत

ऑक्टोबर २९, ३०, ३१ आणि नोव्हेंबर १ ( सन १९३९ ) या चार दिवशीं पुण्यास अखिल-भारतीय वर्धा राष्ट्रीय शिक्षण परिषदेचें पहिलें अधिवेशन झालें. राष्ट्रापुढें वर्धा-योजना आल्यापासून दोन वर्षें होऊन गेलीं. १९३७ च्या जुलै महिन्यांत राष्ट्रीय सभेनें मंत्रिपदांचा स्वीकार केल्यानंतर म. गांधीजींनीं आपल्या 'हरिजन' पत्रांतून ही योजना प्रथम राष्ट्रापुढें मांडली. त्याच वर्षीच्या ऑक्टोबर महिन्यांत वर्धा येथें गांधीजींच्या अध्यक्षतेखालीं या योजनेचा विचार करण्यासाठीं शिक्षणशास्त्री आणि शिक्षणमंत्री यांची परिषद भरून या योजनेचा सविस्तर अभ्यासक्रम तयार करण्यासाठीं जाकिर हुसेन कमिटी नेमिली गेली. राष्ट्रीय सभेच्या १९३८ च्या हरिपुरा अधिवेशनांत या योजनेला मान्यता मिळाली आणि तिच्या ठरावा-प्रमाणें एप्रिल १९३८ मध्यें 'हिंदुस्थानी तालीमी संघ' निर्माण झाला व वर्धा येथील विद्यामंदिर ट्रेनिंग स्कूलमध्यें नव्या योजनेच्या प्रयोगाला प्रारंभ झाला. गेल्या वर्ष-दीडवर्षांत हळूहळू हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत या अभिनव योजनेचा प्रयोग पसरला आहे. आज दोन हजारांवर वर्धा-पध्दतीच्या शाळा हिंदुस्थानांत निर्माण झाल्या असून कोणत्या तरी उत्पादक धंद्याच्या द्वारा बालकांना शिक्षण देण्याचा प्रयोग चालला आहे. या शाळांना शिक्षक पुरविण्यासाठीं एकूण १४ अध्यापक केंद्रें देशांत काम करीत

आहेत. शिक्षणाचें अभिनव साहित्य आणि नूतन परिभाषा देखील तयार होऊं लागली आहे.

मुंबई प्रांतांतहि वर्धा–शाळा आणि अध्यापन–केंद्रें चालू झालीं आहेत. हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ति शिक्षण–समितीनें वर्धा–योजनेचा स्वीकार केला असून त्याचें बरेंचसें श्रेय माजी शिक्षणमंत्री ना. बाळासाहेब खेर यांना आहे. त्यांच्याच प्रेरणेमुळें हिंदुस्थानी तालीमी संघातर्फे पहिली परिषद पुण्यास भरविली गेली. या परिषदेस मुंबई, मद्रास, मध्यप्रांत, संयुक्तप्रांत, बिहार आणि ओरिसा या प्रांतांतील निरनिराळ्या अध्यापन–केंद्रांतून प्रतिनिधी आले होते. दिल्लीच्या ' जामिया मिलिया ' मधून आणि काश्मीर संस्थानांतील श्रीनगर येथील अध्यापन–केंद्रांतूनहि प्रतिनिधी आले होते. याशिवाय निरनिराळ्या ठिकाणच्या वर्धा–शाळांचे प्रतिनिधी आले होते. सिंध, सरहद्दप्रांत, बंगाल, पंजाब या प्रांतांतूनहि सरकारी प्रतिनिधी उपस्थित होते. एकूण प्रतिनिधींची संख्या ११० होती. राष्ट्रीय सभेचे चिटणीस आचार्य कृपालानी यांनीं परिषद आणि प्रदर्शन यांचें उद्‌घाटन केलें आणि परिषदेचा समारोपहि केला. काश्मीरचे शिक्षणाधिकारी आणि हिंदुस्थानी तालीमी संघाचे सभासद प्रो. ख्वाजा गुलाम सय्यदैन यांनीं परिषदेचें अध्यक्षपद स्वीकारलें होतें. परिषदेंत वर्धा–योजनेला लागणाऱ्या शिक्षकांची तयारी कशी करावी, उद्योगाच्या द्वारा शिक्षण कसें द्यावें, वर्धा–योजनेच्या प्रयोगांत निर्माण होणाऱ्या आर्थिक आणि व्यवस्थाविषयक अडचणी कशा दूर कराव्या आणि वर्धा–योजनेंतलि विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्याची पध्दति कोणती असावी इत्यादि विषयांवर कित्येक महत्त्वपूर्ण निबंध वाचले गेले, भाषणें झालीं व भरपूर चर्चाहि करण्यांत

आली. सरकारी शाळा, स्वतंत्र शाळा, अभ्यास-शाळा ( Practising schools ) इत्यादि ठिकाणचे अनुभव निवेदिले गेले आणि या सर्व चर्चेंतून सर्वसंमत असे कित्येक निर्णय घेतले गेले.

परिषदेबरोबरच शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या हस्तव्यवसायाचें आणि शैक्षणिक कार्याचें एक प्रदर्शनहि भरविण्यांत आलें होतें. लोणी केंद्राची अभ्यास-शाळा आणि टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या वर्धा राष्ट्रीय शाळा यांमधील विद्यार्थ्यांच्या द्वारा वर्धा-शिक्षणपध्दतीचे पाठाचे नमुने दाखविण्यांत आले. याशिवाय वर्धा-योजनेंत प्रत्यक्ष काम करीत असलेल्या शिक्षकांनीं स्वतंत्र रीतीनें एकत्र जमून विविध प्रश्नांवर विचारविनिमय केला. परिषद आणि प्रदर्शन अत्यंत यशस्वी झालें असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. वर्धा-योजना शास्त्रशुध्द असून तिनें राष्ट्राच्या शैक्षणिक जीवनांत मोठी मौलिक भर घातली आहे ही गोष्ट स्पष्ट झाली. या योजनेंत राष्ट्राला जागृत, संघटित आणि संस्कृत करण्याची पात्रता आहे असें चांगलें दिसून आलें.

म. गांधी यांनीं आपली नवी योजना राष्ट्रापुढें मांडतांना म्हटलें होतें कीं, ही शिक्षण-योजना म्हणजे माझी राष्ट्राला शेवटची आणि सर्वांत मोठी देणगी आहे. आचार्य कृपालानी यांनीं आपल्या आधंतींच्या दोनहि भाषणांत याचा अर्थ चांगला विशद केला आहे. शिक्षण हें सामाजिक क्रांतीचें अमोघ शस्त्र आहे. सामाजिक आदर्शाकडे लक्ष ठेवूनच शिक्षणाची योजना घडविली जाते. महात्माजींनीं आपल्या राष्ट्रापुढें जो सामाजिक आदर्श ठेविला आहे त्याचा पाया सत्य आणि अहिंसा हा आहे. सत्याचा सामाजिक आविष्कार म्हणजेच न्याय आणि समता होय. समाजांत परस्परांची पिळणूक थांबली, परस्परांची भीति नष्ट झाली, स्पर्धेच्या ऐवजीं परस्पर सहकारावर

सामाजिक व्यवहार अधिष्ठित झाला, संशय आणि द्वेष यांचे जागीं विश्वास आणि प्रेम यांची प्रस्थापना झाली म्हणजे अहिंसेचा अवतार झाला. हा सामाजिक आदर्श केवळ हिंदुस्थानालाच नव्हे तर विश्वांतील साऱ्या जनतेला पाहिजे आहे. यासाठीं महात्माजींनीं हिंदी राष्ट्रापुढें चरखा-ग्रामोद्योग, मद्यपानबंदी, अस्पृश्यतानिवारण, हिंदु-मुसलमानांचें ऐक्य इत्यादि विधायक कार्यक्रम ठेविला आहे आणि असहकार, सविनय कायदेभंग व निःशस्त्र प्रतिकार हीं लढाऊ शस्त्रें दिलीं आहेत. साधेपणा, सेवाभाव आणि चारित्र्यशुद्धि हे गुण कार्यकर्त्यांत आणि पुढारीवर्गांत आवश्यक म्हणून सांगितले आहेत. गांधीजींची ही सर्व विचारसृष्टि त्यांच्या शिक्षणपद्धतींत अंतर्भूत आहे, आणि या विचारसृष्टींशीं सहमत असणारा मनुष्यच वर्धा-शिक्षण-योजना यशस्वी करूं शकेल, ही गोष्ट या वेळीं सर्वांनीं लक्षांत ठेविली पाहिजे.

[२३]

## नवीन शिक्षणक्रमांत
## शेती-शिक्षणाचें स्थान

श्री. शं. रा. भिसे, बोर्डी

शेती-शिक्षण हें नुसतें एकाद्या धंद्याचें शिक्षण नसून तें जीवनविषयक शिक्षण आहे. शेती-शिक्षणाची व्याप्ति फार मोठी आहे. गणितशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रांचा या शिक्षणाशीं फार

दृढ संबंध येतो. जसा शास्त्रांचा तसा संगीत, नृत्य व चित्रकला या कलांचा देखील संबंध या शिक्षणाशीं आहे. हें शिक्षण योग्य पद्धतीनें दिलें तर मुलांच्या सर्वांगीण विकासाला तें फारच अनुकूल व पोषक होईल.

वनस्पती व जनावरें यांच्या सहवासांत त्यांचें निरीक्षण करीत असतां मुलांच्या इंद्रियशक्तीचा विकास होत असतो. फुलांचे व पानांचे रंग, पक्ष्यांचे व पशूंचे निरनिराळे आवाज, पानांची, पक्ष्यांची व प्राण्यांची हालचाल, नाना फळांतील नाना प्रकारचे रस, पक्षी व प्राणी यांचीं पिलें व त्यांचे अत्यंत मृदु स्पर्श या सर्वांच्या मुळें नकळत त्यांचें इंद्रियज्ञान अधिकाधिक विकसित व सूक्ष्म होत जाईल.

वनस्पतींचें व प्राण्यांचें जीवन यांकडे मुलांचें लक्ष वेधल्यामुळें त्यांच्या मनांत वनस्पतींविषयीं व इतर प्राण्यांविषयीं सहानुभूतियुक्त व तर्कयुक्त कुतूहल उत्पन्न होईल. मुलांची ज्ञानलालसा अधिकाधिक तीव्र होत जाईल. सृष्टींतील सर्व पदार्थांत एकच जीवनतत्त्व आहे, एकाच प्रकारच्या जीवनक्रमांतून सर्वांस जावें लागतें, संकटाशीं व प्रतिकूल परिस्थितीशीं झगडून सर्वांसच आपलें जीवन यशस्वी करावें लागतें ह्या ज्ञानामुळें सृष्टींतील जीवनाचा एकजिनसीपणा त्यांच्या प्रत्ययास येईल व त्यामुळें त्यांच्यामध्यें प्रेम, सहानुभूति, सहकार्य इत्यादि सामाजिक गुणांची वृद्धि होईल.

सृष्टींतील सौंदर्य सर्व ठिकाणीं ओतप्रोत भरलें आहे. पण आजच्या परीक्षामय दूषित शालेय वातावरणांत त्या सौंदर्याचा आस्वाद मुलांस घेतां येत नाहीं. या नवीन शिक्षणामुळें सृष्टिसौंदर्याचा उमाप आनंद मुलांस लुटावयास मिळेल. निसर्गाच्या सान्निध्यांत मुलांच्या आयुष्यांतील बराच अधिक भाग जाईल व त्यामुळें त्यांना स्वच्छतेचे,

पावित्र्याचे व जनसेवेचे निराळे पाठ देण्याची आवश्यकता उरणार नाहीं. निसर्गाचे प्रतिनिधी आपल्या बाळांना निसर्गाच्या शाळेंत मातेच्या सहजप्रेरणेनें व चतुर शिक्षकाच्या कौशल्यानें उत्तम शिक्षण देतील.

ही सौंदर्यसमीक्षेची व आनंदानुभवाची दृष्टि जरी सोडली तरी या शिक्षणानें मुलांच्या विकासाला अवश्य असणारे अनेक गुण वाढीस लागतील. मुलांची निरीक्षणशक्ति सूक्ष्म बनेल. एकादें हातीं घेतलेलें कार्य अडचणीस न जुमानतां शेवटपर्यंत चिकाटीनें चालविण्यासाठीं लागणारी तितिक्षा व धिमेपणा त्यांच्या स्वभावांत येईल. प्रत्येक गोष्टींत कार्यकारणभाव पाहूं लागल्यामुळें त्यांची विचारशक्ति तर्कयुक्त होईल. अनेक बाबींचें वर्णन करण्याची जरूरी पडल्यामुळें ते बहुभाषी बनतील. शाब्दिक वर्णनाला चित्रकलेची जोड द्यावी लागणार असल्यामुळें त्यांना चित्रकलेंतहि कौशल्य संपादितां येईल. वनस्पतींची व प्राण्यांची जोपासना करावी लागणार असल्यामुळें ते हलगर्जीपणा टाकून देऊन कार्यदक्षता, टापटीप, वक्तशीरपणा, नेमस्तपणा, काटकसर हे गुण शिकतील. त्यांची चौकसबुध्दि जागृत झाली म्हणजे ते अधिकाधिक चिकित्सक होतील.

'वर्धा शिक्षण–योजना' बऱ्हंशीं खेड्यांतील मुलांकरितां आहे; आणि बहुजनसमाज खेड्यापाड्यांत राहात असून त्याचा जीवनाचा मुख्य धंदा शेती हाच आहे. या धंद्यांतील माहिती, आवड व सुधारणेच्या दिशेचें ज्ञान आपल्या खेडयांतील सर्व विद्यार्थ्यांना पाहिजेच. शेतीच्या धंद्यांत सुधारणा झाली तर तज्ज्ञांच्या मतें उत्पन्नाचें प्रमाण सरासरीनें दुप्पट होईल. हा केवढा बरें राष्ट्रीय फायदा होणार आहे! जाकिर हुसेन कमिटीनें पहिल्या पांच इयत्तांत शेतीच्या कामाला प्रधान व्यवसाय म्हणून मानिलेलें नाहीं तरी हें शिक्षण

इतर विषयांच्या बरोबर आवश्यक म्हणून मानिलेलें असून त्याचा अंतर्भाव 'सामान्य विज्ञान' (General Science) यांत केलेला आहे ही गोष्ट पुष्कळांच्या लक्षांत येत नाहीं. म्हणजे ज्या शाळेंत शेती हा प्रधान व्यवसाय म्हणून मानला जाणार नाहीं त्या शाळेंतहि पहिल्या पांच इयत्तांत या अभ्यासक्रमाप्रमाणें काम अवश्य केलें जाईलच.

शिक्षण स्वावलंबी झालें पाहिजे हें 'वर्धा-शिक्षण योजने' चें एक उद्दिष्ट आहे. त्या दृष्टीनें प्रयोगाला भरपूर वाव देऊन सुद्धां अनुकूल परिस्थितींत शाळेच्या शिक्षकांच्या पगारापुरतें उत्पन्न एका लहानशा दोन शिक्षकांच्या शाळेला कमविणें कठीण नाहीं असा अनुभव खात्रीनें येईल. जेथें जेथें शेती-शिक्षणाची योजना अमलांत येईल तेथें तेथें हा उत्पन्नाचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविण्याचा शिक्षकांनीं फार कसोशीनें प्रयत्न करावा.

[ २४ ]

## नूतन शिक्षण

श्री. **शं. रा. भिसे**, बोर्डी

नवीन योजनेंतील शिक्षक हा एक निगर्वी, निरलस, हुशार, व्यवहारी व दक्ष असा समाजसेवक आहे. नवीन शिक्षणाचा ग्रामीण जीवनाशीं दृढ संबंध आणला आहे. शाळा व समाज यांना जोडणारा शिक्षण हा एक बळकट दुवा आहे. जसा माळी बागेंत सर्व ठिकाणीं पाटाचें पाणी पोंचवितो त्याप्रमाणें शाळेंतून उत्पन्न होणारें पवित्र

कार्य शिक्षकानें समाजाच्या हितासाठीं सर्व ठिकाणीं पोंचविलें पाहिजे. ठराविक वेळापत्रकाप्रमाणें शाळेंत काम करून घंटा झाल्याबरोबर उपरणें झाडून बाहेर पडणारा हा शिक्षक नाहीं. याच्या कामाला वेळापत्रकाची मर्यादा नाहीं व जरूरी पण नाहीं.

शिक्षकानें आपल्या चाणाक्ष बुध्दीनें व रचनाचातुर्यानें मुलांना कार्यप्रवृत्त केलें पाहिजे. त्यांच्या स्वैर वृत्तींतून कामाचा प्रवाह निर्माण झाला पाहिजे. अनियंत्रित गतीनें वाहणाऱ्या वाऱ्यापासून जसें पवनचक्की चालविण्याचें काम आपण करून घेतों तसें. विद्यार्थ्यांना शिक्षकानें नुसतें भारवाहक बनवूं नये, तर त्यांना स्वतःला ज्ञान संपादन करितां येईल व त्यांच्या नैसर्गिक प्रवृत्तींची वाढ होईल अशी प्रेरणा त्यांना दिली पाहिजे. शिक्षक हा नुसते हुकूम सोडणारा हुकूमशहा न होतां तो एक प्रयोगशील, कष्टाळू असा कामकर्ता बनला पाहिजे.

त्याच्या महत्त्वाकांक्षेच्या पूर्तीला शाळेच्या वातावरणांत व बाहेरील जगांतहि त्याला पुष्कळ वाव मिळेल. तो जर मननशील असेल तर या कामापासून त्याच्या विचारांना प्रचंड चालना मिळेल व तो आपले विचार समाजसेवेकरितां प्रकट करील. तो जर कलावंत असेल तर कलेच्या विकासाला व समाजांत आनंदाचें वातावरण निर्माण करण्याला त्याला पुष्कळ संधि मिळेल. तो जर सेवाभावी असेल तर अखंड सेवेचें व्रत त्याच्यापुढें हजर आहेच.

अशा प्रकारच्या नवीन शिक्षकांची अभिनव भारताला जरूरी आहे.

[ २५ ]

## पदार्थसंग्रहालय

श्री. शं. रा. भिसे, बोडी

शाळेच्या जागेंत मुलांकडून एक पदार्थसंग्रहालय बनवावें. यायोगें मुलांची संग्राहकवृत्ति वाढीस लागेल. ज्या मानानें जागेची सोय असेल त्या मानानें संग्रहालयांत विभाग पाडावेत. पदार्थांची मांडणी व्यवस्थित व आकर्षक असावी. या संग्रहालयाची व्यवस्था मुलांनींच ठेविली पाहिजे; व त्यांतील वस्तू पाहून त्यांपासून माहिती मिळविण्याची संधि प्रत्येक मुलास मिळाली पाहिजे. गांवांत, नदीकांठीं, समुद्रकांठीं, डोंगरावर वगैरे ठिकाणीं सहलीसाठीं मुलांना नेलें असतांना जे जे मजेदार पदार्थ मुलांना दिसतील ते ते सर्व गोळा करण्यास मुलांना सांगावें; व त्यांतील चांगले तेवढे निवडून काढून ते संग्रहालयांत मांडून ठेवावे.

खालील प्रकारच्या वस्तू संग्रहालयांत मांडून ठेविता येतील

१ निरनिराळ्या प्रकारचे दगड २ निरनिराळ्या प्रकारची माती ३ नाना प्रकारचीं पानें व फुलें ४ नाना प्रकारचें बीं ५ नाना प्रकारच्या पक्ष्यांचीं पिसें ६ निरनिराळ्या प्रकारचें धान्य ७ नाना प्रकारचे तंतुपदार्थ ८ निरनिराळ्या प्रकारचा गोंद ९ झाडांच्या साली १० रानांतील वनस्पतींचे नमुने ११ पक्ष्यांचीं घरटीं १२ कीटकांचे कोश १३ फुलपांखरें १४ पतंग १५ कीटक १६ पक्ष्यांचीं व सर्पांचीं अंडीं १७ मेलेल्या प्राण्यांचे सांगाडे १८ पक्ष्यांचे व प्राण्यांचे भरलेले नमुने १९ कातडीं २० धातू २१ नाणीं २२ पोस्टाचीं वापरलेलीं तिकिटें २३ हस्तकौशल्याचे पदार्थ.

[ २६ ]

# व्यक्तिविकास आणि हस्तोद्योग

हस्तोद्योगांत शैक्षाणिक दृष्टीनें पुष्कळ उपयोगिता आहे असें म्हटलें जातें याला विज्ञानशास्त्राचा सबळ पुरावा आहे. चार्ल्स इलियटनें म्हटलें आहे, "अलिकडे माझी पक्की खात्री झाली आहे कीं, सुताराचीं अवजारें, किंवा हातोडा आणि ऐरण, किंवा सारंगी आणि बाजाची पेटी, किंवा पेन्सिल आणि ब्रश यांपैकीं कोणत्याहि साधनानें प्रमाणशुद्ध काम करितांना ज्या ज्ञान-तंतूंचा आणि नाडीग्रंथींचा उपयोग होतो त्यांचाच उपयोग ज्याला आपण सामान्यपणें विचार करण्याची क्रिया म्हणतों त्यांत देखील होतो."

मि. ॲलन ईटन् आपल्या 'Handi-Crafts in the Southern Highlands' या ग्रंथांत म्हणतात, "ज्ञानाच्या द्वारा आणि क्रियेच्या द्वारा जी सांस्कारिक तृप्ति मिळवितां येते ती आपणांला हस्तोद्योगांतून प्राप्त होण्याचा संभव आहे. प्रचलित शिक्षणपद्धतींत आपण बुद्धीला आणि विचारशक्तीला फाजील महत्त्व दिलें आहे आणि शिक्षणाचे दृष्टीनें क्रियेला जें महत्त्व आहे त्याकडे दुर्लक्ष केलें आहे. जीवनांत या दोन गोष्टी अलग करितां येणार नाहींत आणि त्या अलग करणें योग्यहि नाहीं. या उभयतांच्या सुभग आणि रचनात्मक संयोगाचे द्वाराच आपला विकास होतो, आपणांला नवा अनुभव मिळतो आणि आपली प्रगति होते." अर्नेस्ट हार्म्स यांनीं म्हटलें आहे, "मनुष्याच्या जीवनांत आणि मनुष्याच्या संस्कृतींत एकट्या विचाराचाच समावेश होत नाहीं, पण सौंदर्य आणि सदाचार यांच्या भावना आणि प्रेरणा यांचाहि समावेश होतो."

आणि व्यापक निरीक्षण आणि अनुभव यांचे द्वारा ते या निर्णयावर आले आहेत कीं, " माणसाच्या संपूर्ण व्यक्तित्वाचा विकास करण्याचीं जीं साधनें आहेत त्या सर्वांत गृहउद्योग आणि हस्तव्यवसाय यांपेक्षां अधिक परिणामकारक असें एकहि साधन दिसत नाहीं."

'हरिजन' वरून

[ २७ ]

## तकली–माहात्म्य

श्री. विनोबाजी

'जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती.' जेथें जाऊं तेथें ईश्वर आपली साथ सोडीत नाहीं या दृष्टीनें तकली ईश्वराची मूर्ति होऊं शकते.

ईश्वराचें दर्शन प्रकाशांत त्याचप्रमाणें अंधारांतसुध्दां सुदर होऊं शकतें. तकलीसुध्दां बाहेरच्या प्रकाशाची खास अपेक्षा राखत नाहीं. आत उजेड असला म्हणजे पुरे आहे.

ईश्वराचें मंगल नाम तुम्ही वाटेल त्या अवस्थेंत घेऊं शकतां; चालतां, बसतां, निजतां. तकलीसुध्दां त्याचप्रमाणें सार्वभौम काम देऊं शकते.

ईश्वराची प्रार्थना व्यक्तिगत त्याचप्रमाणें सामुदायिक होऊं शकते. मनांत आणील तर सबंध आश्रम एकाच वेळीं सहज तकली कांतूं शकतो.

वेदाभ्यासानेंच जर मोक्ष मिळत असेल तर कितीजण त्याची आशा राखूं शकतील? पण संतांनीं रामनामानें मोक्ष दाखविला.

त्यामुळें कोट्यवधि लोकांसाठीं तो सुलभ होऊं शकला. खादीच्या उपासनेंत तकली रामनाम मानतां येईल.

आणि रामनाम ज्याप्रमाणें सुलभ असून सुध्दां संपूर्ण शक्तिशाली आहे, त्याप्रमाणें तकली सुलभ असून सुध्दां हिंदुस्थानच्या–अथवा दुनियेच्या म्हणा–कापडाची गरज पुरी पाडण्याला समर्थ आहे. आणि तशी श्रध्दा असेल तर मोक्षदायिनी होऊं शकेल.

मला तर आई, गीता आणि तकली तिन्ही एकाच अर्थाचे शब्द भासतात.

[ २८ ]

# तकलीचे तीन योग

श्री. **विनोबाजी**

तकलींत **कर्मयोग** तर आहेच पण मला तिनें मुख्यत: **ध्यानयोग** शिकविला आहे. सहा-सात वर्षांचीं लहान मुलेंहि मुळींच न बोलतां आणि इकडे-तिकडे न पाहातां एकाग्रचित्तानें काततांना ज्यांनीं पाहिलीं आहेत त्यांना माझ्या म्हणण्याचा अर्थ लक्षांत येईल. तकलींत मला गीतेचा सहावा अध्याय मूर्तिमंत होतो.

'नई तालीम' तकलीकडे **ज्ञान–योगा**च्या दृष्टीनें पाहते. ज्ञान निराळें, ज्ञान-योग निराळा. नई तालीम नुसत्या ज्ञानावर संतुष्ट नाहीं. तिला ज्ञान-योग हवा आहे. तिची हीहि गरज तकली चांगल्या प्रकारें पुरवूं शकते.

[ २९ ]

## शिक्षणाचे तीन सिद्धांत

**बर्ट्रांड रसेल**

शिक्षणाचे निरनिराळे तीन सिद्धांत आहेत, आणि त्या तिघांचेहि पुरस्कारक आज सांपडतात. त्यांतील पहिला सिद्धांत असें मानतो कीं, शिक्षणाचा एकमेव उद्देश म्हणजे व्यक्तीला विकासाच्या संधी मिळवून द्याव्या आणि त्यांचा अटकाव करणाऱ्या प्रतिबंधांना दूर करावें. दुसरा सिद्धांत व्यक्तीला संस्कार द्यावे आणि तिच्या शक्ती जितक्या विकासित होऊं शकतील तितक्या विकासित कराव्या असें मानतो. शिक्षणाचें काम उपयुक्त नागरिक तयार करणें हें आहे असा तिसरा सिद्धांत आहे. या तीन सिद्धांतांपैकीं पहिला सर्वांत नवीन आणि तिसरा सर्वांत जुना आहे. यांपैकीं एकाहि सिद्धांत नुसताच घेतला तर तो पुरेसा नाहीं हें उघड आहे. खरी शिक्षणपध्दति या तिनहि सिध्दांतांचा शक्य तितका समन्वय करण्याकडे दृष्टि राखते.

[ ३० ]

## सूतकाम आणि समवाय

इयत्ता १ ली

**गणित :**

फाळक्यावर सूत गुंडाळतांना फेऱ्यांची संख्या मोजणें. कांतण्याकरितां दिलेले पेळू मोजणें. तकल्या, फाळके इत्यादि कताईच्या साधनांची संख्या मोजणें.

हाताचीं बोटें मोजून तकल्या, फाळके, सुताच्या लटी इत्यादि वस्तूंच्या दसकड्या करून दशकपध्दतीचें ज्ञान देणें. कवायतीचे वेळीं दहा दहा मुलांच्या रांगा करणें. कांतण्यासाठीं दहा दहा पेळूंचे पुडे करून देणें.

कातण्याच्या चढाओढींत गुण लावून, निरनिराळ्या वस्तू मोजून त्यांचे ढीग करून बेरीज शिकविणें.

कातावयाला दिलेले पेळू आणि कातून उरलेले पेळू मोजून वजाबाकी शिकविणें.

सुताची लांबी मोजून आणि कातण्यासाठीं दिलेल्या पेळूंचें वजन करून विद्यार्थ्यांना लांबी आणि वजन यांचीं परिमाणें समजूं शकतील.

सूत्र खेंचल्यानें आणि ढिलें सोडल्यानें सरळ आणि वक्र रेषांचें ज्ञान होऊं शकेल.

**टीप**: १६० अंकांपर्यंत संख्या मोजण्यालिहिण्याची कातण्या-गुंडाळण्यांत आवश्यकता आहे. कारण १६० तारांची एक लटी होते, १६ तारांची एक कळी होते. ४ फुटांएवढ्या फेऱ्याला एक तार म्हणतात.

**समाज-परिचय** :

आदिमानवाचे (पुरुष व स्त्री या दोघांचे) कपडे, पानें, साली आणि कातडीं यांच्या उपयोगापासून हळूहळू लोंकर, कापूस आणि रेशीम यांच्या उपयोगाकडे झालेली प्रवृत्ति.

निरनिराळ्या देशांतल्या स्त्री-पुरुषांचे पोषाक. अरब, एस्किमो, आफ्रिकेंतील वामनमूर्ती. थंड आणि उष्ण देशांतील पोषाक. कपड्यांची स्वच्छता.

**सामान्यविज्ञान :**

कापसाच्या झाडाच्या निरनिराळ्या विभागांचीं नांवें आणि त्यांचीं कार्यें. ऋतूंच्या बदलाबरोबर मनुष्यांच्या कपड्यांत बदल. कपडे थंडी आणि उष्णता यांपासून माणसाचें कसें रक्षण करितात? कातण्या-पिंजण्यावर हवेंतल्या दमसरपणाचा होणारा परिणाम. कापूस वेंचण्याची वेळ सकाळ. सरकीला मोड येणें.

**रेखन :**

कापसाचें झाड, फूल आणि बोंड यांच्या आकृती काढणें.

**स्वभाषा :**

मूलोद्योगांत वापरल्या जाणाऱ्या विविध साधनांचीं नांवें सांगणें. कापूस वेंचणें, पिंजणें आणि तकलीनें कातणें इत्यादिकांच्या निरनिराळ्या प्रक्रियाचें वर्णन करणें. कातण्याशीं संबंध असलेलीं लोकगीतें आणि पिकाच्या हंगामांतील गाणीं.

## इयत्ता २ री

**गणित :**

६४० तारांची एक गुंडी होत असल्यामुळें कातण्या-गुंडाळण्याचीं कामें करितांना मोठमोठ्या अंकांची ओळख करून देतां येईल. कातणें आणि गुंडाळणें हीं कामें प्रत्यक्ष करितांना बेरीज-वजाबाकी शिकवितां येईल. पेळू बनवितांना व सूत काढतांना वेळोवेळीं मोजून वजाबाकी शिकवावी. कातण्या-गुंडाळण्याच्या कामांमधून बेरीज-वजाबाकीचीं सोपीं उदाहरणें घालावीं.

मूलोद्योगाच्या अनुषंगानें मापणें आणि वजन करणें यांचा अभ्यास चालू ठेवावा, व त्याच्या द्वारें स्थानिक रूढ असलेल्या लांबी, वजन आणि नाणीं यांच्या मापनपध्दतींचा परिचय करून द्यावा.

दहा दहा, पांच पांच, दोन दोन अशा गटानें वस्तू मोजतांना विद्यार्थ्यांनीं स्वतःच पाढे रचावेत.

**समाज–परिचय :**

आधुनिक काळांतील आदिमानवाचा ( पुरुषाचा व स्त्रीचा ) पोषाक.

प्राचीन काळांतील पोषाक.

दूरच्या देशांतील पोषाक.

खेड्यांतील निरनिराळ्या वर्गांच्या लोकांचे कपडे ( पुष्कळ-थोडे, स्वदेशी-परदेशी ). पोषाकांच्या पध्दती.

**सामान्य–विज्ञान :**

कापसाच्या झाडाचा आकार आणि त्याचें परिमाण; त्याचें खोड आणि त्याची साल; त्याच्या पानाचा आकार; त्याच्या फुलाचा आकार, परिमाण आणि रंग; सरकी (कापसाचें बीं); पेरण्याचा आणि कापण्याचा हंगाम, सरकी रुजण्याला लागणारा काळ; धूळ आंत शिरू नये म्हणून कापसाचे बोळे वापरतात.

**रेखन :**

कापसाचें झाड, कापसाचें फूल यांच्या आकृति काढणें.

**स्वभाषा:**

हस्तव्यवसायांत येणाऱ्या क्रियांचें तोंडीं वर्णन. समाजपरिचय आणि सामान्यविज्ञान या सदरांखालीं वर उल्लेखिलेल्या बाबींसंबंधींचे धडे वाचनपाठांत समाविष्ट करावे.

हस्तव्यवसायांत वापरल्या जाणाऱ्या साधनांचीं नांवें ( नामें ) आणि त्यांत अंतर्भूत होणाऱ्या प्रक्रिया ( क्रियापदें ) यांचें लेखन. त्यांना अनुलक्षून लहानलहान वाक्यें लिहिणें.

—जाकिर हुसेन कमिटीच्या अभ्यासक्रमांतून.

[१]

## आमची वर्धा–शाळा

शं. धों सार्दूळ, सासवड.

वर्धा–शाळा छान, आमुची । वर्धा–शाळा छांन ।
स्वराज्य गेलें, देश बुडाला ।
त्याला तारिल जाण ॥ आमुची ॥ १ ॥
अन्न मिळेना, वस्त्र मिळेना ।
उरले नाहीं त्राण ॥ आमुची ॥ २ ॥
आळस माजे, शत्रू त्याची ।
उडविल दाणादाण ॥ आमुची ॥ ३ ॥
उद्योग करूं, तकली फिरवूं ।
सूत निघे किति छान ॥ आमुची ॥ ४ ॥
खादी त्याची बनेल सुंदर ।
हसविल हिंदुस्थान ॥ आमुची ॥ ५ ॥
गुरुजी अमुचे प्रेमळ मोठे ।
शिकविति गोष्टी गान ॥ आमुची ॥ ६ ॥
हासत खेळत शिकतों गातों ।
वेळेचें नच भान ॥ आमुची ॥ ७ ॥
पाणी शिंपुनि बाग उठवितों ।
फुलवूं सारें रान ! ॥ आमुची ॥ ८ ॥
सत्य-अहिंसा पसरिल जगतीं ।
चैतन्याची खाण ! ॥ आमुची ॥ ९ ॥

जुनाट शिक्षण जुनाट शाळा।
कितितरि दिसती म्लान ॥ आमुची ॥ १० ॥
गांधीजींची देणगी नवी।
सौभाग्याचें वाण ! ॥ आमुची ॥ ११ ॥

[ २ ]

## तकली फिरावो, आवो !

शेख हुसेन शेख चांद

**चाल :** ' तकली फिरवूं या हो '

तकली फिरावो, आवो। तकली फिरावो, आवो ॥ध्रु०॥
दाएं हाथ में पूनी ले लो
बाएं हाथ में तकली पकडो
पूनी को तकली से लगावो
आहिस्ता से ऊपर खिंचो
तार निकालो, आवो ॥ तकली...१

तार को ऊपर खिंचते जावो
खिंचो उसको और बल दे दो
इसी तरह से कातते जावो
इस तरकीब से लंबा धागा
अच्छा निकालो, आवो ॥ तकली....२

तकली पर फिर उसको लपेटो
पूरी तकली ऐसी भर दो
तकली पर का सूत निकालो
लपेटे पर उसको लपेटो
तार भी गिनते जावो ॥ तकली....३

तुम जो ऐसा सूत निकालो
बुननेवाले को वह दे दो
कपडा बुना कर वापिस ले लो
मद्रसे में उसका कुर्ता—
पहेन करके जावो ॥ तकली....४

[ ३ ]

## टकळीचें गाणें

ना. ग. केळकर

**चाल** : ' बाहुला आई । मजशीं ही खेळत नाहीं '

सुंदर कैशी । टकळी ही फिरते खाशी ॥ ध्रु० ॥

सुर सुर सुर सुर धागा निघतो
पाहुनि चित्ता मोद वाटतो
किती पहा हा जीव गुंगतो
गंमत ऐशी ॥ टकळी...१

गांधीजींनीं टकळी दिधली
आम्हांला ती बहु आवडली
एकसारखी हातीं धरली
भिंगरी जैशी ॥ टकळी...२

पेळु चांगले करूं या पुष्कळ
सूत काढूं या झरझर निर्मळ
साळीदादा विणुनी देइल
कापड-राशी ॥ टकळी...२

[ ४ ]

## वस्त्रपूर्णेचें गाणें

आसन निर्मल जागीं घालूं
बसूं ताठ त्यावरी न हालूं
धरूनि पेळू डाव्या हातीं
कातूं या रे फिरवा चाती १

एक जागीं गोल गोल ही
फिरे न बोले घे न डोलहि
छान सानुली ध्या रे हातीं
उद्योगाची मूर्तिच चाती २

अतूट कातूं या रे धागा
राखूं निर्मल अपुली जागा

सावधान फिरवूं या चाती
काढूं धागा हलक्या हातीं ३

विमल मसृण मृदु मधुर तार हा
गोदुग्धाची जणूं धार हा
चातीचा या मधुरप्यार हा
नरतनुचा या अलंकार हा ४

ऐक्याचा हा निर्मल सेतु
प्रेमाचा हा उज्ज्वल केतु
स्वातंत्र्याचा अविफल हेतु
भारतभूचा अहेव-तांथु ५

माउली वस्त्रपूर्णाही
अनंत-गुणशालिनी
स्वगुणें आमुचीं छिद्रें
झांको कल्याण-कारिणी ६

—' वस्त्रपूर्णा ' वरून

[५]

## खादी—जीवन

श्री. **मनोहर दिवाण**, वर्धा

साधी म्हणून म्हणती जन सर्व खादी
साधेपणांत दुसरी उपमा न साधी ॥

साधें तसेंच मम जीवन होय जेव्हां ।
खादी खरीच मम सार्थ ठरेल तेव्हां ॥ १ ॥
विश्वांत दर्शन-गुणेंचि पवित्रतादि ।
संतापरीच पसरी हृदयींहि खादी ॥
होईल पूत मम जीवन तेविं जेव्हां ।
खादी खरीच मम सार्थ ठरेल तेव्हां ॥ २ ॥
सर्वत्र त्याज्य गणती जगतीं श्रमास ।
प्रेमें तयास करण्या शिकवीं जनांस ॥
तो यज्ञरूप मज होइल नित्य जेव्हां ।
खादी खरीच मम सार्थ ठरेल तेव्हां ॥ ३ ॥
दुःखी, पतीत अथवा असहाय-त्याशीं ।
व्हा एकरूप हृदयें-विनवीं जगाशीं ॥
होईल जीवनचि बोध-स्वरूप जेव्हां ।
खादी खरीच मम सार्थ ठरेल तेव्हां ॥ ४ ॥
खादी वदे-सुसमता जगतांत राहो ।
शांती वसो, कलह-भेद समस्त जावो ॥
खादी परीच मम जीवनिं साम्य जेव्हां ।
खादी खरीच मम सार्थ ठरेल तेव्हां ॥ ५ ॥
स्वातंत्र्य-मूळ खलु स्वाश्रय हाच पाही ।
त्यावीण वस्त्र जगता मिळणार नाहीं ॥
खादींत स्वार्थ परमार्थ कळेल जेव्हां ।
खादी खरीच मम सार्थ ठरेल तेव्हां ॥ ६ ॥
सत्येंचि विश्व विचरे, न मुळीं असत्यें ।
प्रेमेंचि विश्व जगतें-शिकवी स्वरूपें ॥

हा थोर बोध जग हें पचवील जेव्हां ।
   खादी खरीच कृतकार्य ठरेल तेव्हां ॥ ७ ॥

खादी ! तुझें परम मंगल शुभ्र रूप ।
   पाहूनि आठवुं किती हर–विष्णु–रूप ॥
शंभू विषास पचवी, सुखवी जगास ।
   क्षीराब्धिशायि पदलांछन दीन-दास ॥ ८ ॥

खादी *गुणींच भरली दिसते समक्ष ।
   हो ओतप्रोत मम जीवन ही तसेंच ॥
'राहो अखंड गुणसंग, परी असंग'।
   खादींत गीत दिसतें भरलें अभंग ॥ ९ ॥

देह–रक्षण करो मम खादी ।
   अंतरंग शुचि हो परि आधीं ॥
अंतरंग बहिरंग शुचित्व ।
   साधणें, खचित जीवन हेंच ॥ १० ॥

## [ ६ ]

## बालवर्गांचा अभ्यासक्रम

### १ हस्तशिक्षण

**१ गुंडाळणें व पीळ देणें :** १ सुताच्या गुंड्या करणें. ही गुंडी घट्ट व सुव्यवस्थित करितां आली पाहिजे. २ वरील गुंडींतील सूत

---

* गुण=१ सद्गुणः २ सूत, दोरा.

लपेट्यावर गुंडाळणें. ( गुंडी डाव्या हातांत धरावी व लपेटा उजव्या हातांत धरावा. ) ३ सदर गुंडींतील सूत नकलीवर शंक्वाकृति गुंडाळणें. ४ तिहेरी सुताच्या गुंडींतील सुतास तकलीवर पीळ देणें. नकलीवर सूत काढण्याची पूर्वतयारी म्हणून या पीळ दिलेल्या सुताचे सुमारें १०० तार पुरेसे समजावे.

२ **पेळू करणें** : १ कापसाचे पेळू करण्याची पूर्वतयारी म्हणून कापडाच्या तुकड्यांचे पेळू तयार करणे. २ मुलांनीं प्रथम व्यक्तिशः कापसाचे पेळू तयार करावेत व ते चांगले तयार करितां येऊं लागले म्हणजे पेळू करण्याची कृति दहा मुलांनीं संघशः करावी.

३ **तकली करणें** : १ फुटक्या मडक्याचा तुकडा किंवा खापरी घेऊन तिची चकती तयार करणें. तिची त्रिज्या पाऊण इंच असावी. प्रत्येक विद्यार्थ्याकडून अशा पांच चकत्या तयार करून घेणें. २ चकतीच्या मध्यावर भोंक पाडणें. ३ तकलीचा दांडा तयार करणें. ४ चकतीच्या खालीं वर दांड्याला डिंकानें भिजविलेला दोरा गुंडाळून चकती घट्ट बसविणें. ५ दांड्याच्या वरच्या टोंकाजवळ एक खांच पाडणें.

४ **तकलीवर सूत कातणें** ( ऐच्छिक ) १ कातण्यास लायक बनलेल्या मुलांना तकलीवर सूत काढण्यास शिकविणें. एकाच वेळीं पांचांपेक्षा अधिक मुलांना सूत काढण्यास शिकवूं नये. २ तकलीवर सूत काढण्याचा सराव. ३ सांध शिकविणें. याकरितां विद्यार्थ्यांनीं प्रथम काढिलेल्या तुटक्या धाग्यांचा उपयोग करावा.

२ **स्वच्छता** : वैयक्तिक आणि सामाजिक

१ **शारीरिक स्वच्छता** : तोंड, हात, पाय, दांत, नखें, नाक, कान आणि डोळे स्वच्छ आहेत कीं नाहींत हें पाहणें व तत्संबंधींची स्वच्छता जरूर तर शाळेंत करवून घेणें.

१ मुलांना हात, पाय, तोंड धुण्यास सांगणें. २ दांतण अथवा राखुंडी यांचा उपयोग. ३ कोमट पाण्यांत मीठ टाकून त्याच्या गुळण्या करणें. ४ रोज स्नान करणें. ५ नखें काढणें व तीं स्वच्छ राखणें. ६ केंस विंचरणें. फणीचा उपयोग. ७ डोळे, कान, नाक स्वच्छ ठेवणें.

२ **कपड्यांची स्वच्छता** : मुलांचा पोषाक नीटनेटका असावा. अंगावर कपडे व्यवस्थित कसे घालावेत व कसे काढावेत हें मुलांना शिकविणें. तसेंच कपडे धुऊन त्यांच्या घड्या घालून ठेवण्यास शिकविणें.

३ **आरोग्याच्या संवयी** : १ नाकांतून श्वासोच्छ्वास करणें. २ तोंडावर पांघरूण घेऊन झोंपूं नये. ३ दारें व खिडक्या लावून झोंपूं नये. ४ बोलतांना दुसऱ्याच्या तोंडाजवळ तोंड नेऊं नये. ५ ताठ बसणें, ताठ उभें राहणें व ताठ चालणें. ६ सावकाश व चांगलें चावून खाणें. सावकाश पिणें. ७ स्नान व्यवस्थित करणें. ८ सकाळीं शौचाला जाण्याची संवय ठेवणें. ९ हातपाय स्वच्छ धुऊन मग जेवावयाला बसणें. १० नखें चावणें, पेन्सिल अगर कपडा तोंडांत घालणें इत्यादि संवयींचा निषेध.

४ **सामाजिक स्वच्छतेच्या संवयी** : १ वाटेल तेथें थुंकूं नये अगर नाक शिंकरूं नये. २ रस्त्याच्या कडेला लघ्वी करूं नये. ३. घाण पाणी वाटेल तेथें टाकूं नये. ४ जेथें नेहमीं पाणी टाकावयाची जागा असेल तेथें भाजीपाला लावावा. ५ शिवीगाळ न करणें.

५ **शिष्टाचार** : १ बोलण्याच्या आणि प्रश्नोत्तराच्या योग्य पद्धती. २ वर्गांत शिस्तीनें प्रवेश करणें. ३ योग्य द्वारानें वर्गांतून बाहेर जाणें. ४ वर्गांत नेमिलेल्या जागीं बसणें. ५ दुसऱ्याला त्रास न होईल अशा

रीतीनें बोलणें. ६ आपल्या पाळीची वाट बघणें. ७ क्रमाची किंवा पाळीनें वागण्याची आवश्यकता मुलांना दाखवून देणें. ८ आपलें शरीर आणि आपले कपडे अस्वच्छ ठेवणें हें असभ्यपणाचें आहे.

६ **व्यवस्थितपणा** : १ वस्तूंची वाटणी सारखी, व्यवस्थित व न्याय्य रीतीनें कशी करावी हें मुलांना शिकविणें. २ विद्यार्थ्यांना पाणी पिण्यासाठीं रांगेनें नेणें. ३ वर्गाच्या वस्तू गोंगाट न करितां क्रमानें वांटणें अगर परत करणें.

## ३ इंद्रिय-शिक्षणात्मक खेळ

१ मुलाचे डोळे बांधणें व आवाजावरून दुसऱ्या मुलास ओळखण्यास सांगणें. २ रिकामा डबा वाजविणें. डोळे बांधिलेल्या मुलानें रिकाम्या डब्यावर काठी मारणें. ३ निरनिराळ्या सहा रंगांच्या प्रत्येकीं चार चार चकत्या करून एकत्र मिसळल्यावर त्या मुलांना वेगवेगळ्या काढण्यास सांगणें. ४ आकृतींची रचना ठोकळे इत्यादिकांच्या साधनांनीं योग्य आकार बनविणें. ५ घन, नळाकार (सिलिंडर), गोल, शंकू, पिरॅमिड या आकृती ओळखणें. ६ वरील आकृती डोळे बांधिलेल्या मुलाला ओळखण्यास सांगणें. ७ मुलाचे डोळे बांधून त्याला वाळूवर काढिलेल्या आकृती ओळखण्यास सांगणें. ८ उष्णतामान जाणणें: थंड, कोमट आणि गरम पाणी यांतील भेद. ९ खडबडीत व गुळगुळीत पदार्थांची ओळख: खादी, रेशीम, कांच, हरतऱ्हेनें पॉलिश केलेले लाकडाचे तुकडे, पत्रे, कमीअधिक गुळगुळीत असे फरशीचे दगड. १० वजन: वेगवेगळ्या वजनांचे परंतु एकाच आकाराचे लांकडाचे तुकडे. वजनांच्या क्रमानें पांच पांच तुकडे मांडणें. ११ लांब-आंखूड, पातळ-घट्ट, रुंद-अरुंद, खोल-उथळ यासंबंधीची

कल्पना देणें. १२ चवः मीठ, साखर, तुरटी, कोयनेल इत्यादि पदार्थांची चव ओळखणें. १३ वासः मुलाचे डोळे बांधून लसूण, कांदा, हिंग, चंदन, लिंबू, तुळस, सब्जा इत्यादि पदार्थ वासावरून ओळखण्यास सांगणें. १४ गोंगाट न करितां चालणें, संघशः जाणें. वस्तू घेणें, परत करणें अगर वांटणें या क्रिया निःशब्दपणें करणें. १५ पाण्यानें कांठोकांठ भरलेलें भांडें न सांडतां नेणें. १६ लिंबू आणि चमचा यांचा खेळ. १७ चढाओढीचे खेळः तकलीवर सूत गुंडाळणें, सुताची गुंडी करणें, फाळक्यावर सूत गुंडाळणें ( ४० फूट ), गोट्या, दगड इत्यादि पदार्थ शंभरपर्यंत मोजणें, तसेंच पेळू करणें इत्यादि. १८ पशुपक्ष्यांच्या आवाजांची नक्कल करणें.

## ४ सहली व खेळ

**१ गांवांतील सहली** : १ रस्ते व बोळ यांची ओळख. २ सार्वजनिक ठिकाणें: पाणवटे, विहिरी आणि देवळें इ०. ३ शेतें : मुलांना पिकांच्या निरनिराळ्या अवस्था दाखविणें. ४ परिचित वृक्ष. ५ परिचित पक्षी. ६ गांवांतील भाजीपाल्यांचे मळे दाखविणें. ७ निरनिराळ्या कारागिरांचीं घरें व त्यांचे कारखाने दाखविणें. ८ जवळपासच्या टेकड्या, नद्या वगैरेंचें निरीक्षण.

**२ छायानिरीक्षण** : उजव्या-डाव्या बाजूला पडणाऱ्या छायेचें निरीक्षण करणें.

**३ आकाशनिरीक्षण** : ढग, सूर्य, चंद्र, तारे इ.

**४ सफाई** : १ रस्ते वगैरे स्वच्छ करण्याची आवश्यकता मुलांच्या मनावर बिंबविणें. २ दगड, कांटे, काचा इत्यादि इजा करणाऱ्या वस्तू रस्त्यावरून बाजूला काढून टाकणें.

**५ खेळ :** १ धावण्याची शर्यत, ५० यार्ड. २ तीन पायांची शर्यत. ३ लंगडी. ४ पोत्यांत पाय घालून पळणें. ५ सांघिक खेळ.

## ५ स्वभाषा

**१ संभाषण :** १ शरीराचे अवयव. २ कपडे. ३ वर्गाची खोली. ४ हस्तव्यवसाय. ५ निसर्ग : रात्र–दिवस, सकाळ–संध्याकाळ इ० ६ स्वत: बालक. ७ चित्र–वाचन.

**२ गोष्टी सांगणें :** शिक्षकानें गोष्टी सांगणें. शक्य तर मूक अभिनय करून घेणें.

**३ कविता :** सोप्या, प्रचलित अशा सुमारें दहा कविता सामुदायिक पद्धतीनें सुरावर गाणें.

**४ वाचनपाठ :** १ निरनिराळ्या बालवाचनपुस्तकांतील सोपे पाठ व सोप्या गोष्टी शिक्षकांनीं वाचाव्या आणि मुलांनीं ऐकाव्या. २ शब्द व वाक्यें शिक्षकानें उच्चारावींत व मुलांनीं त्याप्रमाणें मागून म्हणावें. मुलांच्या शुद्ध उच्चारांकडे लक्ष द्यावें.

## ६ गणित

**१ वीसपर्यंत संख्या मोजणें :** दशक शंभरापर्यंत मोजणें. दहा दहा वस्तूंच्या राशी करणें. संख्येत दशक व सुटे किती हें सांगणें.

**२ साधी बेरीज :** हातचा धरावा लागणार नाहीं अशी बेरीज करणें. ( पांचपर्यंतच्या कोणत्याहि आंकड्याची नऊपर्यंतच्या कोणत्याहि आंकड्याशीं बेरीज ). वीसपर्यंतचीं बेरजेचीं कोष्टकें शिकविणें.

**३ साधी वजाबाकी** : नऊपर्यंतच्या संख्येंतून तीनपर्यंतची संख्या वजा करणें.

**४ नाण्यांची ओळख** : रुपाया, आणा, पैसा यांची ओळख.

### ७ रेखन

१ शिक्षकानें पुठ्ठयाच्या साध्या आकृतींचे नमुने तयार करावे व त्यांच्या साह्यानें विद्यार्थ्यांनीं निरानिराळ्या आकृती काढाव्या. २ त्या आकृतींत पेन्सिलीच्या समांतर रेषांनीं छाया भरणें. ३ या आकृतींना रंग देणें. ४ या आकृतींच्या साह्यानें जमिनीवर रांगोळ्या काढणें. ५ घरगुती रंगांनीं त्यांना रंग देणें.

### ८ गायन

कविता आणि लोकगीतें सामुदायिक पद्धतीनें गाणें. अभिनय गीतें आणि साधे नाच.

[ ७ ]

## आदर्श पाठाचे नमुने

### १ चटई बनविणें

**विषय** : पिंजणासाठीं सरकटांची चटई विणून तयार करणें.

**विद्यार्थ्यांची संख्या** : बालवर्ग ४.

**साहित्य व पूर्वतयारी** : साफसूफ केलेलीं १०० सरकटें, पांच हात बांबू, हातसुताची पीळदार सुतळी वजन १० तोळे.

**वेळ** : ३० मिनिटें.

## क्रिया व समवाय-पाठ

**क्रिया :** शिक्षकानें बांबू आडवा बांधून त्यावरून चार ठिकाणीं दोर दुहेरी सोडणें आणि विद्यार्थ्यांना सरकटें कशीं बांधावयाचीं तें दाखविणें.

**समवाय : गणित**—विद्यार्थ्यांना दहा दहा सरकटें मोजून घेऊन दहा राशी करण्यास सांगणें. यांत अंक, दशक व दशकांची बेरीज येते.

**सामान्यविज्ञान**—सरकटें म्हणजे काय, तीं कोठें उगवतात, कशीं दिसतात इत्यादींची माहिती देणें. सरकटांवरून वेत, बोरू, बांबू, ऊस आणि ज्वारी, बाजरी, मका यांचीं ताटें यासंबंधीं माहिती देणें.

**समाजपरिचय**-चटयांचा उपयोग, गवताच्या रंगबिरंगी चटया बैठकीसाठीं वापरल्या जातात. त्या पुष्कळशा परदेशी-जपानी असतात. जपानांतील मुलेंमुली त्या बनवितात. सरकटांची प्रस्तुत चटई पिंजतांना वापरावी लागते. हिच्यावर माणसें बसत नाहींत. रू बसतो. रू पिंजला म्हणजे मग त्याचे पेळू बनवितात. पेळूचें सूत व सुताचें कापड बनतें. चटई ही खादीची प्रतिष्ठा आहे.

**भाषा**—साहित्य, क्रिया आणि समवायरूपानें सहज मिळालेलें ज्ञान यांचें तोंडीं वर्णन करावयास सांगणें. चटई बनविली जात असतां सर्वांनीं एकादें अनुरूप गाणें म्हणावें.

## २ रेचणें

**विषय** : सळीफळीच्या रेच्यानें कापसांतील सरकी दूर करणें.

**विद्यार्थ्यांची संख्या** : बालवर्ग ९.

**साहित्य आणि पूर्वतयारी** : कापूस ४० तोळे, फळ्या ९, सळ्या , रद्दी कागदाचे तुकडे ९, कच्चा दोरा पुडीला गुंडाळण्यासाठीं.

**वेळ** : ३० मिनिटें.

## क्रिया व समवाय-पाठ

शिक्षकानें प्रथम कापसाचीं दोन बोंडें फळीवर रेंचून दाखवावीं . मुलें स्वतः रेंचूं लागलीं म्हणजे संभाषणद्वारा माहिती सांगावी.

सरकी म्हणजे कापसाची बी. फळांमध्यें असणारे अवयव—साल बी, गर. अंबा, पेरू, सिताफळ, पपई इ. फळांच्या बियांची व इतर अवयवांची माहिती.

बियांचा उपयोग काय ? सरकीचा उपयोग काय ? सरकीपासून जनावरांना पोषण मिळतें. सरकी घातल्यानें गाईच्या दुधांत काय फरक पडतो ?

## ३ तकली-पेटी बनविणें

**विषय** : तकली आणि पेळू ठेवण्यासाठीं कार्डबोर्डची झांकणाची पेटी बनविणें.

**विद्यार्थ्यांची संख्या** : वर्ग २ रा विद्यार्थी ९.

**साहित्य व पूर्वतयारी** : कार्डबोर्ड, ब्राउन पेपर, शिसपेन्सिल, फूटपट्टी, कात्री, सुईदोरा, डिंक.

**वेळ** : ३० मिनिटें.

## क्रिया व समवाय-पाठ

शिक्षकानें स्वतः कसें कापावें तें दाखवावें. नंतर विद्यार्थ्यांकडून करून घ्यावें.

विद्यार्थी हातांनीं काम करीत असतां शिक्षकानें प्रश्नपद्धतीनें पुढील माहिती सांगावी : तकली–पेटी हें तकलीला राहण्यासाठीं लागणारें घर आहे. माणसांचीं घरें, जनावरांचीं घरें आणि पक्ष्यांचीं घरें यांची माहिती देणें. वाडा, बंगला, गोठा, घरटें इत्यादि शब्द व त्यांमधील भेद .

अनाची कल्पना देणें. कोन, बाजू इत्यादींची माहिती देणें.

[ ८ ]

## वाचनपाठ

### १ आळशी बेडकी

( इयत्ता १ ली )

श्री. **कमलाबाई कानेटकर** एम्. ए., बी. टी., लोणी.

डरांव, डरांव असा आवाज करीत एक लहानशी टुणकी (बेडकी ) बाहेर आली. तिन इकडे तिकडे पाहिलें. तिला वाटलें आपण बागेंत जाऊन एक चक्कर मारून यावें.

त्याप्रमाणें ती बागेंत गेली. तेथें नुकतीच वळवाची एक सर येऊन गेली होती. जमीन थोडीशीच भिजली होती. फिरतां फिरतां टुणकीला एक कारंजें दिसलें. त्यांतून पाण्याचे फवारे उडत होते. टुणकीला त्याची मजा वाटली. ती हौदापाशीं गेली. तेथें पुष्कळ बेडकांची सभा भरली होती. त्यांतील सर्वांत म्हातारी बेडकी आजी बोलत होती.

ती म्हणाली, “प्रत्येक बेडकीनें एका वेळेस निदान एक हजार तरी अंडीं घालावीं. इतर प्राणी आपलीं अंडीं खाऊन टाकतात.

त्यांतून उरतील तेवढ्यांचेच पुढें बेडूक होतात. तेव्हां आपणापाशीं सांठा पुष्कळ असला पाहिजे. नाहींतर आपली धडगत नाहीं. ”

त्यांतल्या ज्या शाहण्या बेडक्या होत्या त्यांनीं आजीचें म्हणणें ऐकलें व एक हजार काळीं, बारीक व वाटोळीं अंडीं घातलीं. त्या भोंवतीं चिकट रसाचा थर घातला व सर्व अंडीं एके ठिकाणीं जुळवून ठेविलीं.

आपली टुणकी आळशी होती. तिनें आजीचें न ऐकतां फक्त पन्नासच अंडीं घातलीं. तीं तशींच ठेवून किडे व पानें गोळा करण्यास ती टुणुक् टुणुक् उड्या मारीत निघून गेली.

तीन आठवड्यांनंतर अंड्यांतून बारीक बारीक बेडूक बाहेर पडूं लागले. तो आवाज ऐकून टुणकी आली व आपलीं पिलें कोठें आहेत म्हणून पाहूं लागली. तों तिला काय दिसलें ? अंडींहि नाहींत व पिलेंहि नाहींत. तिनें शेजारणीस विचारलें, “ काय ग ? माझीं येथील अंडीं तूं आपल्यांत मिसळलींस काय ? ”

शेजारीण म्हणाली, “ मी कशाला घेऊं तुझीं अंडीं ? तुझीं तीं एवढींशीं अंडीं बदकानें एका घासांत मट्ट करून टाकलीं. आजीनें सांगितल्याप्रमाणें तूं पुष्कळ अंडीं कां नाहीं घातलींस ? ”

हें ऐकून टुणकीनें हंबरडा फोडला. पुढें रोज इतर बेडूक आपलीं पिलें घेऊन हिंडत. टुणकी बिचारी एकटीच फिरे. पुढील पावसाळ्यांत मात्र असें करावयाचें नाहीं असा तिनें निश्चय केला.

## २ स्विस् मुलें

(इयत्ता २ री)

श्री. **कमलाबाई कानेटकर**, एम्. ए., बी. टी., लोणी.

हीं पहा जॉन व मेरी आपल्या अंथरुणांत पडून बोलत आहेत. खालून त्यांना गाईचें हंबरणें ऐकूं येत आहे.

"मेरी, नीज लवकर आतां. बाहेर बर्फ पडत आहेसं दिसतं" जॉन आपल्या बहिणीला म्हणाला.

"पण आज पपा (बाबा) कां बरें इतक्या वेळपर्यंत जागत आहेत?" मेरीनें विचारलें.

"आज जंगलांतून त्यांनीं एक भलं मोठं खोड आणलं आहे. तीं पाहिलीस त्यांनीं किती तरी खेळणीं केलीं आहेत तीं?"

"ती बाहुली मात्र मी घेणार हं. आणि ती पेटी तरी कशी नक्षीदार छान आहे, नाहीं?"

"अग, त्यांत काय आहे मोठंसं? मी सुध्दां मोठा झाल्यावर तुला तशा कितीतरी बाहुल्या करून देईन. परवांच नाताळांत पपांनीं (बाबांनीं) खेळणीं तयार करण्याचा एक चाकू मला बक्षीस दिला आहे."

"मला शिकवशील का रे भाऊ, तशीं खेळणीं करावयास?"

"हो हो. अगदीं जरूर. पण हें बघ मेरी, सगळीं खेळणीं कांहीं घरांत ठेवून ध्यायचीं नाहींत! त्यांपैकीं कांहीं विकून पैसे आणायचे बरं का! तेवढीच आपल्या पपांना (बाबांना) मदत!"

"खरंच भाऊ, मी सुध्दां तुला मदत करीन. पण ही थंडी केव्हां संपेल रे? उन्हाळ्यांत मग आपण डोंगरावर गवतांत खूप खेळ खेळूं, नाहीं?"

"पण आपण आतां निजूं या. मला फार झोंप यावयास लागली आहे."

असें म्हणून त्यांनीं आपणांस एका मोठया जाड कांबळ्यांत लपेटून घेतलें. दोघेंहि बहीण-भावंडें थोड्याच वेळांत गाढ झोंपीं गेलीं.

## ३ जपानी मुलें

श्री. **कमलाबाई कानेटकर,** एम्. ए., बी. टी., लोणी.

वसंत धावत धावत घरांत गेला व गडबड करून त्यानें आपल्या वडिलांस उठविलें. रविवार सुटीचा दिवस होता. वसंतचे बाबा नुकतेच जेवण करून वामकुक्षी करीत होते. तोंच वसंत आला व म्हणाला, ' बाबा, तो पाहिलात का एक अगदीं ठेंगणा मनुष्य रस्त्यावर चित्रें करीत आहे ! मला देतां कां तो शिपाई विकत घेऊन ? "

वसंतचे बाबा डोळे चोळीत उठले व त्यांनीं रस्त्यावर पाहिलें. तेथें एक जपानी मनुष्य सपीटाच्या निरनिराळ्या रंगीत गोळ्यांचीं चित्रें तयार करीत होता व लोक येतां जातां तीं चित्रें पैशा दोन पैशांला विकत घेत होते.

" अरे वसंत, तीं परदेशी चित्रें आपण कशाला घ्यावयाचीं ? मी तुला मातीचीं चित्रें कशीं करावयाचीं तें शिकवीन. "

" पण आपण कोणकोणतीं चित्रें करावयाचीं बाबा ? "

" त्याकरतां मी तुला आज जपानी खेळण्यांच्या दुकानांत घेऊन जाईन. "

वसंतचें मधल्या वेळचें खाणें झाल्यानंतर तो आपल्या वडिलांबरोबर बाजारांत गेला. तेथें एका दुकानांत खूप खेळणीं मांडलीं होतीं. त्यांत कचकड्याच्या बाहुल्या, कागदाचे पंखे, कंदील, फुलांचे गुच्छ वगैरे किती तरी सामान मांडलें होतें. किती पाहूं व किती न पाहूं असें वसंतास होऊन गेलें. इतक्यांत भिंतीवर टांगलेल्या एका चित्राकडे त्याचें लक्ष गेलें.

" बाबा, त्या चित्रांतील मुलें काय करीत आहेत ? "

“तीं जपानी मुलें जमिनीवर चटईवर बसून चहा पीत आहेत.”

“आणि त्या मुलीनें आपल्या पाठीशीं आपलें लहान भावंड पहा कसें बांधून घेतलें आहे.”

“बरं मग वसंत, तूं यांपैकीं चित्र विकत घेणार का?”

“हो. ही बाहुली द्या मला विकत घेऊन. पण उद्यां या बाहुली-सारखी मातीची बाहुली करावयास शिकवाल ना?”

मग वसंत ती बाहुली घेऊन घरीं आला. दुसऱ्या दिवशीं आपल्या बाबांच्या सांगण्याप्रमाणें त्यानें स्वतः एक मातीची बाहुली तयार केली व तिला रंग दिला. ती बाहुली पुढें त्याच्याजवळ पुष्कळ दिवसपर्यंत होती. जपानी बाहुली मात्र लवकरच चिंबून गेली.

## ८ गारुडी

( इयत्ता १ ली )

श्री. **कमलाबाई कानेटकर,** एम्. ए., बी. टी. लोणी.

नागपंचमीचा सण म्हणजे मुलांना मोठा धामधुमीचा असतो. घरोघरीं नाग आणून त्याची पूजा करण्याची धांदल सुरू असते. त्या दिवशीं घरांत कांहीं चिरावयाचें नसतें. तव्यावर भाजायचें नाहीं. तळायचें नाहीं. यामुळें महादूला फक्त उकडलेलीं दिंडेंच आज खावयास मिळालीं होतीं. पण एक नवीन पदार्थ खावयास मिळाला म्हणून महादू मोठा खुशींत होता. जेवण आटोपून तो नुकताच अंगणांत येऊन नाग करीत होता. बराच वेळ प्रयत्न केल्यावर त्याला नाग साधला एकदांचा. त्या नागाच्या फणीवर दहाचा आंकडा काढावयाचा तेवढा राहिला. महादू धावत घरांत गेला व देवाजवळचें गंध घेऊन आला. जवळच एक काडी पडली होती. त्या काडीनें

महादूनें दहाचा आंकडा काढला. इतक्यांत 'नागोबाला दूध' अशी आरोळी त्याच्या कानावर आली.

महादू रस्त्यावर आला. तेथें मुलांचा बराच घोळका जमला होता. मध्यभागीं एक गारुडी व त्याचे दोन तीन हस्तक हातांत वेताची टोपली घेऊन उभे होते. महादू त्यांच्याजवळ गेला व म्हणाला. 'चला आमच्या घरीं. आमच्या घरच्या गाईचें दूध तुमच्या नागोबाला देतों.'

गारुडी व त्याचीं माणसें अंगणांत जाऊन उभीं राहिलीं. महादूनें त्यांना दोन वाट्या दूध दिलें. तें आपल्या नागांना पाजविल्यावर त्या गारुड्यानें खेळास आरंभ केला. त्या माणसांत एक देखणा मुलगा होता. तो पुंगी वाजवूं लागला. त्याबरोबर एक काळा कुळकुळीत नाग टोपलींतून बाहेर आला व डोलूं लागला. सर्व मुलें भिऊन पळालीं. महादू तेवढा ओटीवर बसून राहिला.

कांहीं वेळानें पुंगी थांबली. नाग आपल्या टोपलींत जाऊन बसला. महादूला ती पुंगी फार आवडली.

'हा तुमचा मुलगा का हो, गारुडीबुवा ?' त्यानें मुख्य गारुड्यास विचारिलें.

'हा मुलगा नाहीं. ही मुलगी आहे.' गारुड्यानें आपल्या हेंगाड्या भाषेंत उत्तर दिलें.

'तुम्ही राहतां कुठें ?'

'आम्हीं गांवापासून लांब राहतों. आम्हांला नेहमीं जंगलांत जावें लागतें.'

'जंगलांत जाऊन तुम्हीं काय करतां ?'

'जंगलांत पुंगी वाजवीत बसतों. पुंगीनें नाग बेहोष झाला कीं, त्याला पकडतों व युक्तीनें एका गाडग्यांत धरून ठेवतों. गाडग्याचें

तोंड बांधून टाकलें म्हणजे नाग कांही गडबड करीत नाहीं. असाच एकदां जंगलांत गेलों होतों तेव्हां ही मुलगी मला सांपडली. त्यावेळीं ही अगदीं लहान होती. आतां ती माझं काम चांगल करिते.

महादूला ही हकीकत ऐकून फार आश्चर्य वाटलें. तो एकसारखा त्या मुलाच्या वेषांतील मुलीकडे निरखून पाहूं लागला. एवढ्या वेळांत त्याची आई बाहेर आली व म्हणाली, ‘महादू, या गारुड्यांना जाऊं दे आतां. आपल्या पोत्यांतले थोडे दाणे घाल त्यांना.’

दाणे घेऊन गारुड्यानें लवून सलाम केला व म्हटलें. ‘बाई, मी येथून चार मैलांवर रहातों. मला नागाचं विष उतरविण्याचा मंत्रहि माहीत आहे.’

इतकें बोलून तो गारुडी निघून गेला. महादूला मात्र त्या मुलाची पुंगी ऐकण्याची इच्छा होती.

## ९ निळूची गोष्ट

श्री. **लीलावती चाफेकर**, बी. एस्सी., बी. टी., वर्धा.

सकाळची शाळा होती. निळू उशीरा उठला. तसाच शाळेंत गेला. निळू शौचास गेला नाहीं; निळूनें तोंड धुतलें नाहीं; निळूनें डोळे साफ केले नाहींत; निळूनें अंघोळ केली नाहीं; निळूनें घाणेरडे कपडे घातले; निळू तसाच वर्गांत आला. सर्व मुलें हसूं लागलीं. गुरुजींनीं लतेकडे पाहिलें.

**गुरुजी**—लता, तूं स्वच्छतेच्या टोळीची पुढारी आहेस ना ? तुझें काम चटकन् आटप.

लता उठली. एकेकाच्या जवळ गेली. लतेनें सर्वांची नखे पाहिलीं, दांत पाहिले, डोळे पाहिले, कपडे पाहिले, केस नीट विंचरले किंवा नाहीं हें पाहिलें; अंघोळ केली किंवा नाहीं हें विचारलें.

निळूनें कांहींच स्वच्छ केलें नव्हतें. लतेनें निळूला गुरुजीकडे नेलें. सर्व मुलें गुरुजीकडे बघूं लागलीं.

गुरुजी—मुलांनो! असें घाणेरडें राहिलें म्हणजे काय होतें हें मीं तुम्हांस सांगितलें होतें ना? मग निळू, तूं कां असा आलास? तुझें घर तर अगदीं जवळ आहे. घरीं जा आणि स्वच्छ होऊन ये.

निळू घरीं गेला. थोड्याच वेळानें स्वच्छ होऊन परत आला. गुरुजींनीं फळ्यावर दोन चित्रें काढलीं होतीं; एक घाणेरड्या मुलाचें व एक स्वच्छ मुलाचें.

गुरुजींनीं मुलांना विचारलें, "मुलांनो, तुम्हांला कोणतें चित्र आवडतें?" "स्वच्छ मुलाचें चित्र आवडतें" असें मुलांनीं सांगितलें. निळू लाजला, पण पुनः कधींहि तो असा घाणेरडा शाळेला आला नाहीं.

## ६ गुहा-घर

(इयत्ता २ री)

श्री. **कमलाबाई कानेटकर,** एम्. ए., बी. टी., लोणी.

फार फार वर्षांपूर्वींची गोष्ट. सूर्याचे प्रखर किरण समुद्रावर व पृथ्वीवर पसरले होते. परंतु समुद्रांत जहाजें नव्हतीं. जमिनीवर घरें नव्हतीं. गाड्या नव्हत्या. शेतें नव्हतीं. डोंगराच्या दोन्ही बाजूंस दाट जंगल. जंगलामध्यें भयंकर प्राणी. अशा ठिकाणीं बाहेर उघड्यावर तीन मुलें खेळत होतीं. त्यांचे तांबूस चेहरे हिरव्या पानांच्या रसानें माखले होते. ते एकमेकांकडे खडे फेंकीत होते. त्यांचा बाप जंगलांत मोठमोठ्या प्राण्यांची शिकार करीत असे व त्या प्राण्यांची नक्कल करणें हें त्या मुलांना फार आवडत असे.

“मी आतां अस्वल होणार गे” त्यांच्यापैकीं लहान मुलगा ओरडला.

“पण मी थोडाच तुला घाबरणार आहे ?” त्याचा मोठा भाऊ पाय आपटीत हात हालवून बोलला. “मी एक मोठी कुऱ्हाड घेऊन तुला ठार मारतों. म्हणजे मला मेजवानी होईल.”

“मग मलाहि एक कुऱ्हाड पाहिजे” पहिला म्हणाला.

“असं कुऱ्हाड घेतलेलं अस्वल असतं का कधीं ? हें बघा कुऱ्हाड घेतलेलं अस्वल !” असं म्हणून तो मोठ्यानें हसूं लागला. त्याच्याबरोबर त्याची बहीणहि हसूं लागली.

या दोन भावांचीं नांवें जंगल्या व दऱ्या अशीं होतीं. त्यांच्या बहिणीला नांवच नव्हतें. तीं मुलें अगदीं जंगली दिसत होतीं. प्रकृतीनें धडधाकट असून तीं नेहमीं आनंदी असत. उन्हानें त्यांची कातडी लाल झाली होती. वाऱ्यानें व धुळीनें त्यांच्या केसांचें जाळें झालें होतें. त्यांनीं जनावरांचीं कातडीं पांघरलीं होतीं. त्यांचें घर डोंगराच्या खोल व खडकाळ कपारींत होतें.

त्याचें बोलणें कांहीं आपल्याला समजण्यासारखें नव्हतें. आज साऱ्या जगांत त्यांच्यासारखी भाषा कोणी बोलत नसेल. खरें म्हणजे त्यांना फारसें बोलतांच येत नव्हतें. आसपास दिसणाऱ्या वस्तूंचीं नांवेंच फक्त त्यांना माहीत होतीं. भीति वाटली किंवा राग आला तर ते कांहीं चमत्कारिक आवाज करीत. अशी त्यांची भाषा फार साधी व सोपी असे.

त्या मुलांच्या शेजारीं एक शेळी चरत होती. तिला एका कातडी पट्ट्यानें बांधलें होतें. जंगल्यानें तिच्या अंगावरून हात फिरविला व

म्हटलें. "चला आपण आपल्या बहिणीला हिच्या पाठीवर बसवून हिंडवूं."

"हो खरंच! ती एक मोठी मजा होईल!"

नंतर त्यांनीं आपल्या बहिणीला त्या शेळीच्या पाठीवर बसविलें व तिला पळण्याचा इषारा दिला. ती शेळी ताबडतोब धावूं लागली, वर बसलेल्या मुलीला फार मजा वाटली. दऱ्या टाळ्या पिटून नाचूं लागला. एकाएकीं शेळी आपल्या दोन पायांवर उभी राहिली. ती लहान मुलगी खालीं पडून गडगडत चालली. तिला दुखापत मात्र फारशी झाली नाहीं. त्या दोन मुलांनीं हंसून हंसून सगळें रान डोक्यावर घेतलें. थोड्या वेळानें त्यांनीं आपल्या रडणाऱ्या बहिणीला शांत केलें. इतक्यांत त्यांना आपल्या शेळीची आठवण झाली.

"दादा, आपली शेळी कुठें आहे? पळून तर गेली नाहींना?" दऱ्यानें घाबरून विचारिलें.

"छे रे, ती बघ वर आपल्या दारांत आहे. ती पळून कशी जाईल? आपण तिच्यावर किती माया करतों. तिला खाऊं घालतों. आपली आई तिला रोज चारा घालते."

"का रे? पण बाबांनीं तिला प्रथम जंगलांतून आणली तेव्हां ती इतकी माणसाळली नव्हती. बाबांनीं तिच्या आईला मारलें व या पिलाला जिवंत ठेविलें. ते म्हणाले, आपण या पिलाला पाळूं व जेव्हां कांहीं शिकार मिळणार नाहीं तेव्हां यालाच मारून खाऊं."

"दऱ्या, पण आपण बाबांना सांगूं कीं हिला मारूं नका म्हणून. आपणच तिला पाळूं व खेळावयास घेऊं!"

(सूचनाः—गुहेंत रहाणाऱ्या माणसाच्या आयुष्यक्रमाविषयीं विस्तृत गोष्ट सांगून वरील भाग वाचनास घ्यावा.)

[ ९ ]

# चीनचा पहिला बादशहा : फुही

श्री. **म. शि. निंबकर,** मुख्याध्यापक, लोणी.

ईजिप्त, इराण व बाबिलोनिया या प्राचीन देशांप्रमाणेंच चीन देशाहि फार जुना आहे. इतर संस्कृती लयास गेल्या, पण चीन राष्ट्र व त्याची संस्कृति अद्यापि जिवंत आहे, हेंच चीन देशाचें वैशिष्ट्य आहे. चीनचा इतिहास हजारों वर्षांपूर्वी सुरू झाला.

चिनी लोकांना कृष्ण–केशी म्हणतात. हे कृष्ण–केशी लोक चीन देशांत कोठून आले हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. कदाचित् मध्य आशियामधून ते खालीं चीन देशांत हॅंग–होच्या खोऱ्यांतून उतरले असतील किंवा मूळचेच चीनमध्यें राहणारे असतील. कांहीं असो; सुपीक, सखल जमीन, तिला पाण्याचा भरपूर पुरवठा करणाऱ्या नद्या, वाऱ्यापासून संरक्षण देणारे पर्वत व जंगलें या सर्वांचा परमेश्वरानें आपणांला पुरवठा केला आहे याची पूर्ण जाणीव या नशीबवान् कृष्णकेशी लोकांना होती. चिनी लोक शूर लढवय्ये होते. तसेंच ते कुशल कारागीर होते. या लोकांत मार्गदर्शन करणारे अनेक थोर पुरुष होऊन गेले. त्यांत कालमानानें अग्रेसरत्वाचा मान फुहीकडे जातो.

फुही कोणत्या काळांत झाला हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. इसवी सनापूर्वी तो चार पांच हजार वर्षें अगोदर आला असावा. ज्ञानकोशकारांनीं इ. स. पू. २८५२ व्या वर्षी जन्मून २७३८ व्या वर्षी मरण पावला असें लिहिलें आहे. कुटुंब करून राहण्याची मानवी पद्धति या बादशहानें सुरू केली. ‘ संहति : कार्यसाधिका ’ हें तत्त्वाहि

या कृष्णकेशी लोकांना फुहीनेंच शिकविलें. चिनी लोक शेळ्या पाळूं लागले. त्यांचा उपयोग कसा करावा हें चिनी लोकांना प्रथम फुहीनें दाखविलें. नद्यांमधून सैरावैरा स्वच्छंदानें फिरणाऱ्या माशांचा मानवी जीवनाशीं समवाय करून इतिहासांत आपलें नांव फुहीनें अजरामर करून ठेविलें आहे. याच्या मार्गदर्शकत्वाखालीं चिनी लोक लाकूड व माती यांचा उपयोग करून घरें बांधून राहूं लागले. लग्नें करून कुटुंब-वत्सल झाले आणि आपण जन्मास घातलेल्या मुलांचें पोषण करण्याची जबाबदारी त्यांच्या आयांबरोबर स्वतःच्याहि अंगावर घेऊं लागले. मुलांबाळांच्या संरक्षणाकरितां शेजारीपाजारीहि त्यांना आपलेसे वाटूं लागले आणि हळू हळू या चिनी लोकांचा समाज निर्माण झाला.

सुमारें शंभर कुटुंबांची वस्ती हो–अँग–हो नदीच्या कोपऱ्यामध्यें. म्हणजे ती काटकोन करून पूर्वेकडे वळते त्या ठिकाणीं, होऊन राहिली. या काळांत चित्र-लेखनपद्धतीचा उगम या ठिकाणीं झाला होता. सुरुवातीला ही पद्धति फारच सुगम होती. अलगूज, पडघम यांसारखीं वाद्यें वाजवून त्यांच्या मदतीनें गातां येतील अशीं गाणीं प्रचारांत आलीं होतीं. वीणावादनहि लोकांना साध्य झालें होतें. मासे मारतांना लोक गाणीं गात आणि आपलें रंजन करीत. डुक्कर, कुत्रा, घोडा, बदक, कोंबडा वगैरे प्राण्यांशीं लोकांनीं आपला स्नेहसंबंध जोडला होता.

फुहीच्या वेळीं लोकांच्या धर्मभावना पृथ्वीला चिकटून होत्या. तिच्या पलीकडे त्यांना गति मिळाली नव्हती. डोंगर, नदी यांसंबंधीं त्यांना मोठा अचंबा वाटे. नदीला पूर आला तर त्यांना आश्चर्य वाटे. हो–अँग–हो नदीला पाऊस पडत नसतां पूर येई तेव्हां हें परमेश्वरी कोपाचेंच चिन्ह आहे, असें या लोकांना वाटलें तर त्यांत त्यांचा

काय दोष ? डोंगर, आकाश, पाणी व पाषाण यांच्या देवता असून त्यांचा कोप झाला म्हणजे माणसांवर आपत्ती कोसळतात असा त्या काळीं या लोकांचा समज होता.

जगाची उत्पत्ति कशी झाली याविषयीं चिनी लोकांच्या कल्पना फार मनोरंजक आहेत. त्यांच्या मतें पृथ्वी, आकाश, पाणी, सूर्य व चंद्र यांना स्वतंत्र अस्तित्व नव्हतें. पॅनकू यानें किंकरें व हातोडी घेऊन त्यांच्या मदतीनें आकाश व पृथ्वी बनविली. परंतु हें कष्टाचें काम करतां करतां पॅनकू इतका वाढला कीं, त्याच्या डोक्यानें आकाश उंच झालें आणि त्याच्या विशाल हातांबरोबर पृथ्वी विस्तारली. सूर्याला एका हातांत व चंद्राला दुसऱ्या हातांत घेऊन पॅनकू उभा राहिला होता. आपली जगदुत्पत्तीची कार्यसिद्धि झाल्यावर पॅनकू पंचत्वाप्रत गेला. पण त्यामुळें त्याच्या कार्याला आणखी मदत झाली. त्याच्या डोक्याचे पर्वत बनले. त्याच्या श्वासोच्छ्वासाला वारे आणि ढग यांचें रूप प्राप्त झालें. त्याच्या शब्दांचें गडगडाटांत रूपांतर झालें. रक्त नदीच्या रूपानें वाहूं लागलें. हाडांचे खडक बनले व त्यांना चिकटून असलेल्या पातळ अस्थिसाराचे खनिज पदार्थ बनले.

फुहीचा या गोष्टींवर अर्थातच विश्वास नव्हता. सृष्टीच्या पाठीमागें कांहीं तत्त्व आहे, त्या तत्त्वाला धरून मनुष्यानें आपलें आचरण ठेविलें पाहिजे, असें फुहीला वाटे. लोकांना सुध्दां स्वर्गाची आणि परमात्म्याची कल्पना थोडीथोडी होऊं लागली होती. फुही स्वतः उंच डोंगरावर जाऊन तेथें देवाची पूजा करी.

# [१०]

## हांग टी आणि लिट्ट्र

श्री. **शं. धों. सार्दळ**, वाङ्मयविशारद, मासवड.

चीन म्हणून एक देश आहे. आपल्या हिंदुस्थान देशाच्या जवळच तो आहे. आपल्या देशाएवढा मोठा व आपल्या देशासारखाच तो एक फार जुना देश आहे. त्या देशांतील लोकांना चिनी लोक म्हणतात. चिनी लोकांचा पहिला मोठा बादशहा " हांग टी " हा होय. त्याच्या राणीचें नांव " लिट्ट्र. " राणी लिट्ट्रला पहिल्यानें रेशमाचा किडा सांपडला. हा किडा करंगळीएवढा असतो. तो तुतीचीं पानें खातो व आपल्याभोंवतीं गरगर फिरतो. तेव्हां त्याच्या तोंडांतून चिकट असा एक पदार्थ निघतो. हवा लागल्यावर तो घट्ट बनतो. तेंच रेशीम होय. राणी लिट्ट्र हे किडे कसे पाळावेत हें स्वतः शिकली, व नंतर आपल्या राज्यांतील सर्व बायकांनाहि तिनें शिकविलें. रेशमाच्या किड्यापासून रेशमाचे बारीक धागे काढण्याचें काम फारच नाजूक आहे. तें काम नाजूक हाताच्या बायकांनींच करावें. सोन्याच्या बारीक तंतूंसारखे रेशमाचे धागे नाजूक हातानें काढण्याचें काम सोन्यासारख्या पिवळ्या वर्णाच्या चिनी बायकांना राणी लिट्ट्र हिनें शिकाविलें. तेव्हांपासून चीन देशांत खूप रेशीम तयार होऊं लागलें; व चिनी लोकांना ' रेशमाच्या देशांतील लोक ' असें म्हणूं लागले.

राणी लिट्ट्र शाल पांघरीत असे. त्या शालीवर रेशमाचीं तऱ्हेतऱ्हेचीं फुलें व पक्षी काढल्यामुळें ती फार शोभिवंत दिसे. ही शाल पाहून राजा फारच खूष झाला, व त्यानेंहि आपल्या शालीवर रेशमाची किनार व रेशमाचे तऱ्हेतऱ्हेचे प्राणी काढून घेतले.

बादशहा हांग टी यानें चीन देशांत राज्याची स्थापना प्रथम केली, कायदेकानू निर्माण केले, लहानसान पुढाऱ्यांचा पाडाव करून सर्व देश प्रथमच एकछत्री अमलाखालीं आणिला.

हांग टीनें देशाच्या निरनिराळ्या भागांत रस्ते बांधिले, मोठमोठ्या नद्यांवरून प्रवास करितां यावा म्हणून त्यानें नौका बांधविल्या, व्यापाराच्या वाढीकरितां बाजारपेठा वसविल्या व वजनेंमापें कायद्यानें कायम केलीं.

हांग टी मोठा हौशी बादशहा होता. त्याला गाण्याबजावण्याची फार आवड होती. गायनानें करमणूक तर होतेच, पण शिवाय राज्यांत शांतता नांदण्याकरितांहि गायनकलेचा फार उपयोग होतो, असा त्याचा समज होता. म्हणून त्यानें आपल्या राज्यांतील लोकांना गायनकलेंत प्रवीण केलें, वादनाकरितां निरनिराळीं वाद्यें बनविलीं व आंधळ्यांना वाद्यें वाजविण्यास शिकविलें. त्याच्या राज्यांत पुष्कळ गरीब आंधळे होते. शेतांत धान्य पेरतांना व कापणी करितांना सुद्धां लोक नाना प्रकारचीं वाद्यें वाजवीत व गाणीं म्हणत !

हांग टीच्या दरबारांत मोठमोठे ज्योतिषी होते. ते आकाशांतील तारकांचा अभ्यास करून पंचांग तयार करीत. त्याच्या पदरीं इतिहासकार होते. ते त्याच्या कारकीर्दीतील रोजच्या घडामोडींची हकीकत लिहून ठेवीत. ते त्या वेळीं बांबूच्या किंवा लाकडाच्या फळीवर लिहीत. कारण त्या वेळीं कागद नव्हता. कागदाचा शोध पुढें प्रथम चीन देशांतच लागला. तुम्ही लिहितांना अक्षरें काढितां, पण चिनी लोक त्या वेळीं चित्रांत लिहीत. ⊙ याचा अर्थ सूर्य. △△△ म्हणजे पर्वत. † म्हणजे मूल. ।।। म्हणजे नदी. अशा चित्रलिपींत हांग टीच्या वेळीं लिहीत असत. हांग टीच्या पूर्वी चिनी लोकांचे दोन

मोठे पुढारी झाले. पहिला ' फुही ' व दुसरा ' शेन्नूंग. ' पण टी म्हणजे बादशहा ही पदवी त्यांना नव्हती. हांग टीला ' पिवळा बादशहा ' म्हणत. कारण तो पिवळ्या वर्णाचा होता. सर्वच चिनी लोक पिवळ्या वर्णाचे आहेत.

[ ११ ]

## कृषिकर्मकुशल शेन्नूंग

श्री. **शं. धों. सार्दूळ,** वाङ्मयविशारद, सासवड.

चीन देश हिंदुस्थान देशाप्रमाणेंच एक मोठा कृषिप्रधान देश आहे. चिनी लोकांना रानटी अवस्थेंतन बाहेर काढून प्रथम ज्यानें त्यांना जमिनीची मशागत करावयाला शिकविलें, जमिनींतून धान्य उत्पन्न करावयास शिकविलें व शेतकरी बनविलें असा त्यांचा मोठा नेता शेन्नूंग हा होय. चिनी लोकांचा पहिला मोठा पुढारी फुही. त्याच्यानंतर हजारों वर्षांनीं शेन्नूंग हा पुढारी त्यांना लाभला. फुहीच्या वेळीं चिनी लोक रानावनांतून भटकत होते. शेन्नूंगनें धरणीमातेच्या उत्पादनसामर्थ्याची ओळख करून दिल्यावर त्यांच्या भटक्या जीवनाचा अंत झाला. ते आतां घरेंदारें करून राहूं लागले. शेतीभाती करूं लागले. सुखासीन कौटुंबिक जीवनाचा आस्वाद घेऊं लागले. त्यांनीं मोठमोठीं खेडीं वसविलीं व आपला आवडता नेता शेन्नूंग याची मूर्ति पूजास्थानीं बसविली.

चीनच्या आग्नेय विभागांत जगप्रसिद्ध सुपीक क्षेत्रें आहेत. त्याच ठिकाणीं चिनी लोकांच्या पहिल्या वसाहती झाल्या. या सर्वोत्कृष्ट

सुपीक भूमीनें आज हजारों वर्षें चिनी राष्ट्राचें पोषण केलें आहे. हजारों वर्षें भाजली-नांगरली जाणारी ही भूमि आज सुद्धा वर्षांतून दोन पिकें देते. चिनी लोकांची ही अन्नदात्री भूमाता पीतवर्णाची आहे. माता पिवळी तर तिच्या अंगावर खेळणारी तिची कन्या हांग नदीहि पिवळी, व या नदीचें ज्या सागराशीं मीलन होतें तो तिचा पतीहि पिवळा ! त्याचें नांव पीतसमुद्र.

शेन्नूंग हा कृषिकलेंत अत्यंत निष्णात होता. त्याला "दिव्य कृषीवल" ( Divine farmer ) अशी संज्ञा दिलेली आहे. त्यानें चिनी लोकांना तत्कालीन जगांत पहिल्या दर्जाचे शेतकरी बनविले. युरोपियन लोक ज्यावेळीं जमिनीच्या उत्पादनशक्तीसंबंधीं गाढ अज्ञानांत होते त्यावेळीं चिनी लोक कृषिकर्मांत कुशल होते. त्यांनीं शेतीकरितां नाना प्रकारचीं खतें तयार केलीं. शेतांतून पाणी खेळविण्याकरितां नद्यांना मोठमोठे कालवेहि काढले. पेरणीच्या व कापणीच्या वेळीं चिनी शेतकरी विविध वाद्यें वाजवून गात. तीं वाद्यें व कृषिगीतें शेन्नूंग यानेंच शेतकऱ्याचे श्रम हलके करण्याकरितां तयार केलीं होतीं.

शेतकरी बनल्यावर चिनी लोकांची विलक्षण वाढ व भरभराट झाली. ते हांगहोच्या दऱ्याखोऱ्यांतून पसरत चालले. शेन्नूंगच्या कुशल नेतृत्वाखालीं त्यांनीं हळूहळू सर्व चीन देश व्यापून टाकिला. मोठमोठीं अरण्यें व जंगलें तोडून तेथें त्यांनीं कृषिक्षेत्रें निर्माण केलीं व सुंदर खेडीं उठविलीं. मैदानें व टेकड्या, त्यांवर हालणारे वृक्ष व डुलणारीं बांबूचीं बेटें आणि त्यांमधून डोकावणारीं नयनमनोहर खेडींपाडीं यांनीं सर्व चीन देश लवकरच गजबजून गेला. त्या खेड्यांतील झोंपड्यांपुढें कोंबडीं आरवत आहेत, कुत्रीं भुंकत आहेत व शेतकरी शेतांत काम करितांना गाणीं गात आहेत असा हा समाजनिर्मितीच्या प्रारंभकालांतील देखावा

चीन देशांत प्रथमतःच कृषिकर्मकुशल शेन्नूंग याच्या कारकीर्दीत दिसूं लागला.

[ १२ ]

## चीनचा आदर्श सम्राट : येवो

श्री. शं. धों. सादळ, वाङ्मयविशारद, सासवड.

'येवो' हा चिनी लोकांचा दुसरा मोठा बादशहा होय. त्याच्यावर चिनी लोकांचें पित्याप्रमाणें प्रेम होतें. 'स पिता पितरस्तासां केवलं जन्महेतव:' असें कालिदासानें दिलीप राजाचें जें वर्णन केलें आहे त्याप्रमाणें येवो हा आपल्या चिनी प्रजेचा पिताच होता. राजा हा परमेश्वराचा प्रतिनिधि आहे अशी चिनी लोकांची समजूत होती; व येवोची वागणूकहि परमेश्वराच्या प्रतिनिधीला साजेशीच होती.

"मनुष्यप्राणी हा मुळांत हाडाचा दुष्ट नसून सच्छील असाच आहे. तो गरजू बनून दुःखी होतो त्याच वेळीं त्याच्या ठिकाणचा चांगुलपणा नष्ट होऊन तो गुन्हा करण्यास प्रवृत्त होतो" असें चिनी लोकांचें मत होतें. येवोचा राज्यकारभारच इतका न्यायी आणि शहाणपणाचा होता कीं, त्याच्या राज्यांत प्रत्येकाला पुरेसें काम मिळे, त्यामुळें पुरेसें अन्नवस्त्रहि मिळे. अर्थात् खून किंवा दरवडे यांसारखे गुन्हे लोकांच्या हातून होत नसत. चिनी लोक फार सुखांत होते.

येवो ज्या राजवाड्यांत राहात असे तो अगदीं साधासुधा, विटा-बांबूंचा व त्याच्या प्रजाजनांच्या घरांहून फारसा भिन्न नव्हता. आपली प्रजा झोपड्यांतून राहात असतां राजानें भव्य प्रासादांत चैनीनें

राहाणें यांत राज्याचा नाश आहे असें तो मानीत असे. महात्मा गांधी एक लहानसा खादीचा पंचा गुंडाळतात व खादीचें एक फडकें अंगावर घेतात याचें कारण हेंच आहे. हिंदुस्थानांतील गरीब शेतकऱ्यांना जेवढा कपडा मिळतो तेवढाच ते परिधान करितात. ते दरिद्री नारायणाचे खरेखुरे प्रतिनिधी आहेत. राजा काय किंवा पुढारी काय जनतेशीं इतका समरस होईल तेव्हांच त्याच्यावर जनतेचा विश्वास बसतो व त्याच्याच हातून जनतेची खरी सेवा होते.

येवोनें आपल्या राजवाड्याच्या प्रवेशद्वारावर एक लाकडी ' फळा ' व एक ' ढोल ' टांगून ठेविला होता. प्रजेपैकीं एकाद्याला राज्य-कारभारांत एकादी सुधारणा सुचवावयाची असेल अगर एकाद्या अन्यायाची दाद मागावयाची असेल तेव्हां तो त्या फळ्यावर आपली सूचना अगर तक्रार लिही आणि ढोलावर काठी मारून निघून जाई. ढोलाचा आवाज ऐकतांक्षणीं बादशहा येवो याचा माणूस तेथें धांवत येई व तो फळा बादशहाकडे घेऊन जाई. मोगल बादशहा जहांगीर यानें सुद्धां याच हेतूनें आपल्या राजवाड्याच्या प्रवेशद्वारावर एक घंटा टांगून ठेविली होती. अशा रीतीनें आपल्या राज्यांत काय चाललें आहे व प्रजेच्या अडचणी काय आहेत याची खबर तावडतोब मिळविण्यांत येवो नेहमीं दक्ष राही. प्रजेच्या परिस्थितींत राजाचा राज्यकारभार प्रतिबिंबित होतो याची येवोला पूर्ण जाणीव होती. " माझ्या प्रजेला थंडीची अगर भुकेची बाधा होत असेल तर तो माझा दोष आहे. माझ्या प्रजेची गुन्हे करण्याकडे प्रवृत्ति होत असेल तर मी स्वतःच गुन्हेगार आहे " अशी येवोची भावना होती. " राजा प्रकृति-रंजनात् " प्रजेचें अनुरंजन करतो तोच राजा. येवो म्हणजे राज-धर्माच्या ह्या उदात्त कल्पनेची साक्षात् मूर्तिच होती.

राज्याचें बंधन अगर राज्यकारभाराचा ताप ज्या मानानें कमी त्या मानानें प्रजा जास्त सुखी. प्रजेला कायद्यानें जखडून टाकणें हें सुराज्याचें लक्षण नव्हे. उलट शासनसंस्थेचा कारभार असाच पाहिजे कीं, आपल्यावर कोणाचेंच राज्य नाहीं असें प्रजेला वाटावें. चिनी लोकांची हीच भावना होती, व येवोचेंहि तसेंच मत होतें. एक दिवस येवो राज्यांत प्रवास करीत असतां एका ओढ्याच्या काठीं आला. तेथें एक म्हातारा माणूस मासे मारीत व गात बसला होता. खालील गाणें तो म्हणत होता :

प्रभातकालीं उठतों आम्हीं प्रफुल्ल मनिं होतों ।
सायंसमयीं दिवस संपतां विश्रांती घेतों ॥
कुदळी घेउनि वापी खणतों पाणी छान पितों ।
शेत नांगरुनि धान्य काढितों क्षुधा शांत करितों ॥
खाउनि पिउनी ढेंकर देतों आनंदें गातों ।
राजदंड तो कुठें असो परि चिंता नच धरितों ॥

हें गाणें ऐकून येवो फार खूष झाला. आपल्या प्रजेला आपल्या राज्यकारभाराचें बंधन तापदायक तर नाहींच पण जाणवतहि नाहीं व त्यांना स्वातंत्र्याच्या सुखाचा खराखुरा आस्वाद मिळत आहे हें पाहून त्याला फार समाधान वाटलें.

येवोच्या राजवटींत चीन देशावर एक मोठी आपत्ति कोसळली. हांगहो नांवाची एक प्रचंड नदी चीनमधील पिवळ्या क्षेत्रांतून शेंकडों मैल वाहाते. फार भयंकर नदी आहे ती ! एकदां तिला महापूर आला. शेतें व खेडीं वाहून गेलीं. हजारों लोक घरेंदारें वाहून गेल्यामुळें निराश्रित झाले. प्रजेवर कोसळलेल्या या दैवी आपत्तीमुळें येवोचें मन व्याकुळ झालें. आपल्या सल्लागार मंत्र्यांना त्यानें बोलाविलें

व सांगितलें, "माझ्या प्रिय प्रजेला या संकटांतून सोडवील असा एखादा पुरुष शोधून आणा." मंत्री म्हणाले, "महाराज, चिंता कां करितां? राजपुत्र चू चांगला बुद्धिमान् आहे. तो हें काम करील." राजानें उत्तर दिलें, "चू बुद्धिमान् आहे खरा, पण कधींहि खरें बोलत नाहीं व लोकांशीं भांडतो. म्हणून तो या कामाला नालायक आहे!" दुसऱ्या एकानें सुचविलें, "आपला उद्योगमंत्री फार हुशार म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्याकडे हें काम सोंपवा." राजा म्हणाला, "तो गप्पा मोठमोठ्या मारतो पण बोलतो तसा चालत नाहीं. नम्रपणाचा मोठा आव आणतो पण तो अत्यंत गर्विष्ठ आहे. तोहि कुचकामाचा आहे." येवो माणसांची पारख करण्यांत मोठा तरबेज होता. अखेरीस त्यानें यू नांवाच्या एका तडफदार व चारित्र्य-संपन्न तरुणाची या अत्यंत महत्त्वाच्या कामावर नेमणूक केली. यूनें रात्रंदिवस खपून महापुराच्या संकटांतून चिनी लोकांची मुक्तता केली. राजा येवो याची चिंता दूर झाली.

देशाचा कारभार करितां करितां येवो अगदीं म्हातारा झाला. राज्यकारभाराचा भार त्याला आतां सहन होईना. म्हणून त्यानें शन् नांवाच्या एका होतकरू तरुण माणसाला आपला मुख्य प्रधान केलें. शन् यानें आपली कामगिरी चोख बजाविली. त्यामुळें येवोचे शेवटचे दिवस सुखासमाधानांत गेले. येवो मरण पावल्यावर त्याच्या इच्छेनुसार शन् याला चीनच्या गादीवर बसविण्यांत आलें. राज्याचा वारसा वंशपरंपरेनें राजपुत्राकडे देण्याची मूर्खपणाची चाल चीन देशांत नव्हती. योग्य व लायक माणसाचीच राज्यसिंहासनावर प्रस्थापना होई. शन् हा एका सामान्य कुटुंबांत जन्मला असला तरी अत्यंत कर्तृत्ववान् व राज्यकार्यधुरंधर असा होता. येवोनंतर त्याची कारकीर्द प्रजेला अत्यंत सुखावह अशीच झाली.

[ १३ ]

## शांतिदूत शन्

प्रा. **शं. धों. सार्दळ**, वाङ्मयविशारद, सासवड.

चिनी इतिहासाच्या पौराणिक काळांतील शेवटचा बादशहा शन् हा होय. याचा जन्म एका गरीब शेतकऱ्याच्या कुटुंबांत झाला होता. तो स्वतः हातांत नांगर धरून शेती करी, रानांत जाऊन लाकडें तोडी, नदींत मासे मारी व नदीच्या कांठची माती गोळा करून त्याचीं भांडीं बनवी. अशा रीतीनें आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह करणारा एक गरीब शेतकरी, रंकाचा राव कसा झाला—नांगर धरणाऱ्या हातांत चीनसारख्या एका प्रचंड देशाचा राजदंड कसा आला—ही गोष्ट अद्‌भुतरम्य असून बोधप्रदहि आहे.

शन्‌चा बाप आंधळा असून हेकट स्वभावाचा, तर सावत्र आई अत्यंत गर्विष्ठ आणि आपल्या सावत्र मुलाचा पूर्ण तिटकारा करणारी! अशा प्रतिकूल कौटुंबिक परिस्थितींतहि शन् हा संयम राखून आपली शांति ढळूं न देतां कुटुंबाची जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडीत असे. त्याच्या वेळीं चीनमध्यें हिंदुस्थानप्रमाणेंच एकत्र कुटुंबपद्धति होती. चिनी कुटुंब म्हणजे एक छोटेखानी संस्थानच शोभे! प्रत्येक कुटुंबाची स्वतंत्र अशी वसाहत असे. आजोबा, आजी, आईबाप, मुलगे, सुना आणि नातवंडें यांनीं कुटुंबाची वसाहत नेहमीं गजबजलेली दिसे. कन्या पतिगृहीं जात त्यांची जागा सासरीं आलेल्या सुनांनीं भरून निघे. इतर कोणाला कुटुंब सोडण्याचा प्रसंग क्वचितच येई. कुटुंबांतील प्रत्येक माणूस वृद्ध कुटुंबाधिपतीची आज्ञा शिरसावंद्य मानी. वृद्धांची सेवा, कनिष्ठांची काळजी, समवय-

स्कारशीं बंधुभाव अशा कौटुंबिक भावनांचा परिपोष चिनी कुटुंबांत उत्कृष्ट रीतीनें होत असे. मृतांचे श्राद्धपक्ष करण्याची चालहि चीन देशांत पुरातन काळापासून आहे. कौटुंबिक भावना दृढ करण्याचाच उद्देश या चालींत दिसून येतो. आपल्या कुटुंबाचा कारभार ज्याला उत्कृष्ट रीतीनें चालवितां येतो, कुटुंबांत ज्याला शांति आणि सौख्य नांदवितां येतें तोच मोठमोठ्या राज्याचा कारभार करण्यास पात्र ठरतो अशी चिनी लोकांची भावना आहे. शन् याचें कुटुंब फार मोटें होतें. तें त्यानें इतक्या उत्तम रीतीनें चालविलें कीं, एक आदर्श कुटुंबचालक अशी त्याची कीर्ति जिकडे तिकडे लवकरच पसरली. बादशहा येवो याच्या कानावर ती गेली व येवोनें त्याची कसोटी पाहण्याचें ठरविलें.

बादशहा येवो यानें आपल्या दोन सुंदर कन्या शन्कडे कन्यादानाच्या हेतूनें पाठविल्या ( चीनमध्यें बहुपत्नीकत्वाची चाल आहे ). शेतकरी शन् यानें राजकन्यांचा अर्थातच मोठ्या प्रेमानें व आदरानें स्वीकार केला. त्या कुरंगनयना गळ्यांत निवळ हळकुंड बांधून आलेल्या नव्हत्या. तें सालंकृत कन्यादान होतें. शिवाय आंदण म्हणून गुरें–मेंढरें व विपुल धनधान्य यांचाहि स्वीकार करणें शन् याला भाग पडलें !

अशा रीतीनें शन् यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें एकाएकीं वैभवसंपन्न झाला ! पण त्याचें वैभव जसजसें वाढूं लागलें तसतसा त्याच्या कुटुंबांतील कांहीं मंडळींचा मत्सरहि वाढूं लागला ! कांहींचा मत्सराग्नि इतका भडकला कीं, त्यांनीं त्याच्या राहत्या घराला आग लावून त्याला ठार करण्याचा प्रयत्न केला ! तो प्रयत्न निष्फळ झाल्यावर एकदां शन् विहीर उपसून साफ करण्याकरतां विहिरीच्या तळाशीं उतरला असतां त्याच्यावर दगडमातीचा वर्षाव करून त्याला

गाडून टाकण्याचा प्रयत्न करण्यांत आला. शन्‌ला विहिरींत एक भुयार सांपडलें त्यांतून तो निसटून गेला! स्वतःच्या प्राणावर घाला घालण्याचा प्रयत्न करणाऱ्या भाऊबंदांसंबंधीं शन्‌नें सूडबुद्धि धरली नाहीं. सियांग नांवाचा त्याचा एक भाऊ एक दिवस त्याला जगांतून नाहींसा करण्याच्या उद्देशानें त्याच्या खोलींत शिरला. शन् वीणा वाजवीत बसला होता. निर्वैर व सात्त्विक वृत्तींचें तेज त्याच्या चेहऱ्यावर झळकत होतें. सियांगवर त्याचा परिणाम झाला. त्याचा दुष्ट हेतु गळून पडला. "तुझी खुशाली विचारण्याकरतां आलों होतों" सियांग शरमून म्हणाला. शन् समजला! पण त्यानें सियांगला शब्दानेंहि दुखविलें नाहीं! यानंतर मात्र भाऊबंदांनीं त्याला मारण्याचा नाद सोडून दिला.

शन्‌च्या सहवासांत राजकन्यांच्या जीवनाचा झपाट्यानें विकास होत चालला होता. त्यांनीं आपल्या पतीची ज्याप्रमाणें एकनिष्ठपणें सेवा केली त्याचप्रमाणें सासूसासऱ्यांचीहि मनोभावें सेवा केल्यामुळें शन्‌च्या सावत्र आईची वृत्ति बदलली. शन्‌च्या कुटुंबांत प्रेम व सौख्य नांदूं लागलें. बादशहा येवो याच्या कसोटीला शन् आतां पूर्णपणें उतरला. येवोनें त्याला दरबारांत बोलाविलें व मुख्य प्रधानाचीं वस्त्रें व जबाबदारी त्याच्या अंगावर टाकिली! मुख्य प्रधान झाल्याबरोबर येवोनें त्याला पहिली कामगिरी सांगितली कीं, 'शांततेनें व सुखा-समाधानांत कसें रहावें याचें शिक्षण देशांतील सर्व कुटुंबांना दे.' शन्‌नें देशभर दौरा काढून शांततेचा संदेश चीनमधील प्रत्येक कुटुंबांत पोंचविला. राज्यांतहि सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें. चीन देशाची भरभराट होऊं लागली. या सर्वांचें श्रेय शांतिदूत शन् यालाच दिलें पाहिजे.

ंतप्रधान म्हणून कित्येक वर्षे शन् यानें कारभार केल्यानंतर लवकरच बादशहा येवो निधन पावला. येवोच्या निधनानंतर शन यानें स्वतः आपण होऊन राज्यसिंहासनाची अभिलाषा धरली नाहीं. येवोचा पुत्र चू याच्याकरितां त्यानें सिंहासन मोकळें केलें! पण प्रजेच्या हृदयसिंहासनावर शन्‌ची स्थापना केव्हांच होऊन गेली होती. तेथें चूला थारा नव्हता. अर्थात् प्रजेच्या इच्छेला व विनंतीला मान देऊन व जनतेची इच्छा मानून शन् ताबडतोब सिंहासनारूढ झाला. अशा रीतीनें नदीत मासे मारणारा व नांगर धरणारा पूर्वीचा गरीब शेतकरी शन् चीनच्या भव्य साम्राज्याचा पालक व मालक बनला.

राज्याचीं सूत्रें हातीं घेतल्यावर शन् यानें प्रथम राज्यकारभाराची निरनिराळीं खातीं पाडून शिवाजीप्रमाणें अष्टप्रधानांची नेमणूक केली. तो म्हणे. " ज्याप्रमाणें हात, पाय, डोळे व कान हीं इंद्रियें मनाची हुकमत मानून त्याची सेवा करितात त्याचप्रमाणें प्रधान राजाची हुकमत मानून त्याची सेवा करितात. अर्थात् मानवी शरीरांत हस्तपादादि इंद्रियांना जें महत्त्व तेंच राज्यरूपी देहांत प्रधनांना आहे. " शन् यानें प्रधानांच्या कार्याचें महत्त्व ओळखून ( १ ) उद्योग-मंत्री ( २ ) शिक्षणमंत्री ( ३ ) जंगलमंत्री ( ४ ) कृषिमंत्री ( ५ ) पुरातन-मंदिरमंत्री ( ६ ) गायनमंत्री ( ७ ) दळणवळणमंत्री व या सर्वांवर ( ८ ) मुख्य मंत्री अशा अष्टप्रधानांची योजना केली. त्यामुळें राज्यकारभारांत शिस्त आली व राज्याची सुधारणा भराभर होऊन प्रजा सुखासमाधानांत आणि शांततेंत कालक्रमणा करूं लागली, व शन्‌ला धन्यवाद देऊं लागली. अशा रीतीनें प्रजेचे धन्यवाद कित्येक वर्षें घेतल्यावर शन् यानें इहलोकींची यात्रा संपवली. शन्‌च्या

निधनाची वार्ता पसरतांच देशभर शोकसागराच्या लाटा उसळूं लागल्या. शन्च्या मृत्यूनंतर तीन वर्षें प्रजेनें रंगीत कपडे अंगावर घातले नाहींत, कीं गळ्यांतून गाण्याचा सूर काढला नाहीं! वीण्यांच्या तारा गंजून गेल्या. शन् रंकाचा राव कसा झाला यासंबंधाच्या रम्य कथा चिनी आया मुलांना सांगत व मुलें कान टवकारून ऐकत. मुलांपुढेंच काय पण सर्व जगापुढें जीवनाचा स्पृहणीय आदर्श शन् यानें ठेवून दिला आहे.

[ १४ ]

# हिब्रू लोकांचा आदिपुरुषः अब्राहाम

श्री. **म. शि. निंबकर**, मुख्याध्यापक, लोणंा.

ख्रिस्तापूर्वी हजारों वर्षें आपल्या इकडे ऋषिमुनींनीं 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति' हा अद्वैताचा शोध लाविला होता. इतर संस्कृतींमध्येंहि एकेश्वरीवादाच्या कल्पना ख्रिस्तपूर्व एक हजाराच्या सुमारास डोकावूं लागल्या होत्या. या कल्पनांच्या उत्पादकांत **अब्राहाम** याचें चरित्र प्रसिद्ध आहे.

खाल्डिया प्रांतांत अब्राहामचा जन्म झाला. याच्या बापाचें नांव तेराह. नाहोर आणि हरान या नांवांचे त्याला दोन भाऊ होते. हरानच्या मुलीबरोबर म्हणजे आपल्या पुतणीबरोबर नाहोरचें लग्न झालें. अब्राहामच्या पत्नीचें नांव सारा.

लहानपणापासूनच अब्राहामचे एकेश्वरी मताविषयीं क्रांतिकारक विचार बनले होते. त्याच्या बालवयांत घडलेले म्हणून कांहीं प्रकार वर्णिलेले आहेत. त्यांपैकीं थोडे येथें देतों.

अब्राहामचा बाप त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें मूर्तिपूजक होता. एवढेंच नव्हे, तर तो स्वत: मूर्ति बनवून विकीत असे. त्याचें निर्वाहाचें हेंच साधन होतें म्हटलें तरी चालेल. एकदां अब्राहामचा बाप तेराह कांहीं कामाकरितां बाहेर गेला आणि दुकानांत ज्येष्ठ चिरंजीव अब्राहाम यास बसण्याची पाळी आली. यावेळीं एक म्हातारा मूर्ति विकत घेण्याकरितां आला आणि त्यानें एक मूर्ति पसंत करून तिची किंमत काय म्हणून अब्राहामला विचारलें. अब्राहामनें सरळ किंमत न सांगतां त्या वृद्धाला विचारिलें, "म्हातारे बाबा, तुमचें वय काय?" म्हातारा म्हणाला, 'साठ वर्षें.' त्यावर अब्राहाम आश्चर्यचकित होऊन उद्गारला, "काय! आणि तुम्ही माझ्या वडिलांच्या गुलामांनीं घडविलेल्या देवांची पूजा करितां!" बिचारा म्हातारा काय बोलणार? तो ओशाळला आणि खालीं मान घालून निघून गेला.

थोड्या वेळानें एक बाई देवापुढें ठेवण्याकरितां मिठाई घेऊन आली. अब्राहामनें बाईला स्वतःच तो मिठाईचा पुडा देवापुढें ठेवण्यास सांगितलें आणि म्हटलें "थांब. पहा, देव कसे अधाशासारखे तुझा नैवेद्य गिळंकृत करतात तें!" बाई निघून गेली. नंतर अब्राहामनें हातांत सोटा घेतला आणि दोन लहान मूर्ती फोडून टाकिल्या. बाप घरीं आल्यावर त्यानें "हें मूर्ती फोडण्याचें दुष्ट कृत्य कोणीं केलें" असें विचारलें. तेव्हां "नैवेद्याकरितां देव आपसांत भांडले आणि मोठ्या देवानें लहान देवांना चांगलें ठोकून काढिलें!" असें अब्राहामनें सांगितलें. ही देवांची कुचेष्टा तेराहला सहन झाली नाहीं. तो संतापाच्या भरांत मुलाला म्हणाला, "मूर्खा, देव खात नाहींत व पीत नाहींत हें काय मला माहीत नाहीं?" "तरी त्यांची तुम्हीं पूजा करितां आणि मलाहि ती करावयाला लावतां!" असें

अब्राहाम ताडकन् बोलला. मुलानें नास्तिकपणाचा गुन्हा केला म्हणून तेराहनें त्याला त्या देशाचा राजा निमरॉद याच्यापुढें उभें केलें. राजा म्हणाला, "तूं आपल्या बापाच्या देवांची पूजा करीत नाहींस. बरें, अग्नीची तरी पूजा करशील?" अब्राहामनें प्रश्न केला, "पण पाणी अग्नीपेक्षां श्रेष्ठ नाहीं का?" निमरॉद म्हणाला, "ठीक. कांहीं हरकत नाहीं. जलाची पूजा कर." यावर अब्राहाम म्हणाला, "मग ढगाची पूजा कां करूं नये? ते तर जलापेक्षांही श्रेष्ठ आहेत." बिचारा राजा निमरॉद! तो यालाहि तयार झाला आणि "तुला श्रेष्ठ अशा ढगांची पूजा करावीशी वाटते. बरें आहे. त्यांना पूज." लगेच अब्राहामनें वारा ढगांपेक्षांही श्रेष्ठ आहे असें दाखवून राजाला सांगितलें कीं, "मला विस्तव, पाणी, ढग, वारा यांना पुजावें असें वाटत नाहीं. या सर्वांना उत्पन्न करणारा जो परमेश्वर त्याची पूजा करावी असें मला वाटतें."

एकदां अब्राहामला सूर्य श्रेष्ठ असावा असें वाटलें. परंतु तो नियमितपणानें उगवतो व मावळतो असें अब्राहाम याच्या ध्यानांत आलें. तीच स्थिति चंद्र व तारे यांची. तेव्हां 'या सर्वांनाहि नियमानें वागावयास लावणारा जो कोणी आहे तोच परमेश्वर' असा त्यानें तर्क केला. अब्राहामची तपस्या पाहून परमेश्वरानें अब्राहामला साक्षात् दर्शन दिलें. आणि 'माझी भक्ति करण्याविषयीं हिब्रू लोकांना उपदेश कर' असा आदेश दिला.

अब्राहाम ७५ वर्षांचा असतांना देवाच्या सांगण्यावरून तो कानान प्रांतांत आला. तेथें दुष्काळ पडला म्हणून आपली पत्नी सारा व पुतण्या लॉत यांना बरोबर घेऊन तो ईजिप्तमध्यें गेला. सारा फार देखणी होती. ईजिप्तचा फारोआ (राजा) तिला अब्रूनें राहूं देणार

नाहीं ही अब्राहामला भीति होतीच. सारा जाईलच, पण निदान तिचा नवरा म्हणून आपणाला त्यानें ठार मारूं नये, यासाठीं सारानें अब्राहाम हा आपला भाऊ आहे असें अब्राहामनें तिला पढवून ठेविलें होतें. फारोआनें शेवटीं साराला घेतलेंच. परंतु परमेश्वरानें कोपून ईजिप्तमध्यें प्लेग सुरू केला. तेव्हां घाबरून साराला फारोआनें सोडून दिलें. अब्राहाम व त्याचा पुतण्या लॉत यांना फारोआनें जनावरें, सोनें व चांदी देऊन पाठवून दिलें. पुढें चुलत्या-पुतण्याचें जमेनासें झाल्यामुळें दोघे वेगळे राहूं लागले. परंतु त्याच पुतण्यावर पुढें प्रसंग ओढवला. स्थानिक सत्ताधारी एक होऊन त्यावर तुटून पडले. तेव्हां अब्राहामनें त्याला सोडवून आणलें.

साराला मूल होईना म्हणून तिनें आपली दासी हागार हिला सवत करून घेतलें. हागार ही मूळची ईजिप्तमधील स्त्री होती. तिला अब्राहामपासून मुलगा झाला. त्याचें नांव इस्माइल. हागार चढेलपणा करूं लागली तेव्हां अब्राहामनें तिचे लाड मुळींच पुरविले नाहींत.

पुढें परमेश्वरी कृपेनें, वय होऊन गेलें होतें तरी साराला मुलगा झाला. त्याचें नांव आयझाक.

लॉत ज्या मुलखांत होता तेथील लोकांचें दुर्वर्तन अब्राहामच्या देवाच्या कानावर आलेंच होतें. त्यांचा नाश करण्याकरितां देव निघाला. तेव्हां त्यानें ' वाईटाबरोबर चांगल्याचा नाश करणार नाहीं' असें अब्राहामला वचन दिलें. पण तेथें गेल्यावर लॉत व त्याच्या दोन मुली यांखेरीज सगळेच दुराचारी आढळून आल्यामुळें त्यांचा देवानें संहार केला. लॉतच्या मुलींना आतां आपला वंश कसा राहील याची काळजी वाटूं लागली आणि शेवटीं म्हाताऱ्या बापाला मद्य पाजून त्यांनीं त्याच्यापासून संतति करून घेतली. एकीच्या मुलाचें मोआब व दुसरीच्या मुलीचें बेनअम्मी अशीं नांवें ठेवण्यांत आलीं.

देवानें अब्राहामला पुष्कळ मुलूख दिला. त्यावर राज्य करण्याचा अधिकार दिला आणि प्रजोत्पत्ति करण्याचा त्यास आदेश दिला. त्याची खूण म्हणून सुंता करण्याची आज्ञा केली. अब्राहामची सुंता ९९ व्या वर्षी झाली. इस्माइलची १३ व्या वर्षी झाली आणि आयझाकची मात्र बरोबर आठव्या दिवशीं झाली.

अब्राहामची सत्त्वपरीक्षा पाहण्याकरितां देवानें आयझाकला बळी देण्याची आज्ञा केली. अब्राहाम देवाच्या आज्ञेप्रमाणें मुलाला ठराविक ठिकाणीं घेऊन गेला. साहित्य तयार केलें. मुलाला बांधलें आणि आतां त्यावर सुरी चालवणार तोंच देवदूतानें येऊन त्याचे हात धरिले.

सारा १२० वर्षांची झाल्यावर वृद्धापकाळामुळें वारली. तिला पुरण्याकरितां अब्राहामनें स्वतंत्र जागा खरेदी केली आणि तींत तिचें प्रेत पुरलें. पुढें आपल्या मुलाकरितां आपल्याच ज्ञातींतील एक मुलगी आणून त्याचें तिच्याशीं लग्न करून दिलें. पुढें अब्राहाम स्वर्गवासी झाला. तेव्हां त्याचें प्रेतहि साराच्या शेजारींच पुरण्यांत आलें.

१ याला अब्राहाम असें नांव देवानें ठेविलें. मूळचें नांव अब्राम.

२ अब्राहाम सुमारें इ. स. पूर्वी १५०० ते २००० या काळांत होऊन गेला.

३ त्या वेळीं विवाहसंस्था पूर्णावस्थेला पोंचली नव्हती.

४ आपल्या जातीचें किंवा वंशाचें दृढीकरण व्हावें म्हणून प्रजोत्पत्ति करणें हें काम त्या वेळीं मुख्य मानिलें जात असे.

सूचना:—मुलांना गोष्ट सांगतांना यांतील कांहीं भाग वगळला तरी चालेल. शिक्षकांच्या माहितीकरितां ही गोष्ट लिहिली आहे.

[ १५ ]

# गार्गी

श्री. **म. शि. निंबकर**, मुख्याध्यापक, लोणी.

इ. स. पूर्वी ८०० च्या सुमारास गार्गी नांवाची एक अत्यंत बुद्धिमान् स्त्री होऊन गेली. वचक्नु ऋषींची ही मुलगी. बृहदारण्यक उपनिषदामध्यें वर्णिलेल्या सभेंत ही हजर असून प्रख्यात तत्त्वज्ञानी याज्ञवल्क्य याला तिनें प्रश्नोपप्रश्न विचारून छेडिलें. गार्गीनें विचारलेले प्रश्नच थोडयाबहुत फरकानें येथें दिले आहेत; त्यांवरून वाचकांना तिच्या योग्यतेची कल्पना येईल.

गार्गी—हें सर्व जग जलावर उभें–आडवें विणून काढलें आहे असें आपण म्हणतां. पण मी विचारतें, जलाची उभारणी कशावर केली आहे?

याज्ञवल्क्य—वायूवर.

गार्गी—आणि वायूला आधारभूत कोण?

याज्ञवल्क्य—अंतरिक्ष.

गार्गी—अंतरिक्षाला कशाचा तरी आधार असेलच.

याज्ञवल्क्य—गंधर्वलोकाचा.

गार्गी—गंधर्वलोकाला आश्रय कोणाचा?

याज्ञवल्क्य—सूर्यलोकाचा.

गार्गी—पण सूर्यलोकाचें अधिष्ठान काय?

याज्ञवल्क्य—चंद्रलोक.

गार्गी—चंद्रलोक तरी निवळ अधांतरीं कसा असणार?

याज्ञवल्क्य—चंद्रलोकाची उभारणी नक्षत्रलोकावर केली आहे.

गार्गी—नक्षत्रलोकाची उभारणी कशावर केली आहे?

याज्ञवल्क्य—देवलोकावर.

गार्गी—देवलोक तरी निराश्रयी कसा असणार!

याज्ञवल्क्य—त्याला आश्रय इन्द्रलोकाचा.

गार्गी—इंद्रलोक कशावर तरी अधिष्ठित असणारच.

याज्ञवल्क्य—प्रजापतिलोकावर इंद्रलोक ओतप्रोत झाला आहे.

गार्गी—आणि प्रजापतिलोक कशावर ओतप्रोत झाला आहे?

याज्ञवल्क्य—शेवटीं ब्रह्मलोक आहे.

गार्गी—ब्रह्मलोकाला सुद्धां कशाचा तरी आधार असेलच.

याज्ञवल्क्यानें आतां मात्र प्रश्नमालिका पुरी करण्याची गार्गीला विनंति केली. गार्गीनेंहि ती मान्य केली. परंतु थोडया वेळानें पुन्हां उचल करून आणखी दोन प्रश्न विचारले. त्यांची हकीकत श्री. शंकरराव देव यांनीं लिहिलेल्या आणि 'सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाले'में प्रसिद्ध केलेल्या 'उपनिषदांतील दहा गोष्टी' या पुस्तकांत दिली आहे ती शिक्षकांनीं वाचावी.

## [ १६ ]

## कुमारजीव

सुमारें २३०० वर्षांपूर्वी महेंद्रसंघमित्रानें सिलोनमध्यें जाऊन बौद्ध-धर्माचा प्रसार केला. त्यानंतर चारपांचशें वर्षांपर्यंत अनेक बौद्ध भिक्षू देशोदेशीं जाऊन बौद्धधर्माचा प्रसार करूं लागले. सिलोन,

सयाम, ब्रह्मदेश, ज़पान, चीन हे सारे देश हळूहळू ह्या भिक्षूंच्या प्रयत्नामुळें बौद्धधर्मी बनूं लागले. जवळजवळ दीड हजार वर्षांपूर्वी चीनमध्यें धर्मप्रसारासाठीं गेलेल्या अशाच एका बौद्ध भिक्षूची गोष्ट ऐका.

त्यावेळीं म्हणजे जवळजवळ दीड हजार वर्षांपूर्वी आतांसारख्या मोटारी, आगगाड्या किंवा आगबोटी नव्हत्या. सम्राट अशोकासारख्या प्रजेच्या हिताची कळकळ बाळगणाऱ्या राजांनीं हिंदुस्थानांत या टोंकापासून त्या टोंकापर्यंत मोठमोठे रस्ते बांधून ठेवले हें खरें; पण त्यावेळीं प्रवासाचीं साधनें म्हणजे बैलगाडी किंवा रथ. तीं आधुनिक वाहनांइतकीं वेगवान् थोडींच असणार? शिवाय मगध देशांतून निघून चीनमध्यें जायचें. वाटेंत अगदीं परके देश लागणार; कधीं दाट अरण्यांतून तर कधीं डोंगरकपारींतून मार्ग काढावा लागणार. कधीं मोठी नदी तरून तर कधीं अफाट वाळवंट तुडवीत जावें लागणार. हिंस्र पशू, चोर, लुटारू यांची भीति ती निराळीच! बरें, प्रत्यक्ष चीनमध्यें गेल्यावर जवळ आप्तमाणूस कोणी नाहीं. त्यांची भाषा समजणें शक्य नाहीं. सर्वस्वी परक्या लोकांच्या साहाय्यावर अवलंबून रहावें लागणार!

इतक्या सगळ्या आपत्ती असून देखील मगध देशांतील नालंद विद्यापीठांतील एक बौद्ध भिक्षू चीनमध्यें धर्मप्रसार करण्याकरितां जावयास निघाला. त्याचें नांव कुमरजीव असें होतें. त्याची बौध्दधर्मावर अढळ श्रध्दा होती. त्यानें सातव्या वर्षीच भिक्षूची दीक्षा घेतली होती आणि आपलें तनमन त्यानें धर्मास अर्पण केलें होतें. प्रवासाच्या गैरसोयी असून देखील चीनसारख्या परक्या नि दूर असलेल्या देशांत धर्मप्रसार करण्यास कुमरजीव तयार झाला. खरेंच कुमरजीवाचें आपल्या धर्मावर अढळ प्रेम होतें!

निघण्यापूर्वी कुमरजीवानें आपल्या गणगोताच्या, मित्रमंडळींच्या गांठीभेटी घेतल्या. कांहीं भिक्षु मित्र त्याच्याबरोबर जावयास तयार झाले; त्यांना त्यानें बरोबर नेण्याचें ठरविलें. धर्मप्रसाराकरितां लागणारीं साधनेंहि त्यानें बरोबर घेतलीं. अर्थात् हीं साधनें म्हणजे बौध्दधर्माचे पालीभाषेंतील पवित्र ग्रंथ. शेवटीं निघण्याच्या वेळीं त्यानें विद्यापीठांतील आपल्या पूज्य आचार्यांना नमस्कार केला नि त्यांचा आशीर्वाद घेतला. आचार्यांनीं उपदेश केला, "बाळ कुमरजीव, चीन देशांत आजपर्यंत पुष्कळ बौध्द भिक्षू धर्मप्रसाराकरितां गेलेले आहेत. तिथला राजा बौध्दधर्मीच आहे. त्यामुळें तुला तिथें धर्मप्रसाराच्या कार्यांत पुष्कळ मदत मिळेल. बौध्दधर्माचे कांहीं नवीन ग्रंथ तूं बरोबर घेतलेले आहेस. तिथें गेल्यावर चिनी भाषेचा चांगला अभ्यास कर आणि चिनी भाषेंत हे ग्रंथ लिहून काढ. चिनी भाषेंतच जर तूं चिनी लोकांना आपल्या धर्माचा उपदेश केलास तरच तुला पुष्कळ अनुयायी मिळतील. तुझ्याबरोबर तुझे मित्र आहेतच; त्यांचीहि तुला मदत होईलच. प्रवासमार्ग जरा दुष्करच आहे; तरी पण भगवान् बुद्धाच्या कृपेनें तुझा प्रवास सुखकर होईल. भगवान् बुध्द तुझ्या कार्यांत तुला उदंड यश देवो!"

आचार्यांचा आशीर्वाद मिळाल्यानंतर कुमरजीव आपल्या मित्रासह चीनमध्यें जावयास निघाला. वाटेंत बुद्धाचीं जीं पवित्र ठिकाणें होतीं त्यांचें त्यानें दर्शन घेतलें; कांहीं ठिकाणीं धर्मासंबंधीं प्रवचनें दिलीं. जातां जातां तो पुरुषपूर (पेशावर) येथें आला, तेथून तक्षशिलेस गेला. तेथून पामीर पठार ओलांडतांना त्याला फार त्रास झाला; पण धर्मकार्याचें ध्येय समोर असल्यामुळें त्याला तो त्रास जाणवला नाहीं. वाटेंत त्याला खोतान लागलें. खोतानमध्यें कांहीं दिवस राहून त्यानें

धर्मप्रसार केला. तेथून भयाण ओसाड रस्त्यानें लोपनार, शचीवरून तो गोबी वाळवंटांत आला. वाळवंटच तें ! त्यांतून लांबचा प्रवास करितांना हाल न झाले तरच नवल ! ते सारे हाल सहन करून तो कसाबसा चीनच्या मोठ्या भिंतीपर्यंत येऊन पोहोंचला. शेवटीं ती भिंत ओलांडून कुमरजीव आपल्या सोबत्यांसह चीन देशांत जाऊन पोहोंचला.

कुमरजीव ज्यावेळीं चीनमध्यें गेला त्यावेळीं तेथें गाईसिंग नांवाचा बादशहा राज्य करीत होता. तो बौद्धधर्मी होता. त्यानें कुमरजीवाचें मोठ्या थाटानें स्वागत केलें आणि त्याला आपल्या दरबारांत ठेवून घेतलें.

कुमरजीव आधींच विद्वान् नि तेजस्वी; त्यांत रसाळ वाणीची जोड आणि प्रत्यक्ष बादशहाचा पाठिंबा. त्यामुळें त्यानें चीनमध्यें बौद्ध-धर्माचा झपाट्यानें प्रसार केला. तो स्वतः चिनी भाषा शिकला आणि चिनी भाषेंतच त्यानें तिथल्या लोकांना बुद्धाचा उपदेश सांगितला. बुद्धधर्माचे बहुतेक ग्रंथ पालीभाषेंत आहेत. ते चिनी लोकांना समजावेत म्हणून त्यानें कांहीं ग्रंथांचें चिनी भाषेंत भाषांतर केलें. परक्या देशांत जाऊन तिथल्या लोकांची भाषा शिकून त्या भाषेंत ग्रंथ लिहिणें हें किती कष्टाचें काम आहे ? कुमरजीवानें तें केलें; कारण त्याच्या डोळ्यासमोर एक ध्येय होतें.

कुमरजीवानें आपलें सर्व आयुष्य चीनमध्येंच धर्मकार्याकरितां खर्च केलें; केवळ ध्येयाकरितां घरदार सोडून अनोळखी मुलखांत सगळा जन्म कंठणारा कुमरजीव धन्य होय !

—श्री. तांदळे व श्री. देशपांडे, वर्धा, यांच्या 'समाजदर्शन' नामक पुस्तकांतून वरील पाठ घेण्यांत आला आहे.

[ १७ ]

# शुनःशेपाची कथा

श्री. **गोपाळदास पटेल**, गुजरात–विद्यापीठ.

शुनःशेप हें नांव तुम्हांला कांहींसें अपरिचित वाटेल, आणि तसें वाटल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. कारण तें नांव आर्य लोकांचा जुन्यांतला जुना ग्रंथ जो ऋग्वेद त्यांत आलें आहे. म्हणजे तें कमींत कमी तीन ते चार हजार वर्षांइतकें जुनें आहेच. ऋग्वेदांत वेगवेगळ्या ऋषींनीं परमात्मरूप परमेश्वराच्या भिन्न भिन्न नांवांनीं व भिन्न भिन्न रूपांत केलेल्या स्तुतींचा संग्रह आहे. त्यांतील एका सूक्तांत शुनःशेप ऋषि वरुण देवाची स्तुति करतांना म्हणतो :

‘ हे वरुणदेवा ! माझी विनंति ऐका, आणि कृपा करा. दुःखांत रुतलेला मी आपलें रक्षण व्हावें म्हणून तुम्हांला हाक मारीत आहें.

‘ हे बुद्धिमन् ! तुम्हीं स्वर्ग आणि पृथ्वी यांना व्यापून आहांत; माझ्या कल्याणासाठीं मी जें कांहीं सांगत आहें तें तुम्हीं ऐका.

‘ माझे सर्वांत वरचे पाश सोडवा, मधले सोडवा आणि थेट खालचे सोडवा. असें केल्यानें मला जगतां येईल.

ही स्तुति वाचतांक्षणींच ‘शुनःशेपाला वरच्या, मधल्या व खालच्या पाशांनीं कोणीं बांधिलें होतें? तसेंच त्याचा जीव अशा कोणत्या संकटांत येऊन पडला होता कीं, त्यासाठीं त्याला वरील प्रकारची वरुणदेवाची प्रार्थना करावी लागली ?’ असा प्रश्न उपस्थित होतो. ही सर्व कथा ‘ ऐतरेय ब्राह्मण ’ नांवाच्या ग्रंथांत दिली आहे. वेदांतील वेगवेगळ्या सूक्तांचा उपयोग यज्ञविधींत केव्हां कशा प्रकारें करावा

तें दाखविण्यासाठीं प्रत्येक वेदावर वेगवेगळे 'ब्राह्मण' ग्रंथ आहेत. हे ग्रंथ वेदानंतरचे सर्वांत प्राचीन आर्य ग्रंथ म्हणतां येतील. ती कथा याप्रमाणें आहे :—

वेधसाचा पुत्र इक्ष्वाकुवंशी राजा हरिश्चंद्र याला शंभर स्त्रिया होत्या, पण मुलगा नव्हता. त्यानें नारदाला विचारिलें, "जे जाणते आहेत व जे अजाणते आहेत असे सर्वच लोक पुत्राची इच्छा करितात, त्याचें कारण काय? पुत्रामुळें कोणता लाभ होतो?"

नारदानें त्याला सविस्तर उत्तर दिलें: 'स्वतः करावयास घेतलेल्या किंवा योजलेल्या कामांची जबाबदारी बाप मुलावर सोंपवून देऊं शकतो. आणि अशा प्रकारें मेल्यावर सुध्दां त्याला जिवंत राहतां येतें म्हणून सर्वजण पुत्राची इच्छा बाळगतात. शिवाय विविध पदार्थांच्या योगानें जें सुख मिळूं शकतें, त्या सर्वांपेक्षां अधिक सुख पुत्रापासून प्राप्त होतें म्हणून देखील लोक पुत्राची इच्छा करितात. ज्याप्रमाणें अन्न प्राणधारक असल्यामुळें प्राणरूप आहे; वस्त्र थंडीवाऱ्यापासून रक्षण करीत असल्यामुळें शरणरूप आहे; सुवर्ण रूपवृद्धि करीत असल्यामुळें रूप-समान आहे; पशु वगैरे धनसंपात्ति विवाह होण्यास कारणीभूत होत असल्यामुळें विवाहरूप आहे; पत्नी सर्व कार्यांत मदतनीस होत असल्यामुळें सखारूप आहे; आणि लग्न करण्यापूर्वी व लग्न करून दिल्यावर सुद्धां मुलगी बापाला चिंतेचें कारण होऊन राहाते म्हणून ती संकटरूप आहे; त्याप्रमाणें पुत्र हा उत्तम गति साध्य करून घेण्यास साहाय्यरूप असल्यामुळें तो परलोकचा दीपरूप आहे.

"करितां हे राजा! तूं वरुणाजवळ जा, आणि त्याला सांग कीं, मला पुत्र होईल तर त्याला बळी देऊन तुमची पूजा करीन."

त्याप्रमाणें राजा वरुणाजवळ गेला, आणि त्याला म्हणाला, “ मला पुत्र होऊं द्या. त्याला बळी देऊन मी तुमचें यजन करीन. ”

वरुणानें ती गोष्ट मान्य केली.

थोडया काळानंतर राजाला रोहित नांवाचा पुत्र झाला. तेव्हा वरुणानें येऊन राजास म्हटलें, “ तुला मुलगा झाला. त्याला बळी देऊन माझें यजन कर. ”

राजानें म्हटलें, “ पशु जेव्हां दहा दिवसांपेक्षां मोठा होतो. तेव्हां हवन करण्याजोगा बनतो. म्हणून दहा दिवस थांबा. ”

वरुणानें ती गोष्ट मान्य केली. दहा दिवस पूर्ण होतांच वरुण येऊन हजर झाला. तेव्हां राजानें म्हटलें, “ पशूला जेव्हां दांत येतात तेव्हां तो हवन करण्याजोगा बनतो. कारितां त्याला दांत येऊं द्या. ”

वरुणानें ती गोष्ट मान्य केली. रोहिताला दांत येतांच वरुण पुन येऊन हजर झाला. राजानें म्हटलें, “ दुधाचे दांत पडल्यावर पशु हवन करण्याजोगा बनतो. तरी याचे दुधाचे दांत पडूं द्या.”

वरुणानें ती गोष्ट देखील मान्य केली. नंतर रोहिताचे दुधाचे दांत पडले. तेव्हां वरुण येऊन राजाजवळ हजर झाला. राजानें म्हटलें, “ दुधाचे दांत पडून नवे दांत येतील तेव्हां पशु हवन करण्याजोगा बनतो. म्हणून तुम्ही तोंपर्यंत थांबा.”

वरुणानें ती गोष्ट मान्य केली. नंतर रोहिताला नवे दांत आले तेव्हां वरुण येऊन हजर झाला. राजानें म्हटलें, “ क्षत्रिय जेव्हा कवच धारण करण्याजोगा बनतो तेव्हां तो प्रौढ झाला असें म्हणावें आणि हवन करण्याजोगा झाला असें समजावें. तेव्हां तुम्हीं तोंपर्यंत थांबा. ”

वरुणानें ही गोष्ट देखील मान्य केली. नंतर रोहित जेव्हां चिलखत घालण्यास योग्य झाला, तेव्हां वरुण येऊन उभा राहिला. तेव्हां राजानें रोहिताला बोलावून म्हटलें, "बाळ, तुला यांनीं मला दिलें आहे. करितां त्यावेळीं केलेल्या कराराप्रमाणें मी तुला बळी देऊन त्यांचें पूजन करीन."

रोहित "नाहीं, नाहीं" असें म्हणत धनुष्यबाण घेऊन रानांत निघून गेला आणि तेथें एक वर्षभर भटकला.

वरुणानें आतां हरिश्चंद्र राजास पकडलें आणि त्याच्या पोटांत जलोदर नांवाचा रोग निर्माण केला. रोहितानें तो समाचार ऐकला, तेव्हां तो तावडतोब गांवीं येण्यास निघाला. पण इंद्र मनुष्याचें रूप घेऊन त्याच्या समोर आला आणि त्याला सांगूं लागला; "हे रोहित! आम्हीं ऐकलें आहे कीं, ज्या माणसाचे पाय प्रवास करून थकत नाहींत, त्याला लक्ष्मी प्राप्त होत नाहीं. चांगला मनुष्य सुद्धां घरीं बसून राहील तर तो पापी होईल; इंद्र सुद्धां प्रवास करणाऱ्याचा मित्र बनतो, करितां तूं प्रवास कर! प्रवास कर!"

हें ऐकून रोहितानें विचार केला कीं, "ह्या ब्राह्मणासारखा सत्पुरुष मला प्रवास करण्यास सांगत आहे तर मी आणखी एक वर्षभर पर्यटन करीन." त्याप्रमाणें त्यानें दुसरें वर्ष देखील अरण्यांत पर्यटन करण्यांत घालविलें. नंतर वर्ष पुरें झाल्यावर तो गांवाकडे येण्यास निघाला. तेव्हां इंद्र पुन्हां मनुष्याचें रूप धारण करून आला व त्याला म्हणूं लागला:

"पर्यटन करणाऱ्या माणसाच्या मांड्या फुलें आलेल्या फांद्यांप्रमाणें असतात; त्याचें शरीर वाढतें, आणि आरोग्यरूप फळानें युक्त होतें. मार्गांत होणाऱ्या श्रमानें त्याचें सर्व पाप झिजतें, करितां तूं प्रवास कर! प्रवास कर!"

ब्राह्मणाचें असें वचन ऐकून रोहित तिसरें वर्षहि फिरत राहिला; नंतर वर्ष-अखेरीस तो गांवाकडे येण्यास निघाला; तेव्हां इंद्रानें पुन्हां मनुष्यरूपानें येऊन त्याला म्हटलें :

"बसणाऱ्याचें भाग्य सुद्धां बसून राहातें, उभें राहाणाऱ्याचें उभें राहातें; झोंपणाऱ्याचें झोंपीं जातें, आणि चालणाऱ्याचें चालत असतें."

हें ऐकून रोहितानें चौथें वर्षसुद्धां प्रवासांत घालविलें. वर्षाच्या अंतीं तो गांवाकडे येण्यास निघाला. तेव्हां इंद्रानें यावेळीं सुद्धां मनुष्यरूप धारण करून त्यास म्हटलें.

"झोंपून राहणारा मनुष्य कलियुगासारखा आहे; जागणारा द्वापाराप्रमाणें आहे; उभा राहाणारा त्रेतायुगाप्रमाणें आहे, आणि चालणारा कृतयुगासारखा आहे."

ब्राह्मणाचा असा सल्ला ऐकून रोहितानें पांचव्या वर्षी देखील प्रवास केला. त्यानंतर तो गांवाकडे येण्यास निघाला. इंद्रानें यावेळीं सुद्धां पुरुषरूपानें येऊन त्याला म्हटलें :

"चालणारा मध प्राप्त करून घेतो; चालणाऱ्याला गोड फळ मिळतें; आळस न करितां फिरत राहाणाऱ्या सूर्याचा प्रताप पहा कीं !"

हें ऐकून रोहित सहाव्या वर्षी देखील पर्यटन करीत राहिला. फिरत असतां सुयवसाचा पुत्र अजीगर्त भुकेनें मरत असतांना दिसला. त्याला तीन मुलगे होते. रोहितानें त्याला म्हटलें, "मी तुला शंभर गाई देतों, तूं मला या तिघांतून एक मुलगा दे; माझ्याबद्दल त्याला बळी देऊन मी स्वत:ची सुटका करून घेईन." अजीगर्तानें वडील पुत्रास घट्ट धरून म्हटलें, "हा वडील मुलगा माझा लाडका आहे, त्याच्याशिवाय जो हवा असेल तो घेऊन जा." तितक्यांत अजी-

गर्ताच्या स्त्रीनें सर्वांत धाकट्याला घट्ट धरून म्हटलें, "हा लहानगा माझा लाडका आहे." नंतर मधल्या शुनःशेपाला देण्याचें दोघांनींहि कबूल केलें. रोहित अजीगर्ताला शंभर गाई देऊन शुनःशेपाला बरोबर घेऊन गांवांत आला. त्यानें बापाजवळ येऊन म्हटलें, "माझ्याबद्दल यज्ञांत बळी देण्यासाठीं मीं याला आणिलें आहे." हरिश्चंद्र शुनःशेपाला घेऊन वरुणाकडे गेला; वरुणराजानें रोहिताच्या मोबदल्यांत शुनःशेपास स्वीकारण्याचें कबूल केलें; आणि म्हटलें, "क्षत्रियापेक्षां ब्राह्मण अधिक चांगला."

नंतर हरिश्चन्द्रानें शुनःशेपाला बळी देण्यासाठीं यज्ञ सुरू केला. विश्वामित्र त्या यज्ञाचा होता होता. नंतर जेव्हां शुनःशेपाला कापण्यासाठीं खांबास बांधण्याची वेळ आली, तेव्हां तें काम करण्यास कोणी तयार होईना. त्यावेळीं शुनःशेपाचा बाप अजीगर्त म्हणाला. "मला जर आणखी शंभर गाई द्याल तर, मी त्याला खांबाला बांधून देतों."

त्यांनीं त्याला आणखी शंभर गाई दिल्या, तेव्हां त्यानें शुनःशेपाला खांबास बांधून टाकिलें. मग जेव्हां त्यास कापण्याची वेळ आली, तेव्हां त्याला कापण्यास कोणी तयार होईना. त्या वेळींहि शुनःशेपाचा बाप अजीगर्त म्हणाला कीं, "जर मला आणखी शंभर गाई द्याल तर मी त्याला कापतों."

त्यांनीं त्याला आणखी 'शंभर गाई दिल्या. तेव्हां तलवार घेऊन शुनःशेपास मारण्यासाठीं तो जवळ आला. त्या समयीं शुनःशेपानें विचार केला कीं, "हा खचीत मला पशूप्रमाणें कापून टाकील. त्यांतून सुटका व्हावी म्हणून देवांची प्रार्थना करूं या." प्रथम त्यानें प्रजापतीची प्रार्थना केली; तेव्हां त्यानें सांगितलें. "अग्निदेव सर्वांत

अधिक जवळ आहे; तेव्हां त्याची स्तुति कर." शुनःशेपानें अग्नीची स्तुति केली; तेव्हां अग्नीनें म्हटलें, "सवितादेव जन्मास आलेल्या सर्वांचा ईश्वर आहे; तरी त्याची स्तुति कर." शुनःशेपानें सूर्याची स्तुति केली; तेव्हां त्यानें म्हटलें, "तुला वरुण राजाला अर्पण करण्यांत आलें आहे. तेव्हां त्याची स्तुति कर."

शुनःशेपानें वरुणाची स्तुति केली. तेव्हां वरुणानें म्हटलें, "अग्नि देवांचें मुख आहे, तसेंच तो उत्तम मित्र आहे; करितां त्याची स्तुति कर, मग आम्हीं तुला सोडूं." शुनःशेपानें अग्नीची स्तुति केली; तेव्हां त्यानें म्हटलें, 'विश्वेदेवांची स्तुति कर; मग आम्हीं तुला सोडूं.' शुनःशेपानें लहानमोठया सर्वांची स्तुति केली; तेव्हां त्यांनीं म्हटलें, "इन्द्र हा देवतांमध्यें सर्वांत तेजस्वी आहे, बलवान् आहे, शक्तिमान आहे, सत्त्वशाली आहे, त्याचप्रमाणें ( संकटांतून ) पार नेणारा आहे. करितां त्याची स्तुति कर. मग आम्हीं तुला सोडूं." शुनःशेपानें त्याप्रमाणें केलें. तेव्हां इन्द्र म्हणाला, "आश्विनीकुमारांची स्तुति कर; मग आम्हीं तुला सोडूं." शुनःशेपानें तसें केलें; तेव्हां त्यांनीं सांगितलें, "उषादेवीची स्तुति कर." शुनःशेपानें उषादेवीची स्तुति आरंभिली. त्या स्तुतीच्या प्रत्येक ऋचेसरशीं त्याचे पाश एकामागून एक सुटत गेले, त्याचप्रमाणें हरिश्चन्द्राचें पोट सुद्धां घटत चाललें. शेवटची ऋचा म्हणतांच त्याचे पाश सुटले आणि हरिश्चन्द्र राजा पूर्णपणें रोगमुक्त झाला.

नंतर यज्ञ करविणाऱ्या ऋत्विजांनीं शुनःशेपास सांगितलें कीं. "तूंच आतां आजच्या विधीची समाप्तिक्रिया कर." तेव्हां शुनःशेपानें स्वतःस नवीनच सुचलेल्या मंत्रांनीं ती क्रिया पुरी केली. नंतर तो विश्वामित्राच्या मांडीवर जाऊन बसला.

तेव्हां अजीगर्त म्हणूं लागला, "हे विश्वामित्र, मला माझा मुलगा परत द्या." विश्वामित्रांनीं म्हटलें, "देवांनीं हा मुलगा मला दिला आहे, करितां हा मी तुला देणार नाहीं."

मग अजीगर्तानें शुनःशेपास म्हटलें, "हे पुत्रा, तूं परत ये; मी आणि तुझी आई आम्हीं तुला बोलावीत आहों; तूं माझा मुलगा आहेस, त्याचप्रमाणें कवि म्हणून प्रसिद्ध आहेस; आपल्या वाडवडिलांच्या तंतूपासून तूं दूर जाऊं नकोस."

त्यावर शुनःशेप म्हणाला, "शूद्र देखील करणार नाहीं असें काम करण्यास तूं तयार झालास, आणि मला मारण्यास तरवार घेऊन धावून आलास; तें सर्वांनीं पाहिलें आहे. माझ्यापेक्षां तुला तीनशें गाई अधिक वाटल्या."

तें ऐकून अजीगर्त सद्गदित होऊन म्हणाला, "बाळ! मीं जें पाप केलें त्याचा मला पश्चात्ताप होत आहे; त्याचा मी पूर्णपणें त्याग करितों; या तीनशें गाई मी तुला देऊन टाकतों."

शुनःशेपानें म्हटलें, "जो एकदां पाप करितो, तो दुसऱ्यांदाही करील; तुला आपले शूद्रासारखे आचार सोडवणार नाहींत. तूं जें केलें आहेस, तें पुन्हां सांधतां येण्यासारखें नाहीं."

त्याचे 'पुन्हां सांधता येण्यासारखें नाहीं' हे शब्द विश्वामित्रांनीं उचलले. त्यांनीं म्हटलें, "सुयवसाचा पुत्र भयंकर आहे; तो शस्त्रानें तुला कापण्यास सिद्ध झाला; त्याचा पुत्र होऊं नकोस, माझा पुत्र हो."

शुनःशेप म्हणाला, "अंगिराच्या कुळांत जन्मलेला मी तुमचा पुत्र कसा होऊं शकेन, तें तुम्ही मला सांगा."

विश्वामित्रांनीं म्हटलें, "माझ्या सर्व पुत्रांत तूं ज्येष्ठ पुत्र समजला जाशील; तुझीं मुलें पण वडील शाखेचीं समजलीं जातील. देवांनीं

दिलेला माझा सर्व वारसा मी तुला देतों; याप्रमाणें तूं माझा पुत्र होशील."

शुनःशेप म्हणाला, "तुम्ही आपल्या पुत्रांच्या समक्ष असें बोला, म्हणजे ते ही गोष्ट कबूल करतील आणि आमच्यांत एकी आणि सुखशांति प्रस्थापित होईल."

विश्वामित्रांनीं आपल्या मुलांना बोलाविलें आणि म्हटलें, "तुमच्यापैकीं कोणीहि याच्यापेक्षां ज्येष्ठ नाहीं."

विश्वामित्रांना शंभर मुलगे होते. पन्नास मधुच्छंदापेक्षां मोठे होते व बाकीचे लहान होते. त्यांपैकीं जे मधुच्छंदापेक्षां मोठे होते त्यांना ही गोष्ट आवडली नाहीं. त्यामुळें विश्वामित्रांनीं त्यांना शाप दिला, आणि ते सरहद्दीबाहेरील प्रदेशाचे रहिवासी बनले.

परंतु मधुच्छंदानें व त्याच्या लहान भावांनीं म्हटलें, "आमच्या पित्यानें जी गोष्ट स्वीकारली ती आम्हांलाहि कबूल आहे; देवरात शुनःशेप आमचा अग्रेसर होवो; आम्हीं त्याच्यामागून जाऊं."

विश्वामित्रांनीं म्हटलें, "हे पुत्रांनो, तुम्हीं पशू आणि वीरपुत्र यांनीं संपन्न व्हाल; कारण कीं, पित्याच्या इच्छेचें पालन करून तुम्हीं मला वीरपुत्रशाली केलें आहे. तुम्हीं देवराताला ज्येष्ठ म्हणून स्वीकारलेंत तेव्हां तुम्हीं पूज्य व्हाल. हा तुम्हांला सत्य शिकवील; तुम्हीं त्याच्यामागून जा, तो तुम्हांला माझें सर्व विद्याधन देईल."

[ १८ ]

# महात्मा कॉन्फूशियस

श्री. **मगनभाई देसाई,** कार्यवाह, गुजरात विद्यापीठ.

जगामध्यें आपली संस्कृति आज हजारों वर्षें जतन करून ठेवणारे दोन देश आहेत. एक आपला हिंदुस्थान आणि दुसरा चीन. चीन देश बौद्धधर्मी आहे असें आपण सामान्यपणें समजतों. परंतु बौद्धधर्म चीनमध्यें उत्पन्न झालेला नाहीं. हा धर्म आपणांकडून चीनमध्यें गेलेला आहे. तत्पूर्वी चीनमध्यें चीनचा स्वतःचा धर्म होता. या धर्माचा मूळपुरुष हा बुद्धाचा समकालीन एक महापुरुष होता. त्याचें चिनी नांव कॉन्–फुत्झे आहे. पण युरोपमध्यें त्या चिनी नांवाचें कॉन्फूशियस असें लॅटिन रूप झालें आणि इंग्रजीवरून आज तें सर्वत्र रूढ झालें आहे.

इ. स. पूर्वी ५५०–५५१ मध्यें एका मोठ्या उमराव घराण्यांत कॉन्फूशियसचा जन्म झाला होता. कॉन्फूशियस हा आपल्या बापाचा म्हातारपणचा मुलगा होता. त्याच्या जन्मानंतर तिसऱ्या वर्षी त्याचे वडील वारले म्हणून कॉन्फूशियसचें पालनपोषण करून त्याला मोठा करण्याची जबाबदारी त्याच्या मातेवर पडली. त्याचें घराणें खानदानी होतें पण घरची स्थिति चांगली नव्हती. म्हणून काम करण्याजोगा होतांच कॉन्फूशियसला उद्योगधंद्याला लागणें भाग पडलें. त्यामुळें कलाकौशल्याच्या कामांत त्याचा हात चांगला तरबेज झाला होता. विद्या शिकण्याची हौस त्याला पंधराव्या वर्षी उत्पन्न झाली आणि शेवटीं आपल्या जीवनांत त्यानें स्वतः विद्या

शिकावी आणि दुसऱ्यांना शिकवावी हेंच कार्य पसंत केलें. या प्रकारचें शिक्षकाचें जीवन त्यानें आपल्या बाविसाव्या वर्षापासून सुरू केलें. आपल्या आयुष्यांत त्यानें ३००० शिष्य तयार केले आणि त्यांतील ७०–८० तर चांगले नामांकित विद्वान म्हणून गणले जात.

त्यावेळीं चीनमध्यें दुसराही एक महापुरुष होता. कॉन्फ्युशियस-इतका तो आज प्रख्यात नाहीं; तरी पण तोही चीनचा एक नामांकित महापुरुष म्हणून गणला जातो. त्याचें चिनी नांव लाओ–त्झे असें आहे. त्याला लॅटिन भाषेंत लाओशियस असें म्हणतात. पण इंग्रजींत लाओ–त्झे असेंच म्हटलें जातें, त्यामुळें तेंच नांव रूढ झालें आहे. लाओ–त्झे हा कॉन्फ्युशियसपेक्षां वयानें मोठा होता. इ. स. पू. ६४० पासून ५१७ पर्यंत त्याचा जीवनकाल मानला जातो. कारण तो कॉन्फ्युशियसपेक्षां ९२ वर्षांनीं वडील होता. चीनमध्यें त्याच्या नांवानेंही एक धर्मसंप्रदाय चालू आहे. त्याचें नांव 'ताओ' धर्म. 'ताओ' हा चिनी शब्द आहे, आणि त्याचा अर्थ ब्रह्म किंवा विश्वांत सर्वत्र व्यापून राहिलेलें सूक्ष्म तत्त्व, असा होतो. त्यावरून लाओत्झे हा ज्ञान आणि तत्त्वचिंतन यांवर अधिक भर देणारा होता अशी तुम्हांला कल्पना करितां येईल. कॉन्फ्युशियस हा स्वतःला त्याच्यापेक्षां निराळ्या पंथाचा मानणारा होता. या दोन महापुरुषांची एकदां भेट झाली असतां त्यांच्यामध्यें जो संवाद झाला त्यावरून त्यांच्यांतला हा भेद चांगल्या रीतीनें समजून येईल.

लाओ–त्झे हा चिनी बादशहाचा दफ्तरदार म्हणून काम करीत असे. कॉन्फ्युशियसला प्राचीन ग्रंथ आणि प्राचीन विद्या यांचा अभ्यास करण्याची फार आवड होती. राष्ट्राच्या पुनरुत्थानासाठीं ही गोष्ट तो आवश्यक मानीत असे. त्यामुळें आणि महाज्ञानवान् ऋषी

म्हणून लाओ-त्झेची कीर्ति ऐकिल्यामुळें तो एकदां त्याच्या दर्शनास गेला; आणि त्यानें आपण स्वतः काय करीत असतों याची माहिती त्यास सांगितली. त्यावर लाओ-त्झे त्याला म्हणाला, "ज्यांविषयीं तूं बोलतो आहेस तीं माणसें तर मरून नष्ट झालीं आहेत; त्यांच्या अस्थी आज धुळींत मिळून गेल्या आहेत. यासाठीं तूं आपला मिथ्याभिमान सोड आणि आपल्या अनेक वासनांचा त्याग कर. ताओ ( ब्रह्म ) ला अंतःकरणांत शोधणें हाच खरा पुरुषार्थ आहे."

कॉन्फ्यूशियसला गूढतत्त्वाचें विशेष आकर्षण नव्हतें. त्याला लोकसेवाच प्रिय होती. पिता-पुत्र, पति-पत्नी, राजा-प्रजा, बंधु-बंधु, मित्र-मित्र, यांनीं परस्परांत जो नीतिधर्म पाळिला पाहिजे, तो सदाचारधर्म हीच महत्त्वाची गोष्ट आहे असें तो म्हणत असे. राजा-प्रजांनीं सुखी होण्याकरितां खरा कुटुंबधर्म, खरा समाजधर्म, खरा राजधर्म कोणता आहे तें जाणून त्याचें आचरण केलें पाहिजे, या धर्माचा तो उपदेश करी. जो राजा या धर्मानुसार वर्तन करण्यास आणि राज्यतंत्र चालविण्यास तयार होईल त्याच्या राज्यांत तो राही आणि आपल्या प्राणाचीहि पर्वा न करितां त्याच्या कार्यांत त्यास मदत करी. जें राज्य त्याला धर्मभ्रष्ट वाटे त्याचा त्याग करून तो निघून जाई.

कॉन्फ्यूशियसच्या वेळीं आपल्या देशांतल्याप्रमाणें चीनमध्यें सुध्दां संन्यासपंथी लोक होते. परंतु लोकसंग्रह हाच खरा मार्ग आहे असें कॉन्फ्यूशियस मानीत असे. एकदां आपल्या शिष्यांबरोबर प्रवास करीत असतां रस्त्यामध्यें एक नदी लागली. तेव्हां एका शिष्याला तो म्हणाला, 'बेटा, नजीकच्या शेतांत कोणी मनुष्य दिसतो आहे. तर नदीला उतार कोठून आहे हें त्याच्याकडे जाऊन त्याला विचारून

ये.' मनुष्य संन्यासपंथी होता. त्यानें कॉन्फ्यूशियसच्या शिष्याला ओळखिलें आणि कॉन्फ्यूशियसला टोमणा मारण्याची आलेली संधि पाहून म्हटलें, "राज्यांत सर्वत्र बेबंदशाही माजली आहे. आणि तिला कोणी पायबंद घालूं शकत नाहीं. एका राजानें मानिलें नाहीं तर तुझा गुरु दुसऱ्या राज्यांत जातो. तूं अशा भटक्याचा अनुयायी होण्यापेक्षां जगापासून दूर जाऊन बसणाऱ्याचा अनुयायी होणें चांगलें नाहीं काय ?"

शिष्यानें येऊन त्याचें हें उत्तर आपल्या गुरूला सांगितलें. त्यावर गुरूनें म्हटलें, " जगापासून अलग होऊन पशुपक्ष्यांची संगति धरावी ही गोष्ट तर अशक्य आहे. पशुपक्ष्यांचा आणि आपला काय संबंध ! संकटांत सांपडलेल्या माणसांना सोडून मी दुसऱ्या कोणाशीं आपला संबंध जोडूं ? सर्वत्र पसरलेली अंदाधुंदी नाहींशी करण्याकरितां तर माझ्या श्रमाची आवश्यकता आहे. जर राज्यांत सुनीति चालत असती तर त्याला सुधारण्याकरितां माझ्या श्रमाची कांहींच गरज नव्हती."

मॅन्सियस नांवाचा दुसरा एक महापुरुष चीनमध्यें होऊन गेला. तो कॉन्फ्यूशियसचा अनुयायी होता. त्या काळची परिस्थिति कशी होती तें वर्णन करितांना त्यानें लिहिलें आहे, "जग अतिदुःखी होऊन बसलें होतें. सत्य सिद्धांतांचा नाश झाला होता. विपरीत ज्ञानाचा काथ्याकूट आणि जुलमाचा जोर वाढला होता. प्रधान राजाचा आणि पुत्र पित्याचा खून करीत होते. हें सर्व पाहून कॉन्फ्यूशियसचें रक्त उसळून आलें आणि त्यानें सुधारणेचा झेंडा फडकाविला."

कॉन्फ्यूशियसच्या हयातींत त्याच्या कार्याला एवढी मोठीशी प्रतिष्ठा लाभली नाहीं. परंतु त्याच्या मृत्यूनंतर थोड्याच काळांत चिनी प्रजेनें

त्याला 'परिपूर्ण, प्रतापी, पुण्यश्लोक' अशी गौरवशाली विशेषणें अर्पण केलीं. चिनी बादशहांनीं त्याचा सन्मान आणि गौरव केला. चीनचा हा लोकप्रिय महात्मा चिनी प्रजेच्या राष्ट्रपित्यासमान आहे. चीनची प्राचीन संस्कृति समजून घेऊन त्यानें चीनचा अमर आत्मा घडविला आहे. आज अडीच हजार वर्षांनंतरहि तो आपल्या देशबांधवांच्या हृदयांत अमर आहे. आणि ते सर्व खालील चरण अंतःकरणपूर्वक सदैव गात आहेत :

'कॉन्फ्यूशियस, कॉन्फ्यूशियस;
हा किती मोठा होता!
याच्यापूर्वीं दुसरा कोणी कॉन्फ्यूशियस नव्हता;
त्याच्यानंतर कोणी झाला नाहीं.
कॉन्फ्यूशियस, कॉन्फ्यूशियस;
हा किती मोठा होता!'

—मूळ गुजरातीवरून

[ १९ ]

## कबीर आणि नानक

श्री. **मगनभाई देसाई**, कार्यवाह, गुजरात विद्यापीठ

१

आपल्या देशांत १२ ते १६ शतकांपर्यंतच्या काळांत जे अनेक संत होऊन गेले त्यांपैकीं कबीर व नानक यांचीं नांवें कांहींशीं विशेष प्रख्यात आहेत. हा कालखंड म्हणजे आपल्या देशांत इस्लामधर्म

आणि मुसलमानी राज्य यांच्या उत्कर्षाचा समय होता. हे दोन महात्मे आपल्या काळांतील हिंदु आणि मुसलमान दोन्ही समाजांत लोकप्रिय आढळतात. यांच्या अनुयायांत दोन्ही धर्मांचे लोक होते. या दोघां महात्म्यांच्या मृत्यूविषयीं एक सारखीच लोककथा रूढ आहे, तीवरून तुम्हांला हें अचूक समजून येईल.

कबीरांनीं जेव्हां देहत्याग केला तेव्हां त्यांच्या हिंदू आणि मुसलमान शिष्यांत वाद सुरू झाला. हिंदू म्हणाले "आमच्या गुरूच्या शवाचें आम्ही दहन करणार." कबीरांचे मुसलमान भक्त म्हणूं लागले, "नाहीं, आम्हांला त्यांचें दफन करूं दिलें पाहिजे. आम्ही त्यांना कबरेंत पुरणार." हा वाद नंतर वाढतच गेला. एका भल्या भक्तानें मध्यें पडून म्हटलें, "बांधव हो, एका गुरूच्या चेल्यांनीं याप्रमाणें भांडावें हें कांहीं आपणांला शोभत नाहीं. चला, आपण सर्वजण अगोदर आपल्या प्रिय गुरुजींचें दर्शन घेऊं." दर्शन घेण्यासाठीं शवावर टाकलेली चादर ऊर्फ कफन दूर करण्यांत आलें. तेव्हां एक आश्चर्यकारक चमत्कार घडलेला सर्वांनीं पाहिला. शवाच्या ऐवजीं चादरीखालून फुलांचा ढीग निघाला! भांडणाचा निकाल सोप्या रीतीनें झाला. अर्धीं फुलें हिंदूंनीं व अर्धीं मुसलमानांनीं घेतलीं. या गोष्टीवरून एवढें कळतें कीं, कबीरांना हिंदु व मुसलमान दोन्ही जातींत मान्यता होती.

अशीच गोष्ट नानकांच्या मरणाविषयींही सांगण्यांत येते. त्यांच्या-बद्दल एक प्रचलित दोहा देखील हाच अर्थ दर्शविणारा अजूनही म्हटला जातोः—

गुरु नानकशाह फकीर
हिंदूका गुरु, मुसलमानका पीर

२

कबीर आणि नानक यांच्यांत कबीर प्रथम जन्मास आले होते. त्यांच्या चरित्रासंबंधीं खात्रीलायक माहिती थोडी मिळते. जी मिळते तिच्याबद्दल विद्वानांत बराच मतभेदही आहे. त्यांचा जन्म इ. स. १३९८ सालीं एका विधवा ब्राह्मण बाईच्या पोटीं झाला होता असें म्हणतात. त्या बाईनें आपली बेअब्रू लपविण्याकारितां बाल-कबिराला जन्मतांक्षणींच सोडून दिलें. काशीजवळ राहणाऱ्या नीमा व नीरू नांवाच्या मुसलमान कोष्टी दांपत्यानें तें मूल पाहिलें आणि त्यास आपल्या घरीं आणिलें. त्यांनीं त्याला वाढवून मोटें केलें. अशा रीतीनें कबीरांचे पालक आईबाप मुसलमान कोष्टी होते. कित्येक म्हणतात कीं तेच त्यांचे जन्म देणारे आईबाप होते. या बाबतींत खरें काय आहे त्याचा निर्णय करणें कठीण आहे. परंतु ते मुसलमान कोष्टयाच्या घरीं लहानाचे मोठे झाले, आणि विणकाम करून आपला निर्वाह करीत एवढी गोष्ट मात्र सर्वांना मान्य आहे.

कबीरांच्या वेळीं रामानंद नांवाचे एक प्रख्यात सत्पुरुष काशींत आपल्या मठांत राहात असत. सर्व वर्णांचे हिंदू त्यांचे शिष्य होऊं शकत. न्हावी, जाट, शेतकरी, चांभार, रामोशी यांसारखेही त्यांचे शिष्य होते. लहानपणापासून कबीर धर्मपरायण होते. त्यांच्या मनांत आलें. “मलाही रामानंदाचा शिष्य झालें पाहिजे.” पण मुसलमान म्हटलेल्या कबीरांना कोण मंत्र देणार? कोणी तरी त्यांना उपाय सुचविला.

रामानंद रोज पहाटे गंगानदीवर स्नानसंध्या करण्यास जात. कबीर एके दिवशीं त्यांच्या मार्गातील गंगाघाटाच्या एका पायरीवर मध्येंच पडून राहिले. काळोखांत रामानंदांचा पाय त्यांच्यावर पडला,

आणि तोंडांतून उद्गार निघाले, ‘ अरे राम, कोणी चिरडलें कीं काय !’ कबीर तात्काळ उठून उभे राहिले व गुरुजींना साष्टांग नमस्कार घालून घरीं गेले. तेव्हांपासून त्यांनीं असें मानलें कीं, मला गुरुजींनीं राममंत्र दिला आणि चरणरजांनीं पावन केलें. नंतर तो मंत्र जपत ते आपली साधना करूं लागले.

कबीरांचीं भजनें फार लोकप्रिय आहेत हें तुम्हांला माहीतच आहे. किनरीवाल्यांसारख्या सामान्य लोकांपासून तों कविवर रवीन्द्रनाथ टागोरपर्यंत सर्व प्रकारच्या लोकांना कबीरांचीं भजनें आवडतात. तीं लौकिक हिंदी भाषेंत आहेत. त्यांची हृदयवेधक सरळ भाषा सर्वांना मुग्ध करिते, आणि मधुर संगीतांत तीं गातां येतात. त्यामुळें त्यांतील भाव सुद्धां ताबडतोब मनावर उमटतात. गुरु नानक सुद्धां मोठे भजनी होते. ते सुद्धां भजनें आळवीत. मीराबाई, नरसिंह मेहता, कबीर, नानक, सूरदास, तुलसीदास वगैरे अनेक भक्तांची साधी लोकभाषा आणि संगीतमय भक्ति हें एक त्यांचें मोठें वैशिष्ट्य आहे. त्यामुळें त्यांना सामान्य जनतेंत खूप खोल प्रवेश करितां आला आहे. कबीर व नानक यांची महती देखील याच गोष्टींत आहे. ईश्वर एकच आहे आणि त्याची भक्ति केली पाहिजे. त्याचप्रमाणें साधें, श्रमाचें आणि नीतिपरायण जीवन आचरिलें पाहिजे हें या भक्तीचें अंग आहे. असा साधा उपदेश ते करीत, आणि असा उपदेश ते जातपात किंवा धर्मभेद यांचा विचारही मनांत न आणतां मनुष्यमात्रास करीत. आज सुद्धां कबीरांचे शिष्य सामान्य लोक आहेत. ते तंबोऱ्यावर भजनें गाऊन उत्सव करितात; कबीरवाणीचा ‘बीजक’ नांवाचा ग्रंथ नित्य वाचतात. त्यांना कबीरपंथी म्हटलें जातें.

गुरु नानकांच्या अनुयायांना शीख म्हणतात. ते स्वतःची एक वेगळीच जात मानतात. त्यांचें मूळ ठिकाण पंजाब प्रांत होय. आतां त्यांचे आदिगुरु नानक यांचा थोडासा इतिहास पाहूं.

३

गुरु नानक यांचा जन्म इ. स. १४६९ मध्यें लाहोर जवळच्या तालवंडी नांवाच्या एका लहानशा गांवांत झाला होता. या गांवास आज नानकाना म्हणतात, आणि आपल्या आदिगुरूचें जन्मस्थान म्हणून शीख लोक त्यास यात्रेचें स्थळ मानतात. ते इ. स. १५३९ त करतारपूर नांवाच्या एका गांवीं मरण पावले. हें करतारपुर गांव गुरु नानकांनींच वसविलें होतें, आणि तेथें त्यांनीं आपल्या आयुष्यांतील शेवटचीं वर्षें शेतकऱ्याच्या पेशांत घालविलीं. तें गांव सुद्धां आज शीखांच्या यात्रेचें एक स्थळ समजलें जातें.

गुरु नानक जन्मानें हिंदु होते, आणि विचारानें सुधारक होते. लहानपणापासून त्यांना धर्माचें खरें रहस्य जाणून घेण्याची तळमळ वाटत होती. नरसिंह मेहताप्रमाणें ते सुद्धां लहानपणीं शिकण्याऐवजीं साधुसंतांच्या संगतींत भटकत. त्यांची सेवाचाकरी करीत आणि त्यांतच आनंद मानीत. यामुळें त्यांना शिक्षण कांहीं संपादन करितां आलें नाहीं. पण त्यांनीं जग पुष्कळ पाहिलें. त्यावरून खरा धर्म म्हणून आज एकाहि धार्मिकाजवळ राहिला नाहीं, धर्माच्या नांवानें त्याचें ढोंगच चालत आहे हें त्या चतुर व विचारशील पुरुषाला समजून आलें.

सुलतानपूर नांवाच्या एका गांवीं नानकांचा मेहुणा सरकारी नोकरी करीत होता. त्याच्या शिफारशीनें नानक यांना देखील तेथलि

सुभेदाराच्या कोठाऱ्याचें काम मिळालें होतें. त्यामुळें नानक वयांत आले तेव्हां सुलतानपुरांत रहात होते. रोज सकाळीं ते नदीवर स्नानसंध्या करण्यास जात आणि नोकरीचा वेळ संपल्यावर संतसमागमांत राहिलेला काळ घालवीत. त्यांची अशी दिनचर्या पाहून सर्व लोक त्यांस साधुपुरुष मानीत.

एके दिवशीं सकाळीं ते संध्या करावयास गेले. तीन दिवस झाले तरी ते तिकडून परत आले नाहींत. त्यावरून लोकांना वाटलें कीं ते मरण पावले. पण चौथ्या दिवशीं ते परत आले. लोकांनीं विचारपूस करण्यास सुरुवात केली. " तुम्ही कोठें गेलां होतां ? कोठें होतां ? " पण नानक मुखांतून एकहि अक्षर काढीनात ! सर्वांना वाटलें कीं, ते वेडे झाले. पण वस्तुतः असें घडलें होतें कीं, या तीन दिवसांच्या एकांतांत नानकांना धर्माचें रहस्य प्राप्त झालें. एक अकाल सत्यरूप प्रभु आहे, आणि बाकी सर्व मायाजाळ आहे, असें त्यांना ज्ञान झालें. दुसऱ्या दिवशीं नानकांनीं एकच वाक्य उच्चारिलें, " कोणी हिंदु नाहीं किंवा कोणी मुसलमान नाहीं. " आणि नंतर फकीराचीं वस्त्रें धारण करून ते सुलतानपुराहून निघून गेले.

यापुढें ते देशाटन करूं लागले. त्याकाळीं देशाटन करणें म्हणजे अनेक तीर्थक्षेत्रांना जाणें. नानक साऱ्या देशभर फिरले इतकेंच नव्हे तर ते मक्केस देखील जाऊन आले होते, असें इतिहासकार सांगतात

एकदां ते हरद्वारला गेले होते. त्यावेळीं तेथें मोठी यात्रा जमली होती. नदीच्या पाण्यांत पूर्वेकडे तोंड करून उभे राहून लोक पितरांना पाण्याची अंजलि देत होते. नानकांनीं पश्चिमेकडे तोंड करून आपल्या मांड्यांवर पाणी ओतण्यास सुरुवात केली. जवळ उभे राहिलेले पंड्ये हें पाहून विचारूं लागले, " अरे बाबा, हें काय

करीत आहेस ? " नानकांनीं थंडपणें उत्तर दिलें, " माझ्या गांवच्या शेतांना पाणी देत आहें. "

" अरे मूखा, गांवच्या शेतांना येथून पाणी कसें मिळेल ? " पंड्यांनीं हंसून म्हटलें.

नानक म्हणाले, " कां बरें ? तुम्हांला त्या लोकांच्या पितरांना जर स्वर्गापर्यंत पाणी पोंचवितां येतें, तर माझें शेत तर जवळच आहे ! "

असे अनेक गमतीचे प्रसंग नानकांच्या यात्रेंत घडून आले. मक्केचा एक प्रसंग ऐकण्यासारखा आहे. गुरु नानक मक्केला गेले होते तेव्हां ते एके दिवशीं रात्रीं मक्केतील पवित्र शिळेच्या-काबाच्या मशिदींत झोंपले होते. सकाळीं एका मुल्लानें पाहिलें कीं, कोणी प्रवासी काबाकडे पाय करून झोंपला आहे. ते नानकच खुद्द होते. त्या मुल्लानें नानकांना म्हटलें, " अरे प्रवाशा, तूं कोणीकडे पाय करून झोंपला आहेस त्याचें तुला भान आहे का ? काबाकडे पाय करतात का कधीं ? "

नानकांनीं म्हटलें, " बाबा, मग ज्या बाजूस ईश्वराचें धाम नसेल तिकडे तूं माझे पाय कर. " हें ऐकून मुल्लाजींना राग आला आणि त्यांनीं त्यांचे पाय उचलून दुसऱ्या बाजूला फिरविले. पण काय चमत्कार ! मुल्लाजींना आतां त्या बाजूस काबा दिसूं लागला. तेव्हां त्यांनीं पुन्हां पाय फिरविले; पुन्हां तोच देखावा ! आतां मात्र मुल्ला घाबरला. त्याला वाटलें, हा कोणी तरी ईश्वराचा अवलिया आहे. त्यानें नानकाची क्षमा मागितली. नानक उठून बसले व त्यांनीं त्याला धर्माचें रहस्य समजावून दिलें. अमुक क्रिया करावी किंवा करूं नये, अमुक खावें किंवा खाऊं नये, असल्या गोष्टींवर धर्माचें खरें रूप अवलंबून नसतें. एक अल्ला किंवा ईश्वर आहे आणि पवित्र जीवनाचे

योगें तो प्रसन्न होतो. हें समजून सर्वांनीं त्याप्रमाणें वागावें हें अल्लाला आवडतें.

याप्रमाणें ते हिंदु-मुसलमान असा भेदभाव न करितां लोकांना सत्यधर्म शिकवीत. या बाबतींत नानक व कबीर यांचें एकसारखेंच वर्तन असे. याप्रमाणें धर्माच्या सत्य ज्ञानाच्या द्वारा जातीजातींत, धर्माधर्मींत एकी साधून देण्याचा त्यांचा अमर संदेश आज सुध्दां ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

—मूळ गुजरातीवरून.

[ २० ]

## साहित्य-दर्शिका

( १ ) Educational Reconstruction : पृष्ठें २९६, किंमत १॥ रु. प्रकाशक : हिंदुस्थानी तालिमी संघ, सेवाग्राम, वर्धा ( सी. पी. ). या पुस्तकांत म. गांधींचे 'हरिजनां'तील लेख, वर्धा राष्ट्रीय शिक्षण परिषदेचा संपूर्ण वृत्तांत आणि जाकिर हुसेन कमिटीचा रिपोर्ट व त्या कमिटीनें योजिलेला संपूर्ण अभ्यासक्रम प्रकाशित करण्यांत आला आहे. वर्धा-योजना समजून घेण्याला हें एकच पुस्तक पुरेसें आहे.

( २ ) Basic National Education : ३ री आवृत्ति, किंमत ८ आणे, पृष्ठें २०४. प्रकाशक : हिंदुस्थानी तालिमी संघ. या छोट्या पुस्तकांत जाकिर हुसेन कमिटीचा रिपोर्ट आणि संपूर्ण अभ्यासक्रम छापिलेला आहे.

या दोन्ही पुस्तकांच्या हिंदी आणि गुजराती आवृत्ति निघाल्या आहेत.

(३) The Wardha Scheme of Education; C. G. Varkey. किंमत १॥. रु. प्रकाशक : ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेस. पृष्ठसंख्या १७९. मद्रास प्रांतांतील मार्जी शिक्षणमंत्री श्री. वार्की यांनीं प्रस्तुत पुस्तकांत वर्धा-योजनेचें स्वरूप अतिशय व्यवस्थितपणें स्पष्ट करून दाखविलें आहे. लेखक हे स्वतः एक अनुभवी शिक्षणतज्ज्ञ असल्यामुळें त्यांनीं या योजनेचें केलेलें विवरण मूल्यवान् झालें आहे. म. गांधींचे लेख आणि जाकिर हुसेन कमिटीचा रिपोर्ट यांतील शब्दांतच हें विवरण मांडिलेलें आहे, हा या पुस्तकाचा विशेष होय. या पुस्तकाच्या वाचनानें वर्धा-योजनेसंबंधींचे सगळे गैरसमज दूर होण्यासारखे आहेत.

(४) **मूळ उद्योग-कातणें** : लेखक-विनोबाजी. पृष्ठें ६२, किंमत ६ आणे. प्रकाशक : हिंदुस्थानी तालिमी संघ. या पुस्तिकेंत कातण्याच्या पाठ्यक्रमाचें शिक्षकांसाठीं स्पष्टीकरण करण्यांत आलेलें आहे. कातण्याचा शास्त्रीय आणि शैक्षणिक दृष्टीनें यांत जो विचार सूत्ररूपानें मांडलेला आहे तो वर्धा-शिक्षकांनीं अभ्यासपूर्वक आत्मसात करण्यासारखा आहे. सामान्य वाचकांना सूत कातण्याच्या क्रियेंत केवढें शास्त्र भरून राहिलेलें आहे व शैक्षणिक दृष्टीनें त्या क्रियेचा केवढा उपयोग होण्यासारखा आहे हें या पुस्तिकेवरून नीट कळून येईल.

(५) **शेती-शिक्षण.** भाग १ ला-लेखक : शं. रा. भिसे, बोर्डी. किंमत बारा आणे. या पुस्तकांत वर्धायोजनेप्रमाणें पहिल्या पांच

इयत्तांचा शेतीचा शिक्षणक्रम देण्यांत आलेला आहे. शिक्षकांसाठीं हें पुस्तक लिहिलेलें असून यांत शास्त्रीय दृष्टि, संक्षिप्तपणा आणि आकर्षक भाषाशैली हे मुख्य गुण आढळतात.

(६) **वर्धा केळवणीनो प्रयोग** (गुजराती)–लेखक–नरहरिभाई परीख. पृष्ठें १०७. किंमत ६ आणे. खेडा जिल्ह्यांतील थामणा नामक गांवीं वर्धा-योजनेची शाळा निघाली आहे. तिचा पहिल्या तिमाहीचा अहवाल यांत प्रथम दिला असून नंतर बालवर्ग, पहिली, दुसरी आणि तिसरी यांचे अभ्यासक्रम तपशीलवार दिले आहेत. या पुस्तकांतील बालवर्गाचा अभ्यासक्रम थोड्याफार फरकानें मुंबई सरकारच्या बेसिक कमिटीनें स्वीकारला आहे.

(७) **नवीन शिक्षणाचें अंतरंग**–लेखक : हरि कृष्ण मोहनी. प्रकाशक : शं. मो. काबरे, एरंडोल (पूर्व खानदेश). पृष्ठें २६. किंमत ४ आणे. या लहानशा पत्रकांत वर्धा–योजनेची कल्पना थोडक्यांत वर्णिली आहे.

(८) An Intelligent Man's Guide to Wardha Scheme of Education:– लेखक श्री. बाबूलाल गुप्त, एम्. ए. प्रकाशक : नॅशनल लिटरेचर पब्लिशिंग सोसायटी, अलिगड (यू. पी.). पृष्ठसंख्या २२४. श्री. वार्की यांच्या पुस्तकाच्या धर्तीवर हें पुस्तक लिहिलेलें आहे. मात्र या पुस्तकांत वर्धा-योजना अधिक तपशीलवार रीतीनें विशद केलेली आहे. या पुस्तकांत वर्धा–शाळांतील वर्गांचीं अनेक छायाचित्रें दिलेलीं आहेत. यामुळें वर्धा-योजनेचें यथार्थ आकलन होण्याला चांगलें साह्य होण्यासारखें आहे.

(९) The Latest Fad (Basic Education):— लेखक : आचार्य कृपालानी. मूल्य १. रु. प्रकाशकः– हिंदुस्थानी तालिमी संघ. या

पुस्तकाला म. गांधींनीं भूमिका लिहिली आहे. ग्रंथकार हे राष्ट्रीय शिक्षण, खादी-निर्मिति आणि कॉंग्रेस राजकारण या क्षेत्रांत अत्यंत नाणावलेले कार्यकर्ते असल्यामुळें हें पुस्तक गांधीजींच्या विचारपद्धतीचा विवेचक परिचय करून देतें.

( १० ) **वर्ध्याची शिक्षण-योजना**:-लेखक प्रो. **द. वा. पोतदार**

( ११ ) **वर्धा शिक्षण-योजनेची मीमांसा** :-लेखक श्री. **न. रा. पारसनीस** एम्. ए., बी. टी., टी. डी. किंमत २ आणे.

या छोट्या पत्रकांतून वर्धा-योजनेची विस्तृत चर्चा या लेखकांनीं सहानुभूतिपूर्वक केलेली आहे.

( १२ ) The activity School :—संपादकः सैयदेन. प्रकाशकः किताबिस्तान, अलाहाबाद. पृष्ठें २७२. किंमत ६ रु. जिनिव्हाच्या रूसो इन्स्टिटयूटमधील शिक्षणशास्त्राचे प्राध्यापक डॉ. Adolph Ferriere यांच्या "L' Ecole Active" या मूळ फ्रेंच ग्रंथाची ही हिंदुस्थानासाठीं इंग्लिश आवृत्ति तयार करण्यांत आलेली आहे. श्री. सैयदेन हे जाकिर हुसेन कमिटीचे सभासद असून सध्यां काश्मीर संस्थानचे शिक्षणाधिकारी आहेत. वर्धा-योजनेचे शास्त्र समजून घेण्याला सदर ग्रंथ अतिशय उपयुक्त होईल. पाश्चात्य जगांत शैक्षणिक विश्वांत जे नवीन सिद्धांत विद्वन्मान्य झाले आहेत त्यांचें स्वरूप या ग्रंथांत सुबोधपणें मांडलेलें दिसेल. वर्धा-योजनेचा पाया शास्त्रशुद्ध आहे, अशी खात्री होण्याला या पुस्तकाचा फार उपयोग होईल.

( १३ ) The Thinking Hand:—लेखक : J. G. Legge. प्रकाशक : मॅकमिलन आणि कं. पृष्ठें २१८. किंमत रु. ५ आ. २ पै ६ या पुस्तकाचे लेखक एक शिक्षणतज्ज्ञ असून त्यांनीं या पुस्तकांत ' कृतिद्वारा

शिक्षण ' या तत्त्वाचा पुरस्कार केला आहे. यामुळें वर्धा-योजनेची दृष्टि यांत समर्थित झाली आहे.

( १४ ) Education for Life:—लेखक—Armstrong. प्रकाशक : गुजरात विद्यापीठ. पृष्ठें ४८. किंमत ३ आणे. हॅम्प्टन इन्स्टिटयूटचे संस्थापक जनरल आर्मस्ट्रॉंग यांचीं विचारसूत्रें यांत एकत्रित करण्यांत आलेलीं आहेत. उद्योगानें बुध्दीचा आणि चारित्र्याचा विकास होतो या तत्त्वाचा त्यांनीं जोरानें पुरस्कार केला आहे.

( १५, १६ ) **राष्ट्रीय शिक्षण पाठ—बालबोधिनी व पुस्तक पहिलें** : लेखक—प्रो. वि. भि. कोलते, उमरावती. प्रकाशक—कोलते बंधू, मलकापूर ( वऱ्हाड ). मूल्य अनुक्रमें २ आणे व ३ आणे. बालवर्ग व पहिली या दोन वर्गांसाठीं वर्धा-योजनेनुसार पाठय पुस्तकें म्हणून प्रथमच हीं दोन पुस्तकें निर्माण झालीं आहेत. वर्धा—शाळांच्या शिक्षकांना भाषाशिक्षणाला या पुस्तकांचा चांगला उपयोग होऊं शकेल. वर्धा—योजनेंत भाषा म्हणजे केवळ साहित्य मानिलेलें नाहीं. जीवनाचे सर्व विषय भाषेनें प्रकाशित करावयाचे आहेत. या दृष्टीनें या पुस्तकांत अद्यापि बऱ्याच उणीवा वाटतात. बालबोधिनी तर सर्वच मूलोद्योगावर रचावयाची आहे. तथापि शास्त्रशुद्ध पुस्तकें तयार होईपर्यंत यांचा उपयोग करून घेण्यास हरकत नाहीं.

( १७ ) Card-board Modelling : लेखक—लक्ष्मीश्वर सिंह. प्रकाशक—हिंदुस्तानी तालीमी संघ, सेवाग्राम, वर्धा. पृष्ठसंख्या १०८. मूल्य १२ आणे.

जाकिर हुसेन कमिटीनें सूतकामाबरोबरच कार्ड—बोर्ड, लाकूड आणि धातू यांच्या कामाचा संपूर्ण अभ्यासक्रम आंखलेला आहे. या अभ्यासक्रमाचे दोन विभाग केलेले आहेत. पहिल्या विभागांत निवळ

कार्डबोर्डच्या कामाचा समावेश होतो. पहिल्या दोन इयत्तांना मूलोद्योग म्हणून हा अभ्यासक्रम शिकवितां येण्यासारखा आहे. या अभ्यासक्रमाचें यथासांग विवरण करणारें वरील पुस्तक असून त्यांत समवायपद्धतीनें इतर विषय कसे शिकवितां येतील याचेंहि उत्तम दिग्दर्शन करण्यांत आलें आहे. या पुस्तकाचे लेखक या विषयांतले उत्तम तज्ज्ञ आहेत. त्यांनीं युरोपमध्यें राहून विशेष अनुभव मिळविला आहे. रवींद्रनाथांच्या शांतिनिकेतनमध्यें ते काम करीत होते. तेथून त्यांना वर्धा येथें मुद्दाम बोलाविण्यांत आलें असून तेथील अध्यापन-केंद्रांत ते या विषयाचें अध्यापन करीत असतात. म. गांधींनीं आपल्या 'हरिजनां' त या पुस्तकाचा पुरस्कार केला असून त्यांत म्हटल्या-प्रमाणें हें पुस्तक सर्वच शिक्षक आणि प्रौढ विद्यार्थी यांनीं अवश्य संग्रहीं ठेवावें असें आहे.

(१८) **ओटना व धुनना** (हिंदी): लेखक—श्री. सत्यन्, नालवाडी आश्रम, वर्धा. प्रकाशक—हिंदुस्तानी तालीमी संघ, सेवाग्राम, वर्धा. मूल्य ६ आणे.

या लहानशा पुस्तकांत रेंचण्या-पिंजण्याविषयींची उपयुक्त माहिती थोडक्यांत दिली आहे. या पुस्तकाचे लेखक या क्रिया स्वतः जाणणारे असून खादीविद्येंतील एक नाणावलेले संशोधक आहेत. श्री. मथुरादास भाई यांचें 'मध्यम पिंजण' (गुजराती) नांवाचें एक चांगलें पुस्तक यापूर्वी नवजीवन प्रकाशन मंदिरानें प्रसिद्ध केलेलें आहे. या दोन्ही पुस्तकांचा वर्धा-योजनेंतील शिक्षकांना व खादीकार्य शिकू इच्छिणाऱ्यांना विशेष उपयोग होण्यासारखा आहे.

(१९, २०) **समाज-विज्ञान; कांहीं उपकारी माणसें**: लेखक—सौ. उषा कोलते, बी. ए., अमरावती. प्रकाशक—अरुण प्रकाशन, मलकापूर (वऱ्हाड). मूल्य प्रत्येकीं ४ आणे.

प्रो. कोलते यांनीं ‘ बालबोधिनी ’ व ‘ पहिलें पुस्तक ’ अशीं दोन पुस्तकें वर्धा-योजनेसाठीं लिहिल्याचें पूर्वी आलेंच आहे. तिसऱ्या वर्गासाठीं समाजपरिचय या विषयांत कित्येक ऐतिहासिक आणि पौराणिक व्यक्तींचा परिचय करून देण्यास सांगितलें आहे. त्यासंबधींचे पाठ ‘ समाज-विज्ञानांत ’ त दिले असून चौथ्या वर्गासाठीं नेमलेल्या चरित्रांपैकीं कांहीं चरित्रें ‘ उपकारी माणसें ’ या पुस्तकांत दिलेलीं आहेत. सौ. कोलते यांच्या पुस्तकांतहि सोपेपणा व रंजकता हे गुण सारखेच आढळून येतात. हीं दोन्ही पुस्तकें वर्धा-शाळांतील शिक्षकांनाच काय पण सर्वच शिक्षकांना उपयोगी पडण्यासारखीं आहेत.

( २१ ) One Step Forward: प्रकाशक-हिंदुस्तानी तालीमी संघ, सेवाग्राम, वर्धा. पृष्ठसंख्या २४+२९२. मूल्य एक रुपाया चार आणे.

१९३९ च्या ऑक्टोबरमध्यें पुणें येथें भरलेल्या मूलोद्योगी राष्ट्रीय शिक्षण परिषदेचा समग्र वृत्तांत या पुस्तकांत संकलित करण्यांत आलेला आहे. यांत स्वागताध्यक्ष श्री. बाळासाहेब खेर, उद्घाटक आचार्य कृपालानी, अध्यक्ष प्रो. सैयदेन यांचीं भाषणें, परिषदेंत वाचण्यांत आलेले निबंध व त्यांवर झालेली चर्चा, वर्धा-योजनेवर परिषदेचे वेळीं शिक्षण-तज्ज्ञांचीं झालेलीं व्याख्यानें आणि परिषदेला जोडून भरविलेल्या प्रदर्शनाचें महत्त्व दर्शित करणारे लेख, वर्धा-योजनेच्या प्रयोगाचा संक्षिप्त वृत्तांत इत्यादि विषय आले असल्यामुळें वर्धायोजनेचें तोंपर्यंतचें स्वरूप जाणण्याला याचा उत्तम उपयोग होणार आहे.

‘ एक कदम आगे ’ या नांवाखालीं या वृत्तांताचा हिंदी अनुवाद प्रसिध्द झाला असून त्याचें मूल्यही वरीलप्रमाणेंच आहे.

( २२ ) **सामान्य शास्त्रीय विज्ञान.** वर्ग १ ला ( शिक्षकांकरितां ) पृष्ठे ७०, किं. ०-८-०

**( २३ ) सामान्य शास्त्रीय विज्ञान** वर्ग २ रा ( शिक्षकांकरितां ) पृष्ठें ७९, किं. ०–८–०

वर्धा येथील विद्यामंदिर ट्रेनिंग इन्स्टिटयूटमधील श्री. लीलावती चाफेकर, बीएस्. सी., बी. टी. यांनीं शिक्षकांसाठीं हीं पुस्तकें तयार केलीं असून ठाकूर आणि कं. लि. नागपूर यांचेतर्फे तीं प्रकाशित करण्यांत आलीं आहेत. जाकिर हुसेन कमिटीनें आपल्या अभ्यासक्रमांत सामान्य–विज्ञान ( Gerenal Science ) हा विषय ठेविलेला आहे. त्या विषयावर शिक्षकांकरितां वर्गवार पुस्तकें लिहिण्याचा संकल्प धरून पहिल्या दोन वर्गांसाठीं हीं दोन पुस्तकें तयार करण्यांत आलीं आहेत. पहिल्या पुस्तकांत प्रथम सामान्य विज्ञानाची व्याप्ति व त्याचे उद्देश सांगून समवायपद्धतीनें तो विषय शिकविण्याची दिशा दर्शविली आहे. नंतर मुख्य पिकें, झाडें, जनावरें आणि पक्षी यांचा परिचय करून दिलेला आहे. दिशा, ऋतू, हवा, पाणी, अग्नि, स्वच्छता, इत्यादि गोष्टींचा प्रकरणशः विचार करण्यांत आला असून शेवटच्या प्रकरणांत कालगणना, चंद्राच्या कला, अयनें, ध्रुव व सप्तर्षी यांची माहिती दिलेली आहे. प्रत्येक प्रकरणांत हस्तव्यवसाय, निसर्ग आणि समाज या तीनहि केंद्रांशीं आणि त्याचप्रमाणें स्वभाषा, गणित, समाजपरिचय, रेखन, इत्यादि अन्य बौद्धिक विषयांशीं समवाय कसा करावयाचा तें चांगलें दाखविलें आहे. एकूण विषयाची महिनेवार वांटणी कशी करावी तें दर्शविणारें एक पत्रक आणि नमुन्याचे दोन पाठ परिशिष्टांत जोडिले आहेत. दुसऱ्या पुस्तकाचीहि याच धर्तीवर रचना करण्यांत आलेली आहे. त्यांत दुसऱ्या वर्षाच्या अभ्यासक्रमाचें तपशीलवार विवेचन आहे. हीं दोनहि पुस्तकें वर्धाशाळांतील शिक्षकांना उपयुक्त होतील. इतर शिक्षकांनाहि यांचा चांगला उपयोग होण्यासारखा आहे.

(२४) **वर्धा शिक्षण-योजना** : लेखक-लीलावती चाफेकर. प्रकाशक-स्वराज्यमाला, अकोला. मूल्य २ आणे.

या लहानशा पुस्तकांत वर्धा-योजनेची थोडक्यांत कल्पना येईल असा वृत्तान्त दिलेला आहे. नागपूर प्रांतांतील माजी शिक्षणमंत्री श्री. गोखले यांची प्रस्तावना जोडलेली आहे.

× × ×

खादी-शास्त्रासंबंधीं आवश्यक अभ्यसनीय पुस्तकांची माहिती खालीं दिली आहे:—

(१) **खादी-मीमांसा** (२ री आवृत्ति) लेखक-बाळूभाई मेहता; प्रकाशक-सुलभ राष्ट्रीय ग्रंथ-माला. पुणें. पृष्ठसंख्या ३९०, किंमत १॥ रु. मराठींत ऐतिहासिक. आर्थिक, राजकीय इत्यादि विविध बाजूंनीं खादीची मीमांसा करणारें आणि वीस वर्षांतील खादीचें कार्य व तंत्र यांचें वर्णन देणारें हें सर्वश्रेष्ठ पुस्तक आहे. या पुस्तकाला अनेक महत्त्वाचीं परिशिष्टें जोडलेलीं आहेत.

(२) **निवडक लेखसंग्रह** (महाराष्ट्र खादी-पत्रिकेंतील) प्रकाशक-मध्यप्रांत-महाराष्ट्र चरखा संघ. पृष्ठसंख्या २१०, किंमत १ रु. खादी-पत्रिकेंत ९ वर्षांत जे महत्त्वाचे हिंदी-मराठी लेख प्रसिद्ध झाले आहेत त्यांचें या पुस्तकांत संकलन करण्यांत आलें आहे. खादीमागील विचार, खादीचें तंत्र आणि खादीचा इतिहास यांची या पुस्तकांत शास्त्रीय चर्चा पाहावयास मिळेल. पुस्तकाला महत्त्वाचीं १९ परिशिष्टें जोडलेलीं आहेत.

(३) **खादी-विद्या-प्रवेशिका** (गुजराती) : नवजीवन प्रकाशन-मंदिर, अहमदाबाद. पृष्ठसंख्या २९०, किंमत १२ आणे. वर्धा-शिक्षण योजनेला आवश्यक असलेली सर्व खादीविद्या या पुस्तकांत संगृहीत

करण्यांत आलेली आहे. गुजरात विद्यापीठामध्यें खादीविद्या शिकवितांना जो अनुभव निर्माण झाला तो येथें एकत्र करण्यांत आला आहे. वर्धा-शिक्षकांना हें पुस्तक संदर्भग्रंथ म्हणून कायमचें उपयोगी होणारें आहे.

(४) **मूळ उद्योग-कातणें** : लेखक--विनोबाजी. किंमत ६ आणे. या पुस्तकाचा उल्लेख मागें आला आहे.

(५) **तकली कैसी कातें** ? (२ री आवृत्ति) लेखक-सत्यन् प्रकाशक--ग्रामसेवामंडळ, : नालवाडी, वर्धा. पृष्ठसंख्या ५०, किंमत २ आणे. या छोट्याशा हिंदी पुस्तकांत विनोबाजींच्या आश्रमांत तकलीनें जी प्रगति केली आहे तिच्या दृष्टीनें तकलीवर कसें कातावें याची अत्यंत शास्त्रशुद्ध माहिती देण्यांत आलेली आहे.

(६) **खादी और गादी की लडाई** : लेखक—विनोबाजी. प्रकाशक-सस्ता साहित्य मंडल, दिल्ली. पृष्ठसंख्या १०६, किंमत २ आणे, या छोटया हिंदी पुस्तिकेंत विनोबाजींचे खादीविषयक १० तात्त्विक लेख दिले आहेत. खादीचें तत्त्वज्ञान समजून घेण्याला यासारखें दुसरें साधन नाहीं.

(७) **Economics of Khaddar**:—लेखक--ग्रेग. प्रकाशक-एस्. गणेशन्, मद्रास. किंमत १॥ रु. खादीच्या अर्थशास्त्राची या पुस्तकांत शास्त्रीय चिकित्सा केलेली असून याचा हिंदी आणि गुजरातीमध्यें अनुवाद प्रसिद्ध झाला आहे.

(८) **Hand-spinning and Hand-Weaving** : लेखक—प्रो. पुणतांबेकर व श्री. वरदाचार. प्रकाशक-अखिल भारतीय चरखा संघ, अहमदाबाद. किं. १ रु. निबंधांत कातण्या-विणण्याचा वेदकालापासूनचा इतिहास दिला आहे.

(९) **Some Aspects of Khadi** : लेखक—गुलझारीलाल नंदा, प्रकाशक—ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी, अलाहाबाद. कॉंग्रेसच्या सुवर्णमहोत्सवाच्या प्रसंगीं प्रसिद्ध झालेल्या या पत्रकांत खादीविषयीं तर्कशुध्द आणि म्हणूनच बुध्दीला पटवून देणारी मीमांसा वाचावयास मिळते.

(१०) **Economics of Khadi** : लेखक-डॉ. राजेंद्रप्रसाद. प्रकाशक—चिटणीस, बिहार चरखा संघ, मुझफरपूर.

(११) **Khadi Manual** : (भाग १ व २) लेखक—सतीशचंद्र दासगुप्त. प्रकाशक—खादी प्रतिष्ठान, कलकत्ता.

पहिल्या पुस्तकांत राजेंद्रबाबूंनीं खादीवरील आक्षेपांचें समर्पक खंडण केलें आहे. दासगुप्तांनीं आपल्या पुस्तकाच्या पहिल्या भागांत खादीची माहिती दिली असून दुसऱ्या भागांत कापसासंबंधीं विस्तृत विवेचन केलें आहे.

(१२) **खादीका इतिहास** : लेखक—पं. गणेशदत्त शर्मा.

(१३) **वेदमें चर्खा** : लेखक पं. सातवळेकर, औंध.

या हिंदी भाषेतील पुस्तकांमध्यें खादीची परंपरा प्राचीन कालापासून कशी चालत आलेली आहे हें वैदिक वचनांच्या आधारें दाखविण्यांत आलें आहें.

(१४) **Charakha Yarn** : लेखक तालचेरकर. लेखक यंत्रशास्त्रज्ञ असून त्यांनीं या पुस्तकांत यांत्रिक सुताशीं हातसुताची तुलना करून आपल्या यांत्रिक आणि शास्त्रीय ज्ञानाच्या आधारें हातसुताचें श्रेष्ठत्व अत्यंत मार्मिकपणें सिध्द केलें आहे.

(१५) **वस्त्रपूर्णा** : लेखक-श्री. कुंदर बलवंत दिवाण, प्रकाशक—श्री. आर्यनायकम्, मंत्री, हिंदुस्तानी तालीमी संघ, सेवाग्राम, वर्धा. पृष्ठसंख्या तीनशें. मूल्य एक रुपाया.

‘ वस्त्रपूर्णा अथवा तकलीकताईचें सांगोपांग विवेचन ’ नांवाचें पुस्तक प्रसिध्द करून हिंदुस्तानी तालीमी संघानें वर्धा-योजनेवरील शास्त्रीय साहित्यांत मोठी महत्त्वाची भर घातली आहे. या पुस्तकांत एकूण दहा प्रकरणें असून दोनशें सदतीस पोटविषयांत तीं विभागलीं आहेत.

प्रथम तकलीचें वैशिष्टय आणि तिचा इतिहास यांचें निवेदन असून दुसऱ्या प्रकरणांत तकलीचें समग्र वर्णन दिलें आहे. तिसऱ्या प्रकरणांत वयनक्षम तंतूंचें वर्णन आलें असून कापसासंबंधीं विविध प्रकारची माहिती एकत्रित केलेली आहे. हें सर्वच प्रकरण अभ्यासकाला उद्बोधक वाटण्यासारखें झालें आहे. चौथ्या प्रकरणांत कातण्यापूर्वी कापसावर ज्या अनेक प्रक्रिया कराव्या लागतात त्यांचें क्रमवार निरूपण आहे. पांचव्यांत तकलीवर कातण्याचे जे विविध प्रकार आहेत त्यांच्याविषयीं माहिती देण्यांत आलेली आहे. सहाव्या प्रकरणाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन विभाग असून त्यांत तकलीच्या अभ्यासाचें क्रमवार व सविस्तर विवेचन दिलें आहे. सातव्यांत तलम सुताचें कातण कसें करितात तें सविस्तर विवेचिलें आहे. हें प्रकरण तर कातण्याच्या कलेंतील अद्‌भुतरम्य विभागाचा परिचय करून देणारें असल्यामुळें सामान्य वाचकासहि अत्यंत मनोरंजक भासल्याशिवाय राहणार नाहीं. आठव्या प्रकरणांत कातण्यासंबंधींचीं अनेक परिशिष्टें दाखल करण्यांत आलीं असून नवव्यांत अनेक उद्बोधक आंकडे दिले आहेत. शेवटच्या प्रकरणांत अनेक कोष्टकें एकत्रित केलेलीं आहेत. या पुस्तकाला विस्तृत सूचि जोडल्यामुळें पुस्तकाची उपयुक्तता फारच वाढली आहे. छपाईच्या चुका शुध्दिपत्रांत दुरुस्त करून दिल्या आहेत.

या पुस्तकांत लहानमोठीं ९५ चित्रें दिलेलीं असून तीं शांतिनिकेतनचे श्री. नीहारचंद्र चौधरी यांनीं काढिलीं आहेत. त्यामुळें विवेचन समजण्यास चांगलीच सोय झाली आहे. पुस्तकाला आचार्य विनोबाजी यांनीं लहानशी पण मोठी मार्मिक प्रस्तावना लिहिली आहे. तकलीचें माहात्म्य वर्णन करणारा विनोबाजींचा एक उतारा आरंभीं घातलेला आहे. आणि थोडे श्लोकहि आद्यंतीं जोडिले आहेत.

तकलीच्या द्वारा बौद्धिक विषयांचा केवढा मोठा भाग शिकवितां यण्यासारखा आहे, याची या पुस्तकावरून सामान्य कल्पना कोणालाहि येऊं शकेल. वस्तुतः तकलींत अनंत ज्ञान भरून राहिलें आहे, व म्हणूनच हें पुस्तक म्हणजे 'एक अल्पतम प्रयत्न आहे.' असें श्री. विनोबाजींनीं आपल्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. तथापि आजच्या स्थितींत या पुस्तकानें वर्धायोजनेंतील शिक्षकांची मोठीच सोय होणार आहे. सामान्य सुशिक्षित वाचकवर्गालाहि या पुस्तकाच्या वाचनानें पुष्कळच मनोरंजक माहिती प्राप्त होईल.

या पुस्तकाचे लेखक श्री. कुंदर दिवाण यांचा अधिकारहि सांगण्यासारखा आहे. विनोबाजींच्या सान्निध्यांत त्यांनीं एक तप काढिलें असून वर्धायोजनेच्या पहिल्या प्रयोगाचा त्यांना वर्षभर अनुभव मिळालेला आहे.

( १६ ) **The Takli Teacher** : लेखक—रिचर्ड ग्रेग व मगनलाल गांधी. प्रकाशक—अखिल भारतीय चरखा-संघ, साबरमती. पृष्ठसंख्या ७२. मूल्य ६ आणे.

हें पुस्तक १९२६ सालीं प्रसिध्द झालेलें असलें तरी अद्यापिहि वाचनीय आहे. यांत तकलीसंबंधीं सर्व तऱ्हेची शास्त्रीय माहिती व्यवस्थितपणें दिलेली आहे. तकलीसंबंधींचीं २३ रेखाचित्रें आहेत.

त्यामुळें यांतील विवेचन सहज समजण्यासारखें झालें आहे. तकलीचा शैक्षणिक दृष्टीनें विचारहि या पुस्तकांत चांगला मांडलेला आहे.

शिक्षणेतिहाससंबंधीं कांहीं पुस्तकें :

( १ ) **प्राचीन भारतीय शिक्षणपध्दति** लेखक:-डॉ. अनंत सदाशिव अळतेकर, एम्. ए., एल्एल्. बी., डी. लिट्. हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस. प्रकाशक-नवभारत ग्रंथमाला, नागपूर, पृष्ठें २१०. मूल्य १॥ रु.

लेखक प्राचीन भारतीय इतिहासाचे व्यासंगी विद्वान असल्यामुळें त्यांनीं लिहिलेला प्राचीन भारतांतील शिक्षणपद्धतीचा हा इतिहास विस्तृत आणि माहितीनें पूर्ण भरलेला झाला आहे. यांत प्राचीन शिक्षणपद्धति आणि विविध शिक्षणसंस्था यांचा व्यवस्थित परिचय करून देण्यांत आला असून शेवटीं या पद्धतीचें ध्येय व तिचे गुणदोष यांचें विवेचन केलेलें आहे.

( २ ) Indian Education in Ancient & Later Times : लेखक डॉ. Keay एम्. ए., डी. लिट्. प्रकाशक—ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी पृष्ठें २००, मूल्य ५ रु.

या पुस्तकांत प्राचीन वैदिक व बौद्धधर्मीय आणि मध्यकालीन इस्लामी शिक्षणपध्दतीचें समालोचन करण्यांत आलें आहे. इंग्रजी अमलांतील प्राथमिक शिक्षणाचाहि धावता आढावा यांत आहे. प्राचीन काळांतील औद्योगिक शिक्षण आणि स्त्रीशिक्षण यांचाहि स्वतंत्र प्रकरणांत विचार केलेला आहे. या पुस्तकामुळें भारतीय शिक्षण-पध्दतींचा प्राचीन कालापासून आतांपर्यंतचा इतिहास एकत्र पाहण्याची चांगली सोय झालेली आहे.

( ३ ) **पाश्चिमात्य शिक्षणपद्धति** :—लेखक डॉ. खेर. पृष्ठें ४४४ किंमत ३ रु.

या ग्रंथांत अमेरिका, रशिया, इंग्लंड, जर्मनी, इटली व फ्रान्स या देशांतील शिक्षणपध्दतींचा व्यवस्थित इतिहास दिला आहे. विशेषत: अमेरिका व रशिया या देशांतील शैक्षणिक विचारांचें वर्धा-योजनेशीं असलेलें साम्य समजून घेण्याची मराठी वाचकांना या पुस्तकानें चांगली सोय केली आहे.

राष्ट्रीय शिक्षणविषयक महत्त्वाच्या ग्रंथांची यादी पुढें दिली आहे.

( १ ) **खरी केळवणी** (गुजराती) : नवजीवनप्रकाशनमंदिर, अहमदाबाद. पृष्ठें ४९८. मूल्य १२ आणे.

( २ ) **केळवणीनो कोयडो** ( गुजराती ) : नवजीवनप्रकाशन-मंदिर, अहमदाबाद. पृष्ठें ४८७. मूल्य १ रु.

या दोन ग्रंथांत म. गांधींचे 'यंग इंडिया', 'नवजीवन', 'हरिजन', 'हरिजन-बंधु' इत्यादि साप्ताहिकांतील शिक्षणविषयक लेख, त्यांचीं त्याविषयींचीं महत्त्वाचीं भाषणें यांचा सुव्यवस्थित संग्रह करण्यांत आला आहे. यांत शिक्षणाचा आदर्श, विद्यार्थी-जीवनांतील प्रश्न, राष्ट्रभाषाप्रचार, असहकार आणि आधुनिक शिक्षण, राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयोग, हरिजनांचें शिक्षण, वर्धा-योजना इत्यादि विषयांवर म. गांधींनीं व्यक्त केलेले विचार अत्यंत मननीय आणि प्रत्यक्ष व्यवहारांत मार्गदर्शक होणारे आहेत.

( ३ ) **शिक्षा** ( बंगाली ) : श्री. रवींद्रनाथ ठाकूर. विश्वभारती ग्रंथालय. पृष्ठें २८६. मूल्य १॥ रु.

यांत गुरुदेवांचे शिक्षणविषयक लेख एकत्रित करण्यांत आले असून 'विश्वभारती'च्या संस्थापकाचे विचार समजून घेण्यास यासारखें दुसरें साधन नाहीं.

( ४ ) A System of National Education : श्री. अरविंद घोष. आर्य पब्लिशिंग हाउस, कलकत्ता. पृष्ठें ५५. मूल्य १ रु.

प्रसिद्ध वंगभंगाच्या काळांत पहिल्या राष्ट्रीय शिक्षण चळवळीचा उदय झाला. अरविंदबाबू तिचे पुढारी होते. त्यांनीं १९०९ सालीं आपल्या 'कर्मयोगिन्' नामक इंग्रजी साप्ताहिकांत राष्ट्रीय शिक्षणावर लिहिलेले निबंध या पुस्तकांत दिले आहेत. राष्ट्रीय शिक्षणावरील त्यांचे सर्व विचार लिहिले गेले नाहींत. तथापि शिक्षणशास्त्राच्या सामान्य तत्त्वांचें यांत जें विवेचन आलें आहे तें विचारणीय आहे. मुख्यतः मानसशास्त्राच्या दृष्टीनें यांतील लेखांत शिक्षणाचा ऊहापोह आढळतो.

( ५ ) The Problem of National Education in India : लाला लजपतराय. एस्. गणेसन् अँड को., मद्रास. पृष्ठें २५६.

असहकारितेच्या युगांत हें पुस्तक प्रसिद्ध झालें. यांत राष्ट्रीय ध्येयें आणि राष्ट्रीय शिक्षणपध्दति यांचा विचार करण्यांत आला आहे. याशिवाय शारीरिक शिक्षण, धंदेशिक्षण, शिक्षण आणि आजीविका, शिक्षण आणि सहकारी पद्धति इत्यादि विषयांची चांगली चर्चा यांत आढळते. इंग्रजी भाषेंतील शिक्षणविषयक विविध प्रकारच्या ग्रंथांची विस्तृत यादी परिशिष्ट म्हणून जोडलेली आहे, ती अभ्यासकांस फार उपयुक्त आहे.

( ६ ) Education as Service : जे. कृष्णमूर्ति, थिऑसॉफिकल पब्लिशिंग हाउस, अड्यार ( मद्रास ). पृष्ठें ७५. मूल्य १२ आणे.

या पुस्तकांत कृष्णमूर्तींचे शिक्षणविषयक विचार आले आहेत. शिक्षणाचा आध्यात्मिक दृष्टीनें यांत महिमा दाखविला आहे.

(७) **जीवन-विकास** (गुजराती) काकासाहेब कालेलकर. नवजीवन-प्रकाशन-मंदिर, अहमदाबाद. पृष्ठें ८०० मूल्य, २॥ रु.

काकासाहेब हे राष्ट्रीय शिक्षणाचे प्रख्यात आचार्य आहेत. राष्ट्रीय शिक्षणाच्या सर्व स्थित्यंतरांतून ते प्रत्यक्ष गेले आहेत. त्यांनीं गुजरातींत अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें साहित्य निर्माण केलें आहे. गेल्या अठरा वर्षांत त्यांनीं शिक्षणाच्या विविध शाखांवर असंख्य सरस लेख लिहिले आहेत. या ग्रंथांत त्यांचे शिक्षणविषयक लेख एकत्र करण्यांत आले असून सदर ग्रंथ आपल्या नांवाप्रमाणें जीवनविकास करण्यास खरोखरच समर्थ झाला आहे.

(८) **केळवणीना पाया** (गुजराती): श्री. किशोरलाल मश्रूवाला नवजीवन-प्रकाशन-मंदिर, अहमदाबाद. पृष्ठें ३६५, मूल्य १ रु.

गांधीसेवासंघाचे अध्यक्ष श्री. किशोरलालभाई हें जीवनवीर असून त्यांनीं आपलें सारें जीवन अध्यात्मदृष्टया संशोधनांत आणि विचारांत वेंचिलें आहे. या ग्रंथाची तिसरी आवृत्ति निघाली आहे. शिक्षणाचा मानसशास्त्रदृष्टीनें यांत अत्यंत सरळ उलगडा केला आहे. जीवनाच्या सर्व शक्ती विकासित, उन्नत आणि मुक्त करण्याचें काम शिक्षणानें कसें साधावयाचें आहे तें यांत चांगलें दाखविलें आहे.

(९) **तेजस्वी शिक्षण** : हरि कृष्ण मोहनी, नागपूर. पृष्ठें १४३. मूल्य १। रु.

श्री. मोहनी हे उच्च दर्जाचे शिक्षणतज्ज्ञ असून त्यांनीं आपलें सर्व आयुष्य शिक्षण व समाजसेवा यांसच वाहिलें आहे. १९२३ सालीं त्यांनीं वरील ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. या ग्रंथांत देशाभिमानाच्या दृष्टीनें शिक्षणाची चिकित्सा करण्यांत आलेली आहे. लाला मुनशीराम

( स्वामी श्रद्धानंद ) यांचें गुरुकुल, रवींद्रनाथ ठाकूर यांचें शांतिनिकेतन, म. गांधी यांचा सत्याग्रहाश्रम इत्यादि शिक्षणक्षेत्रांतील थोर प्रयोगांची तौलनिक चिकित्सा यांत दिली आहे. त्यांत कित्येक सुंदर अवतरणें पाहावयास मिळतात.

( १० ) **कनिष्ठ, मध्यम, उच्च शिक्षणाचा अनुभव** : विश्वनाथ काशीनाथ राजवाडे. मूल्य ४ आणे.

या छोट्या निबंधांत राजवाड्यांनीं मेकॉलेप्रणीत रूढ शिक्षणपध्दतीचें कठोर विदारण केलें असून राष्ट्रीय शिक्षणाच्या तेजस्वी स्वरूपाचें दर्शन करविलें आहे.

( साहित्य-दर्शिकेंतील साहित्य १९४० सालापर्यंतचें आहे. )

---